ग्रंथसंपादक व प्रसारक मंडळीची ग्रंथमाला.

ग्रंथ २३ वा.

# अमीर अबदुल रहिमान

ग्रंथकार

विनायक कोंडदेव ओक.

प्रकाशक

दामोदर सांवळाराम आणि मंडळी, बडोदें.

मुंबई, "इंदुप्रकाश" छापखान्यांत छापिला.

सन १९०२.

किंमत बारा आणे.




# समर्पण.



**श्रीमंत युवराज फत्तेसिंहराव गायकवाड, छोटेमहाराज सरकार,**

ह्यांस,

राज्यकारभार हातीं घेणें; वडिलांचा नांव लौकिक राखून प्रजाजनांस संतुष्ट ठेविणें; विद्या, सद्गुण इत्यादिकांचा प्रसार करण्याची दक्षता ठेवून एकंदर राष्ट्राच्या उन्नत्त्यर्थ यथाशक्ति प्रयत्न करणें, इत्यादि अनेक प्रकारच्या विचारणीय व ग्रहणीय गोष्टींसंबंधाच्या दिशा दाखविण्याच्या नम्र उद्देशानें,

व

**स्वतः युवराज ज्ञानसंपादनार्थ विलायतेस गेले त्या प्रसंगाच्या स्मरणार्थ,**

**हें लहानसें पुस्तक**

**अर्पण केलें आहे.**




# प्रस्तावना.



जगांतल्या अनेक प्रकारच्या व्यवहारांत माणसांनीं आपापलीं कर्तव्यें कशीं करावीं, हें उदाहरणद्वारा प्रदर्शित करणें हा इतिहासशास्त्राचा मुख्य उपयोग होय. त्या व्यवहारामध्यें राज्य चालविणें, ह्या व्यवहाराइतका कठिण आणि श्रेष्ठ व्यवहार दुसरा एकही नाहीं. कां कीं, त्यांत सगळ्या राष्ट्राच्या कल्याणाकल्याणाचा समावेश होत असतो. एकाद्या साधारण माणसाला प्रपंच करितां आला नाहीं, तर त्यापासून त्याच्या कुटुंबाची हानि होते, एवढेंच कायतें. पण जर एकाद्या राजाला आपलें राज्य चालवितां आलें नाहीं, तर त्यांतल्या लक्षावधि किंवा कोट्यावधि माणसांची हानि होते, आणि सगळ्या राष्ट्रास शेंकडों वर्षें विपत्तींत काढावीं लागतात. ह्या सगळ्याचें पाप त्या एकट्या राजाच्या माथीं बसतें. त्याप्रमाणेंच, हातीं राज्य आल्यावर तें चांगल्या रीतीनें चालविलें, ह्मणजे राष्ट्राचा अभ्युदय होतो, कोट्यावधि लोक संपन्न होऊन सुख भोगतात, आणि त्या सगळ्याचें पुण्य राजास प्राप्त होतें. ह्यावरून, राज्यकारभार चालविण्याची जबाबदारी केवढी मोठी आहे, हें सहज लक्षांत येईल. आणि तें काम चांगल्या प्रकारें करण्यास माणसास किती प्रकारच्या गुणांची आवश्यकता असते, हेंही समजेल. राष्ट्र ह्मटलें ह्मणजे त्यांत सज्जन, दुर्जन, परोपकारी, परद्वेषी, विद्वान, अविद्वान, राजनिष्ठ, अराजनिष्ठ, लोकहितार्थ जीव खरचिणारे, स्वार्थार्थ लोकांचा जीव घेणारे, इत्यादि सर्व प्रकारचे लोक असावयाचे. नितक्यांशीं राजाचा

संबंध यावयाचा. आणि त्यानें त्यांशीं प्रजावात्सल्य, दयालुता, नम्रता, धैर्य, सहिष्णुता, क्रोध, क्रूरता, निर्दयता, इत्यादि गुणावगुणांचा अवलंब करून कालदेशवर्तमानानुसार अशा प्रकारें वागावयाचें कीं, त्याच्या योगानें, एकंदरींत, राष्ट्राचें हितच व्हावें. ह्या वर्तनामध्यें क्रूरता आणि निर्दयता इत्यादि जे पर्याय येतात, तीं दयाळूपणाचींच स्वरूपें आहेत, असें कवींनीं ह्मटलें आहे, तें खरें आहे. ह्मटलें आहे:—

केव्हां सत्य वदे वदे अनृतही केव्हां वदे गोडही,
केव्हां अप्रियही दयालुहि असे केव्हां करी घातही;
केव्हां दे कवडी न एकहि कधीं कीं वेंचही आदरी
तैशी ही नृपरीति भासत असे वारांगनेचे परी.

वामन.

ह्यांतला दृष्टांत अमळसा अश्लील आहे. परंतु, राजांस असें वागावें लागतें, ह्यांत कांहीं संशय नाहीं. आणखी, त्यांत त्यांचा दोष काडीभरही नाहीं. कां कीं, त्यांस राष्ट्राचें कल्याण पहावयाचें असतें, त्याच्या कामांत अशा नानाप्रकारच्या लोकांस वागविण्याचें प्रसंग त्यास येतात, आणि इष्टकार्यसिद्ध्यर्थ भिन्न भिन्न प्रसंगीं अशा भिन्न प्रकारीं वागल्यावांचून त्यांचें चालतच नाहीं. त्यांत त्यांचा निरुपाय असतो. म्हणजे, राज्य उत्तम प्रकारें चालविणें, आणि त्यांतही तें अगदीं रानटी आडदांड अशा लोकांवर चालविणें, आणि त्यांस उन्नतीच्या मार्गास लावणें—हें एक मोठें दिव्य आहे. ह्या दिव्याच्या कसोटीस उतरलेले असे जे कोणी पुरुष अर्वाचीन काळीं होऊन गेले, त्यांतल्या प्रमुखांत अमीर अबदुल रहिमान ह्यांची गणना आहे. एकुणिसाव्या शतकामध्यें कोणत्याही

एकाद्या राष्ट्रास स्वसुधारणेचें जें काम करण्यास शंभर वर्षें लागावयाचीं, तें काम, ह्या अमीरसाहेबांनीं अफगाणिस्थानांत वीस वर्षांत करून दाखविलें आहे, असें लार्ड कर्झनसारख्या मोठमोठ्या मुत्सद्यांनीं प्रांजलपणें कबूल केलें आहे. हें कर्तृत्व कांहीं सामान्य नव्हे. ह्याचें कथन संक्षेपतः ह्या लहानशा पुस्तकांत केलें आहे. ह्याच्या अवलोकनानें, ज्यांस राज्यें चालवावयाचीं आहेत, त्यांस तर पुष्कळ बोध होईलच. पण, आणखी, हातीं घेतलेलें काम शेवटास नेण्यास दृढ निश्चय कसा उपयोगीं पडतो, आणि जगांत यशस्वी होण्यास कोणते गुण विशेष कामास येतात, हें ज्ञान सर्वांस होईल, व तें कोणत्याही धंद्यांतल्या माणसांस साह्यभूत होईल ह्मणून, ह्या चरित्रासारखीं चरित्रें आमच्या होतकरू देशबांधवांच्या अवलोकनास विशेष ग्राह्य होत. ह्या दिशेनें हा अल्प प्रयत्न केला आहे. हा परमेश्वरकृपेनें सफल होवो.

ग्रंथकर्ता.



# प्रकाशकांचे दोन शब्द.



श्रीमंत युवराज फत्तेसिंहराव गायकवाड, छोटे महाराज साहेब, हे मुंबई युनिव्हर्सिटीच्या प्रवेशपरीक्षेत उत्तीर्ण झाल्यानंतर त्यांची स्वारी इंग्लंड देशाच्या विश्वविद्यालयांत अभ्यास करण्याकरितां ता. १९ एप्रिल सन १९०१ रोजीं गेली, त्या वेळेच्या स्मरणार्थ आमचे विद्याभिलाषी श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड सरकार यांनीं ग्रंथसंपादक व प्रकाशक मंडळीस १२०० रुपयांची देणगी दिली. व त्या रकमेच्या व्याजांतून उपयुक्त ग्रंथ तयार करवून ते श्रीमंत युवराजांस अर्पण करावे असें कळविलें. श्रीमंत महाराज साहेबांच्या ह्या देणगीबद्दल मंडळी त्यांची फार आभारी आहे. या सूचनेप्रमाणें स्वतंत्र ग्रंथ तयार करविण्याइतकी व्याजाची रक्कम जरी सव्वा वर्षांत जमली नाहीं, तरी जमलेले रकमेंत थोडी स्वतःची भर घालून मंडळीकडून श्रीमंत युवराजांस आज ही पहिली भेट अर्पण करण्यांत येत आहे.

अफगाणिस्तानचे मरहूम अमीर अबदुल रहिमान हे मोठे मुत्सद्दी, राजकार्यधुरंधर व स्वदेशाचे आणि स्वधर्माचे कट्टे अभिमानी असे शूर पुरुष होते हें प्रसिद्धच आहे. त्यांनीं स्वतःच्या चरित्राचा विस्तृत ग्रंथ लिहिला आहे, त्यांत अनेक महत्वाच्या गोष्टी आल्या आहेत. या समग्र ग्रंथाचें मराठी भाषेंत भाषांतर होणें हें वास्तविक विचार करितां अगत्याचें होतें; परंतु तें काम फार खर्चाचें व मंडळीस न झेंपण्यासारखें असल्यामुळें त्या ग्रंथांतील उपयुक्त सार तेवढेंच घेऊन

प्रस्तुतचें पुस्तक मराठी भाषेंतील प्रसिद्ध ग्रंथकार रा. सा. विनायक कोंडदेव ओक यांजकडून तयार करविलें आहे; व तें मराठी वाचकांस आणि विशेषतः आमच्या श्रीमंत युवराज फत्तेसिंहराव महाराजांस विशेष प्रिय होईल अशी आशा आहे.

या ठिकाणीं दुसरी एक गोष्ट कळविणें अवश्य आहे कीं, श्रीमंत गायकवाड सरकारांनीं सांप्रतच्या देणगीनें मंडळीस एक प्रकारचें स्थाईकचें स्वरूप आणून मराठी ग्रंथभांडारांतही एक प्रकारें लहानशीच कां होईना, पण कायमची भर घातली आहे. याप्रमाणें इतर श्रीमंत मंडळीकडूनही योग्य मदत मिळाली तर दसर्का लकडी एकका बोजा या न्यायानें होऊन दरसाल एक दोन ग्रंथ अशा फंडांतून तयार होऊं शकतील, आणि त्या योगानें मंडळीस हल्लींपेक्षां अधिक जोरानें काम करण्यास उमेद येईल, आणि हल्लींपेक्षांही विशेष सवलतीनें ग्राहकांस ग्रंथांचा लाभ देण्यासही सवड मिळेल. करितां आमच्यांतील श्रीमंत मंडळी या गोष्टीकडे लक्ष पुरवून श्रीमंत गायकवाड सरकारांप्रमाणें या कामीं मंडळीच्या फंडास मदत करितील अशी आह्मी उमेद ठेवितों.

बडोदें, ता. ९–१०–१९०२.



# अनुक्रमणिका.



# अमीर अबदुल रहिमान.

## भाग पहिला.

### अफगाणिस्थानाचें वर्णन.

अफगाणिस्थान हा देश आशिया खंडाच्या पश्चिम भागीं आहे. ह्याच्या उत्तरेस रशियन तुर्कस्थान आहे, पूर्वेस हिंदुस्थान आहे, दक्षिणेस बलुचिस्थान आहे, आणि पश्चिमेस इराण आहे. ह्याचें क्षेत्रफळ २५०००० चौरस मैल आहे, आणि लोकसंख्या ४०००००० आहे.

हा देश वाळवंटें, खडक, टेंकड्या, बर्फानें आच्छादलेले पर्वत, आणि ओसाड मैदानें ह्यांनीं भरला आहे. रमणीय स्थळ असें क्वचित् दृष्टीस पडतें. ह्यांत हिंदुकुश हा मोठा पर्वत आहे. तो पूर्वेकडून पश्चिमेकडे गेला आहे. त्याच्या पश्चिमेकडील भागाचे तीन फांटे झालेले आहेत, कोहिबाबा, सिआकोह, आणि सफेतकोह. सुलेमान हा पर्वत पूर्व सरहद्दीवर आहे. आणि नैऋत्येकडे सीस्टन हें एक मोठें रेताड मैदान आहे.

मुख्य नदी काबूल, तिच्याच कांठीं काबूल ही राजधानी आहे, ती सिंधुनदास मिळते. हेलमंद ही नैऋत्येकडे वाहात गेली आहे, आणि सीस्टन वाळवंटांतल्या हामन सरोवरास

मिळाली आहे. हेरिरड ही नदी हिराताजवळून वाहात जाऊन त्याच वाळवंटांत शिरते.

अफगाणिस्थानांत उन्हाळा अतिशयित होतो. ह्या उष्णतेचें मान उंचउंच जावें तसें अधिक होत जातें. तशी थंडीही अतिशयित पडते. हिंवाळ्यांत बर्फ अतिशयित पडतें. त्याच्या मोठमोठ्या वावटळी उठतात.

अशा वावटळींनीं गिझनीशहर दोनदां बेचिराख झालें होतें ह्मणतात. हिंवाळा ह्मटला ह्मणजे तेथें मोठाच चमत्कार आहे. उन्हांत असतां क्षणांत आंगाची लाही होते, आणि सावलींत आलें कीं कडकडून थंडी लागूं लागते.

व्यापाराचे दोन मोठे राजमार्ग आहेत. मशदपासून हिरातपर्यंत आणि बुखाऱ्यापासून हिरातपर्यंत. बुखारा आणि काबूल ह्यांच्यामध्यें बल्कावरून पुष्कळ व्यापार चालतो.

पेशावरापासून दोन मजलांवर खैबरघांट आहे. ह्यांतून हिंदुस्थानावर पुष्कळ स्वाऱ्या आल्या. ह्यांत आफ्रिडीज लोकांची वस्ती आहे.

गोमाल हा घांट पंजाब आणि गिझनी ह्यांच्यामध्यें आहे. हा वजीरी लोकांच्या स्वाधीन आहे. येथें गिझनीचे व्यापारी येतात; तेथें ते आपलीं हत्यारें ठेवितात, हिंदुस्थानांत येऊन शांतपणें व्यापार करितात, आणि पुनः त्या घांटांतून आपलीं हत्यारें घेऊन, वर्षाच्या आंत, स्वस्थ आपल्या घरीं जातात.

गोमाल घांटाच्या दक्षिणेस बोलोन घांट आहे. त्यांतून आगगाडी क्केटाला आणि न्यूचमनाला गेली आहे.

कांहीं प्रदेश फार सुपीक आहेत. त्यांत धान्य, कापूस आणि फळें चांगलीं होतात. घोडे आणि मेंढरें फार चांगलीं असतात.

वर्णनाच्या सोईकरितां अफगाणिस्थानाचे मुख्य मोठे भाग दोन मानितात. एक पूर्व भाग आणि एक पश्चिम भाग. पूर्वभागांत काबूल आणि गिझनी हीं दोन मोठीं शहरें आहेत; आणि पश्चिमभागांत कंदाहार आणि हिरात हीं दोन मोठीं शहरें आहेत.

**काबूल** शहर पेशावरापासून १९० मैलांवर, समुद्राच्या पृष्ठभागापासून ६५०० फूट उंचीवर वसलें आहे. ह्याच्या दक्षिणेस झाबुळ म्हणून एक शहर पूर्वी होतें म्हणतात, आणि त्याची जागा दाखवितात, त्यावरून काबूल हें नांव पडलें असावें. तें तीन टेंकड्यांच्यामध्यें आहे. त्यांतल्या दोन टेंकड्यांच्या मधून काबूल नदी वाहात आहे. काबुलाचें मूळ नांव बक्त्यार होतें. त्याला युरोपियन लोक बाक्त्रिया म्हणत. दक्षिणेच्या बाजूस गांवकुसूं आणि टेंकडी ह्यांच्यामध्यें एक अरुंद वाट आहे. ह्या टेंकड्या उंच, रखरखीत आणि खडकाळ आहेत. शहराची लांबी पूर्वपश्चिम एक मैल आहे, आणि दक्षिणोत्तर रुंदी अर्धा मैल आहे. ह्याच्या भोंवतीं पातळसें गांवकुसूं आहे. खंदक नाहीं. शहराच्या पूर्वेस टेंकडीवर बालाहिसार हा किल्ला आहे, आणि तिच्या उतरणीवर राजवाडे आहेत, बागा आहेत, आणि बाजार आहेत आणि त्यांच्याभोंवतीं वेगळें गांवकुसूं आहे. त्यांतल्या पेंठा पूर्वपश्चिम वसलेल्या आहेत. रस्त्यांच्या आजूबाजूंस दुमजली तिमजली घरें आहेत. कांहीं गल्ल्या

अगदीं निरुंद आहेत. लोकसंख्या साठ हजार आहे. काबूल नदी शहरांत पश्चिमेकडून आंत येऊन पूर्वेकडे वाहात जाते. तिला पाणी आगष्टपासून आक्टोबरपर्यंत अगदीं थोडें असतें. परंतु, पुर आला म्हणजे त्यानें गांवकुसूं पडेल कीं काय असें भय वाटतें. काबुलाभोंवतालची जमीन पिकाऊ आहे. तींत फळफळावळ फार होते. प्रांताची लोकसंख्या सुमारें १४०००० आहे.

**गिझनी** हें शहर टेंकड्यांवर वसलेलें असून तें समुद्राच्या पृष्ठभागापासून ७७२६ फूट उंचीवर आहे. हें काबुलापासून नव्वद मैल आहे. त्याच्या मध्यभागीं एक किल्ला आहे. शहराचा आकार वेडावांकडा आहे. त्याच्याभोंवतीं तसेंच एक पातळसें गांवकुसूं आहे. घरें ठेंगणीं आणि धाब्याचीं आहेत. त्यांना खिडक्या लहान लहान आहेत, आणि झरोके पुष्कळ आहेत. किल्ल्यांतलीं घरें बरीं आहेत. त्यांत सरदार राहातात. गिझनीचा किल्ला भयंकर दिसतो, तितका बळकट नाहीं. गिझनीच्या भोंवतालची जमीन सुपीक आहे. धान्य आणि फळफळावळ पुष्कळ होते. दूधदुभतेंही विपुल मिळतें. काबूल आणि गिझनी ह्यांच्या दरम्यानचा रस्ता फार अवघड आहे. त्यावर बर्फाचे थर पडून त्यांच्या योगानें तो कितीएक महिने बंद देखील पडतो. गिझनीसदेखील बर्फ अतिशयित पडतें, आणि तें पुष्कळ दिवस राहातें. गिझनी आणि काबूल ह्यांच्यामध्यें विजा फार पडतात. लोकसंख्या १०००० आहे.

**कंदाहार** गिझनीपासून २२५ मैल आहे. कंदाहाराच्या भोंवतालच्या कितीएक डोंगरांचीं शिखरें पांच पांच हजार फूट उंच आहेत. कंदाहारानजीकचा प्रदेश चांगला पिकाऊ आहे. हें शहर चांगलें लोकवस्तीचें आहे. ह्याचा आकार लांबट चौकोनी आहे. त्याच्या भोंवतीं तीस फूट उंचीचें पातळसें गांवकुसू आहे. चार बाजूंकडून वसलेल्या चार मोठ्या पेंठा आहेत. त्या शहराच्या मध्यभागीं मिळतात. तेथें फार मोठा चौक आहे. त्या चौकांत पुष्कळ दुकानें आहेत. शहरांतले दुसरे रस्ते निरुंद आहेत. कंदाहारची हवा उष्ण आहे. ती हिंदुस्थानच्या हवेपेक्षां चांगली आहे. कंदाहारास बहुतेक सगळ्या वस्तु महाग असतात. लांकडें तर मिळतच नाहींत. लोकसंख्या साठ हजार आहे. कंदाहारापासून हिरात सुमारें चारशें मैल आहे. प्रांताची लोकसंख्या १००००० आहे.

**हिरात** हें अफगाणिस्थानांतलें लष्कराचें मोठें ठिकाण आहे. हें तटबंदी आहे. त्याच्या भोंवतीं बळकट गांवकसू आहे. त्याला जागोजाग मोठमोठे बुरूज आहेत. त्याच्या भोंवतीं खंदकही आहे. त्यांत पाणी असतें. शहराच्या दक्षिणेस एक कालवा आहे. त्याला हरिरुड नदीचें पाणी येतें. त्यावर कितीएक चक्क्या चालतात. हिरात शहराला पांच वेशी आहेत. उत्तरेकडे मशदवेशीच्याजवळ दोन किल्ले आहेत—एक नवा आणि एक जुना. ते एकमेकांस लागून आहेत. पहिल्याच्या माऱ्यांत दुसरा आहे. हिरात कशाच्याच माऱ्यांत नाहीं. अफगाणिस्थानांतून हिंदुस्थानांत येण्यास हिरात हें दार आहे, असें पुष्कळ ग्रंथकारांनीं ह्मटलें

आहे. ह्याच्या भोंवतीं अनेक रस्ते हिंदुस्थानाकडे आलेले आहेत. आणि सैन्य ह्मटलें तर केवळ ह्यांतल्याच एकाद्या रस्त्यानें हिंदुस्थानांत जाईल, दुसऱ्या रस्त्यानें जाऊं शकणार नाहीं, असें ते ह्मणतात. ह्या शहराच्या भोंवतालचा प्रदेश फार सुपीक आहे, आणि सैन्याच्या तयारीस जें साहित्य पाहिजे, तें ह्या मैदानांत विपुल आहे. पाणी पुष्कळ आहे. शिसें, लोखंड आणि गंधक ह्यांच्या खाणी मोठमोठ्या आहेत. सोराही पुष्कळ आहे. ज्या लांकडांचा कोळसा चांगला होतो, तीं लांकडें विपुल आहेत. आणि लोक असे आहेत कीं, त्यांस शिपाईगिरीचें काम चांगलें करितां येतें, आणि तें त्यांस फार आवडतें. हिरात जर हिंदुस्थान सरकारच्या स्वाधीन असलें, तर, त्या बाजूनें हिंदुस्थानावर हल्ला करणें हें कोणासही कालत्रयीं साधावयाचें नाहीं. हिरातच्या भोंवतालच्या प्रांताविषयीं कप- तान मार्ष ह्यांनीं ह्मटलें आहे कीं, "जमीन सुपीक आहे, आणि हवा चांगली आहे, त्यांच्या योगानें येथल्या रानांचे सुंदर बाग करण्यास उशीर लागावयाचा नाहीं." लोकसंख्या १२००० आहे. ह्या शहराच्या भोंवतालच्या प्रांतासही हिरातच ह्मणतात. ह्यांतल्या लोकांस हिराती असें नांव आहे. त्यांत अनेक जाति आहेत. दुराणी राजांच्या वेळीं हा प्रांत अफगाणिस्थानच्या राज्यांत सामील झाला.

**बल्क**—हा प्रांत हिंदुकुश पर्वत आणि आक्सस नदी ह्यांच्या मध्यें आहे. ह्यांच्या एका बाजूच्या माऱ्यांत हिरात आहे, आणि दुसऱ्या बाजूच्या माऱ्यांत काबूल आहे. ह्मणून ह्याचें माहात्म्य राजकीय दृष्टीनें मोठें मानितात. ह्याचें मुख्य शहर बल्कच आहे. तें फार प्राचीन आहे. त्यास शहरांची आई ह्मणतात.

येथें जरतुष्ट—पारशी धर्माचा संस्थापक—ह्याचा जन्म झाला. ह्या शहराबाहेर एक चिखली किल्ला आहे. त्याचें नांव चिहलगाजी. हा किल्ला रात्रीं फार उंच होत असतो, असें लोक ह्मणतात. ह्यांत अनेक जातींचे लोक राहातात. ते मोठे कडवे आहेत. त्यांवर राजसत्ता अफगाणिस्थानच्या अमीरांची आहे. हा प्रांत अहमदशहानें अफगाणिस्थानच्या राज्यास जोडिला. तो पुढें त्यांच्या मागच्या राजाच्या वेळीं अफगाणिस्थानाच्या हातून गेला होता. तो पुनः इ० स० १८५० त दोस्तमहंमद ह्यांनीं मिळविला.

**बदकशान**—हा प्रांत अफगाणिस्थानाच्या ईशान्य भागीं आहे. ह्यामध्यें आक्सस नदीच्या उगमाच्या आसपासच्या सगळ्या प्रदेशाचा समावेश होतो. ह्यांत फैजाबादचें मैदान आहे. हा अफगाणिस्थानाच्या ताब्यांतून गेला होता, तो आलीकडे अफगाणिस्थानास जोडिला आहे. ह्यांत लोखंड उत्तम सांपडतें. तशा रत्नांच्या खाणीही लागण्यासारख्या आहेत. परंतु, तिकडे कोणी लक्ष देत नाहींत.

**घोर**—हा एक प्रांत एकीकडे हिरात आणि काबूल आणि दुसरीकडे कंदाहार आणि बल्क ह्यांच्यामध्यें आहे. म्हणजे हा उंचवटा हिंदुकुशाचा एक फांटा आहे. ह्यांत मोंगल जातीचे लोक राहतात. ह्यांची वसाहात, लष्करी छावणी म्हणून, झेंगिजखानानें केली म्हणतात. हे शियापंथाचे आहेत. ह्यांना हझारा हें नांव आहे. ह्या देशालाही कोणी हजारा म्हणतात. ह्या प्रदेशांतून हिरात आणि मर्घाब ह्या नद्या वाहातात.

**बुखारा**–ह्यांच्या चारी बाजूंस वाळवंट आहे. भोंवतीं कोट आहे. शहराबाहेर मुसलमानांचा इद्‌गा आहे. ती इमारत फार सुंदर आहे. गांवाची लोकसंख्या १७०००० आहे. धान्य, फळें, रेशीम आणि अफू हीं येथें पिकतात. हिंदु आणि यहुदी लोकांस घोड्यावर बसण्यास व आपले चालीचे पोषाक करण्यास परवानगी नाहीं. चोरास कडेलोट करण्याची शिक्षा होते. हवा चांगली आहे. लोकांस नारू फार होतात. ते मांजरें, कुतरे, पांखरें, ह्यांसही होतात. हिंवाळ्यांत बर्फ पडतें. तें घरांवर तीनतीन महिने असतें. बुखारा शहरांत मशीदी आणि पाठशाला ३६० आहेत. त्यांत पारशी आणि अरबी शिकवितात. समर्कंद नदीचा प्रवाह शहरामध्यें महिन्यांतून दाहा दिवस वाहतो. त्याचें पाणी टांक्यांत भरलेलें असतें तें लोक पितात. बुखारा प्रांताचें उत्पन्न १२०००० रुपये आहे. मालावर कर घेतात. ह्या प्रांताचा मांडलिक राजा वेगळा असून तो रशि॰याच्या अधिकाराखालीं आहे.

अफगाण लोकांचा प्राचीन इतिहास अमीर अबदुल रहिमान ह्यांनीं असा लिहिला आहे. “ अफगाण लोक हे सुनी पंथाचे मुसलमान आहेत. त्यांच्या नांवाची उत्पत्ति अफगाना ह्या शब्दापासून झाली असावी. अफगाना हा सालोमन राजाचा सेनापति होता. अफगाण लोक हे स्काटलंडांतल्या हैलंडर डोंगरी लोकांसारखे मोठे शूर योद्धे आहेत. त्यांस त्यांच्या स्वातंत्र्याचा अभिमान मोठा आहे. आपल्या देशाचें राज्य आपण चालवावें, दुसऱ्याच्या हातांत कधीं जाऊं नये, अशी त्यांची इच्छा असते. कितीएक अफगाण

जातींच्या राजांनीं हिंदुस्थानावर स्वाऱ्या केल्या आहेत. राजा चांगला शूर असला म्हणजे अफगाण लोक त्याच्या हाताखालीं मोटमोठे पराक्रम करितात, परदेश जिंकितात, आणि आपल्या राष्ट्राचें वैभव वाढवितात. अफगाण लोकांच्या शौर्यानें केवळ अफगाण राजांस मात्र जय मिळाले आहेत असें नाहीं. तर, हिंदुस्थानांतल्या मोंगल बादशाहांचा मूळ पुरुष बाबर आणि इराणांतले राजे ह्यांनाही पुष्कळ जय अफगाण लोकांच्याच पराक्रमानें मिळालेले आहेत. ज्या राज्यास किंवा सरकारास अफगाण लोकांच्या आश्रयाचें आश्वासन आहे, त्या राज्याचें किंवा सरकाराचें दैव फार मोठें आहे असें समजावें. कां कीं, ज्या पक्षाकडे हे असावयाचे, त्या पक्षास जय नेमका यावयाचा, कधींही चुकावयाचा नाहीं." ह्यावरून आपल्या लोकांविषयीं अमीरसाहेबांचें मत कसें होतें, तें स्पष्ट दिसून येतें.

अफगाणिस्थानांतल्या लोकांत जाति पुष्कळ आहेत. त्यांत मुख्य दुराणी आहे. तिच्या खालोखाल पराक्रमी घिलझाई ही जात आहे. तिच्या खालोखाल ऐमाक आणि हजारा ह्या जाति आहेत. शिवाय उजबेग ही एक जात आहे. आणखी काफीर हे लोक हिंदुकुशपर्वतांत राहातात. हे मुसलमान नाहींत.

ही माहिती अगदीं तुटपंजी दिसते. परंतु उपाय नाहीं. ह्या विषयावरच्या ग्रंथांत ह्यापेक्षां दुसरें कांहीं सांगितलेलेंच नाहीं. आणि जें काय सांगितलें आहे, तें सगळें अजमासाचें आहे. अगदीं आलीकडे इ० स० १८९९ त इंग्रजीमध्यें १०८८ पृष्ठांचा ग्रंथ सगळ्या जगाच्या भूगोलविद्येवर सत्तर ग्रंथकारांनीं मिळून लिहिलेला छापला

आहे. त्यांत अफगाणिस्थानाची भूगोलविषयक माहिती अवघ्या साडेतीन पृष्टांत आटपली आहे; हिंदुस्थानाला ३४ पृष्ठें दिलीं आहेत, आणि इंग्लंडाला ५८ पृष्ठें दिलीं आहेत. अफगाणिस्थानाविषयींची माहिती इतकी कमी असण्याचें एक कारण असें दिसतें कीं, त्यांत परकीय लोकांचा फारसा प्रवेश झालेला नाहीं. आणि ज्यांचा प्रवेश पूर्वी झालेला होता, त्यांस, आपल्या नियमित कार्यापलीकडे इकडे तिकडे वळण्यास सवड नव्हती. शिवाय, तो देश अतिशयित खडकाळ असल्याकारणानें प्रवासास अत्यंत त्रासदायक असला पाहिजे.

---

## भाग दुसरा.

## पूर्वपीठिका, जन्म आणि लहानपण.

जगाच्या अर्वाचीन इतिहासांत अफगाणिस्थानाचे प्रसिद्ध अमीर ह्मटले ह्मणजे दोस्तमहंमद होते. त्यांशीं मित्रत्वाचा तह ठरविण्याचा प्रयत्न, हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल लार्ड आकलंड, ह्यांनीं केला. परंतु तें जमेना. दोस्तमहंमद त्यास मान्य होईनात. तेव्हां अफगाणिस्थानच्या गादीचे एक वारीसदार शाहासुजा हे पूर्वींच तिकडून इकडे येऊन इंग्लिशांच्या आश्रयास राहिले होते, त्यांचा पक्ष धरून लार्ड आकलंड ह्यांनीं त्यांच्या समागमें इंग्लिश

सैन्य देऊन त्यांस अफगाणिस्थानांत पाठविलें. त्याचे मुख्य सेनापति सरजान कीन हे होते. ह्या सुमारास दोस्तमहंमदाच्या सैन्यांत सगळी बचबच झाली होती. खरे इमानी नौकर फार थोडे होते. फितूर झालेले विश्वासघातकी फार होते. त्यामुळें, दोस्तमहंमदांचें कांहीं चालेनासें झालें. त्यांचे लोक, अगदीं आणीबाणीच्या वेळीं त्यांस सोडून जाऊं लागले. असा प्रसंग गिझनी शहराजवळ आला. तेव्हां ते आपल्या लोकांस मोठ्या आवेशानें ह्मणाले—" अरे, आज पंधरा वर्षें तुह्मीं माझें अन्न खाल्लें आहे. ह्याविषयीं जर तुमच्या मनांत माझें उतराई व्हावयाचें असेल, तर मी तुह्मांपाशीं एक मागणें मागतों, तेवढें मला द्या आणि मग खुशाल तुह्मी आपल्या नव्या धन्याकडे जा. तें माझें मागणें एवढेंच कीं, मला लौकिक करून मरूं द्या." असा त्यांनीं पुष्कळ कंठशोष केला. परंतु, त्यांचें कोणीं ऐकिलें नाहीं. त्यांस पळ काढावा लागला. इंग्लिश सैन्यास कंदाहार शरण आलें, गिझनीशहर त्यांनीं तोफा लावून घेतलें, काबूल घेऊन तेथें इ० स० १८३९ च्या आगष्टांत शाहासुजांस गादीवर बसविलें, आणि दोस्तमहंमद हे प्रथम हिंदुकुश पर्वतांत पळून गेले होते, ते पुढें लवकरच सर विलियम मेकनाटन ह्या इंग्लिश सरदारांच्या स्वाधीन झाले. त्यांच्या मागून त्यांचे चिरंजीव अफजुलखान हेही त्यांकडे गेले. आणि त्या उभयतां पितापुत्रांस इंग्लिशांनीं कलकत्यास आणून ठेविलें. हीं वर्तमानें इ० स० १८४० ह्या वर्षीं घडलीं.

पुढें शाहासुजांचें गादीवर बसणें आणि त्यांस इंग्लिशांचें साह्य असणें हें अफगाण लोकांस न आवडून, मोठी

बडाळी माजली. तिचे पुढारी, दोस्तमहंमदांचे चिरंजीव अकबरखान हे होते. त्यांशीं सल्ला करून अफगाणिस्थानांतली गडबड मोडावी, ह्या हेतूनें सर विलियम मेकनाटन ह्यांनीं अकबरखानांची मुलाखत घेण्याचा योग आणिला. आदले दिवशीं नुमत्या भेटी होऊन सलामालकीचीं भाषणें झालीं, आणि त्या वेळीं जें एक पिस्तूल अकबरखानांच्या फार मनांत भरलें, तें त्यांस, सर विलियम मेकनाटन ह्यांनीं बक्षीस दिलें. तेव्हां त्या नजराण्याबद्दल त्यांनीं आपला संतोष प्रदर्शित करून, त्याबद्दल सर विलियम मेकनाटन ह्यांचे फार फार आभार मानिले. आणि त्याच्या दुसऱ्याच दिवशीं, तद्विषयीं बोलणें करण्याचा बाहाणा करून, अकबरखानांनीं सर विलियम मेकनाटन ह्यांस गोळी घालून ठार मारिलें!! नंतर इंग्लिशांचें सैन्य अफगाणिस्थानांतून निघून परत हिंदस्थानाकडे आलें. तेव्हां बंदोबस्त नाहींसा होऊन आफगाणिस्थानांत सगळा गोंधळ होऊन गेला. हीं वर्तमानें इ० स० १८४१ त घडलीं.

ह्या सगळ्या गोष्टी, अर्थातच, गव्हनर जनरल साहेबांस अतिशयित वाईट वाटल्या. आणि तिकडच्या माहितीवरून असें कळलें कीं, शाहासुजाला अफगाणिस्थानांतल्या गादीवर बसविलें आहे, तरी ते तेथल्या लोकांस आवडत नाहींत, आणि त्यांस राज्य चालवितां येत नाहीं, त्यामुळें सगळे बखेडे झाले आहेत, आणि लोकांस मान्य असा राजा गादीवर असल्याशिवाय अफगाणिस्थानांत शांतता स्थापित व्हावयाची नाहीं. ह्मणून, त्यांनीं दोस्तमहंमदांस तिकडे जाण्याची मोकळीक दिली. त्याप्रमाणें ते इ० स० १८४३ त पुनः अफगाणि-

स्थानचे अमीर झाले. त्यांनीं थोडक्याच वेळांत, पुष्कळ श्रम घेऊन अफगाणिस्थानाची नीट व्यवस्था लाविली.

हे दोस्तमहंमद चांगले कर्ते अमीर होते. त्यानीं, आपले चिरंजीव अफजुलखान म्हणजे त्यांच्या मागोमाग जे हिंदुस्थानांत गेले होते--त्यांस बल्क प्रांतावर सुभेदार नेमिलें. ते तिकडे गेल्यावर त्यांस पुत्र झाला. त्याचें नांव त्यांनीं अबदुल रहिमान ठेविलें. तेच ह्या चरित्राचे नायक होत. ह्यांचें जन्म कोणत्या वर्षी झालें हें बरोबर कळत नाहीं. तरी, तें इ० स० १८४४ ह्या वर्षी झालें असावें, आणि ह्यांचें बालपण पित्याच्या सहवासांत बल्क येथें गेलें असावें असें दिसतें. त्या ठिकाणच्या दिनचर्येविषयीं अबदुल रहिमानांनीं लिहिलें आहे:--"माझ्या वडिलांनीं मला विद्याभ्यास करायास लाविलें. मी अहोरात्र लिहीत वाचीत असें, पण माझी बुद्धि मुळींच चालेना. धडा म्हटला म्हणजे माझें डोकें उठे; कारण, सारा दिवस मला घोड्यावर बसणें आणि शिकार ह्यांचा ध्यास असे. आज पाठ आणि उद्यां सपाट, असें माझें होई. पण मला घोकीत बसावें लागे. चुकवितां येईना. माझ्या शिक्षकानें मजशीं पुष्कळ डोकेंफोड केली, पण ती व्यर्थ गेली. बल्क शहराच्या शेजारीं तक्तपूल येथें वडिलांनीं माझ्याकरितां एक चांगली शाळा बांधली होती. तिच्या भोंवतीं एक सुंदर बाग होता. आणि बल्क शहरची हवा वाईट असल्या कारणानें माझ्या वडिलांनीं जनानखाना, आणि कारखाने चालविण्याच्या जागाही, तेथेंच जवळ बांधिल्या होत्या." ह्या वर्णनांत एक गोष्ट लक्षांत ठेवण्यासारखी आहे, आणि तीवरून अमीर अबदुल रहिमान ह्यांची सत्यशीलता आणि मनाचा मोकळेपणा हीं स्पष्टपणें व्यक्त होतात. ती

गोष्ट हीकीं, मनुष्य एकदा मोठा झाला—मोठ्या पदास चढला—म्हणजे, तो, खरोखर कसाही असला तरी, आपल्या लहानपणाच्या सवयींची मोठी प्रौढी मिरवीत असतो, आणि, स्थानमहात्म्यानें ती त्याला शोभतेही. परंतु, त्याच्या योगानें सत्याचा लोप होतो, बोलणाऱ्याच्या जिभेस असत्याचा विटाळ होतो. तसें अबदुल रहिमानांचें नव्हतें. ही त्यांची सद्वृत्ति सगळ्या व्यवहरांत दृश्यमान होत होती. हें त्यांस मोठें भूषण होतें.

आशिया खंडांतल्या मामूल वहिवाटीप्रमाणें ह्या सुभेदाऱ्या पिढ्यानपिढ्या चालत असत. पिता कोठें बाहेर गेला, तर कारभार पुत्रास चालवावा लागे. तसा वेळ अबदुल रहिमान ह्यांस आला होता. ह्मणजे, अफजुलखान ह्यांस बल्क सोडून दोस्तमहंमदांच्या दरबारीं काबुलास यावें लागलें तेव्हां बल्क प्रांताचा कारभार अबदुल रहिमान ह्यांस हातीं घ्यावा लागला. तेव्हांची हकीकत त्यांनीं लिहिली आहे. ती अशीः—"मी आठ वाजतपर्यंत अभ्यास करीं. आठपासून दोनपर्यंत कचेरींत काम पाहीं. नंतर थोडी वामकुक्षि घेई. आणि तिसऱ्या प्रहरानंतर घोड्यावर बसून फिरावयास जाई."

ह्यानंतर लवकरच दोस्तमहंमदांनीं अबदुल रहिमान ह्यांस ताशकरघान ह्या प्रांताचे सुभेदारीवर नेमिलें, आणि लागलाच तिकडे जाण्याचा हुकूम दिला. त्याप्रमाणें १००० स्वार आणि २००० पायदळ बरोबर घेऊन ते तिकडे गेले. आणि त्या प्रांताचे पहिले सुभेदार महमद अमीनखान ह्यांपासून तें काम त्यांनीं आपले हातीं घेतलें. ह्यांस साह्य करण्याकरितां ह्यांच्या वडिलांनीं हैदरखान ह्या नांवाचे एक गृहस्थ पाठविले. त्यांच्या साह्यानें, अबदुल रहिमान ह्यांनीं ह्या

नव्या प्रांताचा कारभार फार उत्तम रीतीनें चालविला. येथीलही आपली दिनचर्या त्यांनीं लिहून ठेविली आहे. ती अशी:—"सकाळपासून नऊ वाजतपर्यंत अभ्यास. नऊपासून दोनपर्यंत दरबार. नंतर तासभर निद्रा. आणि मग लष्करी कामाचा अभ्यास, फिरायास जाणें खेळणें वगैरे." असें पांच साहा महिने चालल्यावर त्यांचीं मातापितरें त्यांस तेथें भेटायास आलीं. तेव्हां उभयपक्षीं अत्यानंद झाला. नंतर कांहीं दिवसांनीं तीं उभयतां तेथून निघून गेलीं.

ह्यापुढें दोन वर्षांनीं अफझुलखान ताशकरघान येथें पुनः आले, आणि प्रांताचा हिशेब पाहूं लागले. तों त्यांस असें आढळून आलें कीं, अबदुल रहिमान ह्यांनीं कितीएक लष्करी लोकांस बक्षिसें दिल्यामुळें आणि गरीब रयतेची कींव करून तीस करांची थोडीशी माफी केल्यामुळें उत्पन्न बरेंच कमी झालें आहे. हें त्यांस आवडलें नाहीं. आणि त्यांनीं ती सूट वसूल करून घेण्याचा निश्चय केला. तें पाहून अबदुल रहिमान ह्यांस फार वाईट वाटलें, आणि तसें न करण्याविषयीं त्यांनीं वडिलांस पुष्कळ सांगितलें. परंतु, तें सगळें व्यर्थ गेलें. त्यांनीं लाख रुपये रयतेपासून वसूल करून घेतले, आणि मग ते तेथून निघून बल्क येथें गेले. हा अपमान अबदुल रहिमानांस सहन झाला नाहीं. त्यांची पायाची आग मस्तकास गेली, आणि त्यांनीं लागलाच त्या प्रांताच्या सुभेदारीचा राजीनामा दिला. आणि मग तेथून निघून, ते, बल्कशहराजवळ त्यांच्याकरितां अफजुलखानांनीं तक्तपुल येथें जी एक मोठी शाळा बांधिली होती, त्या शाळेंत येऊन, आपला अभ्यास करूं लागले.

अफजुलखानांच्या सैन्याचा मुख्य सरदार क्यांबेल हा एक इंग्लिश गृहस्थ होता. त्यानें आपणास जनरल सर महंमदखान असें नांव घेतलें होतें. त्याच्या स्वाधीन ३५०० फौज होती. आणि बारा तोफा होत्या. तो फार चांगला हुशार आणि प्रामाणिक माणूस होता. त्याला लष्करांचें काम उत्तम येत असून तो वैद्यकींतही निपुण होता. त्याच्या हाताखालीं कामकाज शिकण्यास अबदुल रहिमान ह्यांस अफजुलखानांनीं दोन वर्षेंपर्यंत ठेविलें. त्यांपाशीं ते वैद्यविद्या आणि शस्त्रास्त्रविद्या शिकले. त्याविषयीं त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "मध्य रात्रीस माझे धडे आणि कामें आटोंपल्यावर मी त्या शाळेंत जात असें, आणि तेथें बंदुका करण्याचें काम शिकत असें. तेथें मला इतक्या चांगल्या बंदुका करितां येऊं लागल्या कीं, तशा बंदुका माझ्या शिकविणारांस देखील करितां येत नसत." तें पाहून, अबदुल रहमानखान ह्या नांवाच्या एका दुष्ट माणसास त्यांविषयीं अतिशयित मत्सर उत्पन्न झाला, आणि तो त्यांच्या नाशाच्या उद्योगास लागला. त्याजवर अफजुलखानांचा विश्वास फार होता. त्यामुळें तें त्याला काम चटकर करतां आलें. तें असें. त्यानें एके दिवशीं, चांगली वेळ पाहून, अफजुलखानांपाशीं अबदुल रहिमानांची पुष्कळ नालस्ती केली, आणि त्यांच्या मनांत भरवून दिलें कीं, अबदुल रहिमान ह्यांस दारू पिण्याचें आणि गांजा ओढण्याचें व्यसन लागलें आहे. तें ऐकून अफजुलखानांचें माथें फिरलें. तें अबदुल रहिमानांस कळतांच, त्यांनीं बल्क येथून पळून जाऊन हिरात येथें आपल्या सासऱ्याच्या येथें राहावें, असा गुप्त बेत केला. तो त्यांच्या नौकरांकडून फुटला. तो अफजुल-

खानांच्या कानीं जातांच त्यांनीं एकदम त्यांस आणि त्यांच्या साथीदारांस पकडून, त्यांच्या पायांत बिड्या ठोकून त्यांस तुरुंगांत ठेविलें. तेथें त्यांना बारा महिने काढावे लागले !

इतक्यांत सर महंमदखान मरण पावला, आणि त्याच्या जागेवर अफजुलखानांनीं अबदुल राफखान ह्या गृहस्थांस सेनापति नेमण्याचें ठरविलें. परंतु, त्यांनीं अफजुलखानांस असें ह्मटलें कीं, आपले चिरंजीव अबदुल रहिमान सध्या कारागृहांत आहेत, त्यांस झाली शिक्षा ती बस आहे, ते ह्या जागेस खरोखर योग्य असतां, त्या जागेवर आपण जाणें मला प्रशस्त वाटत नाहीं. ही जागा त्यांसच दिली पाहिजे. हें त्यांचें ह्मणणें प्रथम त्यांस पटलें नाहीं. परंतु, शेवटीं त्यांचें मन वळलें. आणि त्यांनीं अबदुल रहिमान ह्यांस बोलावावयास पाठविलें. ते तसे, पायांतल्या बिड्यांसह, नीट तुरुंगांतून आपल्या पित्यापुढें येऊन उभे राहिले. त्यांकडे पाहून अफजुलखानांच्या नेत्रांतून अश्रुधारा वाहूं लागल्या. आणि ते त्यांच्या खांद्यावर हात ठेवून ह्मणाले, "कां रे बाबा तूं असा कां वागतोस ?" त्यांस अबदुल रहिमानांनीं उत्तर दिलें, " बाबा, मीं कांहींएक केलें नाहीं. जे कोणी लोक आपणांस तुमचे हितचिंतक ह्मणवितात, त्यांच्या पायीं मला ही अवस्था प्राप्त झाली आहे." हें त्यांच्या तोंडांतून निघायास आणि अबदुल रहमानखान तेथें येण्यास अकस्मात गांठ पडली. त्याजकडे बोट करून, अबदुल रहिमान ह्मणाले, " ह्याच निमकहरामानें माझ्या पायांत बिड्या घालविल्या आहेत. ठीक आहे. वेळ येऊं द्या. ह्मणजे दुधापाण्याचा निवाडा आपोआप होईल. " त्यावर अबदुल रहमखान ह्याच्या तोंडांतून एक अक्षर निघालें नाहीं. तो तोंड खालीं करून

उभा राहिला. नंतर, अफजुलखान सगळ्या दरबाराकडे पाहून ह्मणाले, "सरदारहो, हा आमचा वेडा मुलगा तुह्मांवर सेनापति करून ठेविला आहे." त्यांस त्या सरदारांनीं एकदम उत्तर दिलें, "नाहीं नाहीं महाराज, हे वेडे नाहींत. हे चांगले शाहाणे आहेत, असें आपणांसही आढळून येईल. ह्यांस जे कोणी नांवें ठेवितात, ते लबाड अराजनिष्ट आहेत." नंतर, अबदुल रहिमानांस सेनापतीचीं वस्त्रें दिलीं.

ह्या प्रकारेंकरून अबदुल रहिमान हे सेनापति झाले, आणि त्यांनीं आपलें काम चागल्या रीतीनें चालवून लोकांत आपला दरारा बसविला. त्या वेळीं राज्यामध्यें स्वस्थता होती, आणि दोस्तमहंमदांचे मुलगे आपापल्या प्रांतांच्या सुभेदाऱ्या शांतपणें चालवीत होते. तरी, दोस्तमहंमदांच्या मागें काबूलचे अमीर व्हावयाचे कोण, हा एक मोठा विषय लोकांच्या मनांत घोळत होता. त्याचें कारण असें होतें कीं, दोस्तमहंमदांची इच्छा अशी होती कीं, आपल्या सोळा मुलांपैकीं तिसरा मुलगा शेरअल्ली ह्यानें आपल्या मागें काबूलच्या गादीवर बसावें. ह्मणून त्यांनीं त्याप्रमाणें, मरण्याच्या आधीं पांच वर्षे ठरवून ठेविलें होतें. तें अर्थात् त्यांचे दोघे वडीलभाऊ अफजूल आणि अजीम ह्यांस विषवत् झालें. तें तसेंच धुमसत होतें. पुढें इ. स. १८६३ ह्या वर्षीं दोस्तमहंमद हिरात येथें मरण पावले. तेव्हां शेरअल्ली काबूलच्या गादीवर बसले. त्यांनीं लागलेंच गव्हरनरजनरल लार्ड एलजिन ह्यांस आपण अमीर झाल्याचें कळविलें. तें पत्र पोंचलें तेव्हां ते अजारी होते. पुढें इ० स० १८६३ च्या नोव्हेंबर च्या २० व्या तारखेस ते धर्मशाळा येथें मरण पावले, आणि त्यांच्या जागीं सर विलियम

जेनिसन हे अॅक्टिंगप्रमाणें गव्हरनर जनरलाचें काम पाहूं लागले. त्यामुळें त्या पत्राचें उत्तर जाण्यास बराच उशीर लागला. तिकडे शेरअल्लींचे भाऊ त्यांवर उठले. इ० स० १८६४ च्या आरंभीं अफझुलखान हे आपणांस बल्कचे अमीर म्हणवूं लागले, अजीम हे कराम येथें मोठें सैन्य जमा करूं लागले, आणि दुसरा एक भाऊ कंदाहार येथें शिरजोर होऊन बसला.

ह्या सगळ्यांशीं लढण्याची तयारी शेरअल्लींस करावी लागली. त्यांनीं अजीमखानांवर सैन्य पाठविलें, त्यानें त्यांचा पराभव केला, तेव्हां ते पळून हिंदुस्थानांत आले, आणि इंग्लिश सरकारचा आश्रय धरून राहिले. ह्यांस आश्रय देणें हिंदुस्थान सरकारास विशेष अगत्याचें वाटल्याचें कारण असें होतें कीं, इ० स० १८५७ ह्या वर्षी हिंदुस्थानांत शिपायांचें बंड झालें होतें, तेव्हां अफगाणिस्थानांतले बिथरलेले लोक त्या शिपायांस मिळण्यास एका पायावर तयार असतां, अझीमखानांनीं दोस्तमहंमदांस चांगली पोक्त सल्ला देऊन, त्यांच्या द्वारें त्या लोकांच्या डोक्यांतलें वेड घालविलें होतें, त्याच्या योगानें मोठें विघ्न टळलें होतें, हें हिंदुस्थान सरकारच्या लक्षांत होतें. अजीमखानांची अशी व्यवस्था लागल्यावर, शेरअल्ली अफजुलखानांचा समाचार घेण्यास निघाले. त्या भावांची गांठ बाजगाह येथें इ० स० १८६४ च्या जून महिन्यांत पडली. तेव्हां त्यांची लढाई झाली. परंतु तींत जय असा कोणालाच आला नाहीं. तेव्हां शेरअल्लींनीं आपला वकील अफजुलखानांकडे पाठवून, गोडगोड बोलून, त्यांस वश करून घेतलें. परंतु, पुढें त्याची गांठ पडून काय

होणार हें भविष्य जाणून, अबदुल रहिमानांनीं आपल्या वडिलांस म्हटलें कीं, आपली आज्ञा असल्यास, शेरअल्ली इकडे येतील तेव्हां मी त्यांस एकदम कैद करीन. परंतु, अफजुलखान फार भोळे होते. ते त्यांस हातांत कुराण घेऊन म्हणाले, "अरेबा, हें आपलें धर्मशास्त्र आहे. ह्याची शपथ तुला आहे. तूं असें पापकर्म करूं नको." त्यावर अबदुल रहिमानांनीं उत्तर दिलें, "मर्जी आपली! पण आपण लक्षांत ठेवा, काका विश्वासघात करावयास चुकावयाचे नाहींत." तेंच खरें झालें. अफजुलखान चांगले स्वाधीन होतांच शेरअल्लींनीं त्यांच्या पायांत बिड्या घालून त्यांस प्रतिबंधांत टाकिलें. असें इकडे चाललें असतां, अबदुल रहिमान हे तक्तपूल येथें लढाईचीं हत्यारें तयार करण्यांत गुंतले होते. म्हणजे, ह्या वेळेपर्यंत, ते जरी कधीं मधीं लहानसहान बंडांवर स्वाऱ्या करून गेलेले होते, तरी, मोठ्या, भाईबंदीच्या राजकारणांत पडले नव्हते. ह्याचा अर्थ आम्ही असा समजतों कीं, ह्या वेळेपर्यंत ह्यांस जो काय उद्योग करावा लागला, तो सगळा त्यांच्या शिक्षणादाखल होता, त्यांस पुढें जें काय करावयाचें होतें, त्याच्या सिद्धतेची ती सगळी तयारी होती. येथें असा विचार मनांत येतो कीं, प्रौढपणीं जो व्यवसाय करावा लागावयाचा, तो चांगल्या-प्रकारें करितां यावा, अशा शिक्षणाचा योग लहानपणांत यावा, ही गोष्ट भाग्यशाली पुरुषांच्या चरित्रांत आढळून येते, हें ईश्वरी सूत्र आहे. त्याप्रमाणें अबदुल रहिमान ह्यांचें बालपण येथें समाप्त होऊन त्यांच्या प्रौढपणास आरंभ झाला असें म्हटलें पाहिजे. ह्यासाठीं हा भाग येथें पुरा करणें बरें दिसतें.

---

# भाग तिसरा.

—:०:—

## राजकारणांत प्रथम प्रवेश.

अफजुलखानांची अशी अवस्था केल्यावर शेरअल्लींनी बल्क येथें अबदुल रहिमानांस असें सांगून पाठविलें कीं, तुम्ही एकाद्या भलत्याच घमेंडींत न राहतां, एकदम काबुलास येऊन आमच्या आश्रयास राहावें हें बरें आहे. परंतु, अबदुल रहिमानांनीं त्यास जुमानिलें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर, ते शेरअल्लींवर हल्ला करण्याच्या विचारांत होते. इतक्यांत त्यांस एक निनांवी पत्र मिळालें. तें अफजुलखानांकडचें असावें, असें त्यांस वाटलें. त्या पत्रांत असें लिहिलें होतें कीं, तुम्हीं एकदम देशत्याग करावा, विलंब लावूं नये. त्याप्रमाणें ते लागलेच आक्सस नदीकडे चालते झाले.

आक्सस नदीच्या अर्ध्या मजलीवर ते गेले तेव्हां, त्यांच्या ताब्यांतल्या कांहीं लोकांनीं त्यांस पुढें न जाण्याविषयींची आणि आपल्या साह्यास येण्याविषयींची विनंती एका स्वाराबरोबर सांगून पाठविली. त्या वेळीं, आपली स्थिति जाणून, ते ह्मणाले, "काय करावें! माझे हे लोक किती तरीं शाहाणे आहेत! आपले जीव बचावण्यास पळून न जातां, ते माझ्याकरितां जीव देण्यास तयार आहेत! लढाईच्या कामांत शिपायाला तेवढें शौर्य-च लागतें असें नाहीं. संकटसमयीं आपला बचाव करण्याची युक्तिही त्याला असली पाहिजे. संकटांतून सुटणें हा देखील एकप्रकारचा जय आहे." असें ह्मणून, आणि प्रसंग जाणून ते पुढें चालते झाले.

पुढें ते आक्सस नदीच्या जवळ जवळ गेले तेव्हां, त्यांनीं आपणांबरोबरच्या बाकीच्या स्वारांस थोडें मागें राहायास सांगून, ते आपण स्वतः एका स्वारानिशीं नदीच्या कांठीं गेले. तेव्हां पाहूं लागले तों तेथें सगळी एकच नाव होती. आणि तींत बदाम वगैरे कांहीं माल भरण्याचा विचार नावाडी आणि व्यापारी करीत होते. अबदुल रहिमान घोड्यावरून उतरून त्या लोकांजवळ जातांच त्यांनीं, तुर्की भाषेनें, तुमचें नांव काय ह्मणून त्यांस विचारिलें. त्यांस आह्मी व्यापारी आहों ह्मणून अबदुल रहिमानांनीं उत्तर दिलें. आणि मग त्या नावाड्याशीं नावेविषयीं बोलणें लावून, त्या स्वारांस इशारा करून, मागें ठेवलेल्या स्वारांस त्यांनीं बोलावून आणिलें. ते स्वार पाहतांच ते नावाडी आणि व्यापारी अगदीं चकित झाले, आणि भयभीत होऊन चूप बसले. तरी, ते ती नांव आपले स्वाधीन करून घेत आहेत असें पाहून, अबदुल रहिमानांनीं लागल्याच आपल्या बंदुका त्यांजकडे रोंखिल्या, आणि दडावून म्हटलें, "नावेंत पाय तर ठेवा कीं आतां गोळ्या घालून ठार मारतों." तेव्हां, त्या लोकांनीं, हे कोण काय हें स्वारांस विचारून घेतलें. आणि ते अबदुल रहिमान आहेत असें कळल्यावर त्या सर्वांनीं, मोठ्या आदबीनें त्यांस सलाम केले. नंतर, अबदुल रहिमान आणि त्यांची सारी मंडळी, त्या नावेंत बसून आक्सस नदी पार गेली.

ह्यानंतर अबदुल रहिमान हे बुखारा देशांत गेले. तेथल्या राजाकडून त्यांस कांहीं मंडळी सामोरी आली. बुखारा शहरांत पोंचल्यावर, राजा, त्याचा वजीर आणि काजी ह्यांनीं त्यांचा उत्तम आदरसत्कार केला, आणि त्यांस राहायास

उत्तम वाडा दिला. त्या राजानें त्यांस नऊ दिवस मेजवान्या दिल्या, आणि स्वतः अबदुल रहिमानांस आणि त्यांच्या बरोबरच्या मंडळीस पुष्कळ नजराणे पाठविले. सोन्याच्या मुलाम्याचीं दोन खोगिरें धाडिलीं. त्यांच्या मोबदला अबदुल रहिमानांनीं त्या राजास सोन्याच्या मुठीची तरवार, एक लाख तीस हजार रुपये किंमतीचीं दोन सोनेरी नक्षीचीं खोगरें, २०० मोहरा, रत्नजडित पट्टा, दोन आरबी घोडे, इत्यादि पुष्कळ वस्तु परत नजर पाठविल्या.

असें इकडे होत असतां अफगाणिस्थानाकडे एक लहानशी गोष्ट घडली. तीवरून दिसतें कीं, मुसलमान लोकांच्या तेव्हांच्या स्त्रियांत देखील राजकारस्थानीपणा वसत होता. अफजलखान ह्यांची बायको बिबि मारवारिद—म्हणजे अबदुल रहिमानांची सापत्न मातुश्री, हिनें, आपले दीर अजीमखान, हिंदुस्थानांत इंग्लिशांच्या आश्रयास रोऊन राहिले होते, त्यांजकडे २५००० रुपये पाठवून त्यांस असें लिहिलें कीं, "तुमचे आगांत जर कांहीं शौर्य असलें, तर तें दाखविण्याची वेळ ही आहे. आणि जर तुम्हांला धैर्य मुळीं नसेलच, तर ही रकम खरचून आपल्याकरितां एक खेंडा घेऊन ठेवा म्हणजे आईत्या वेळेस धांदल व्हावयास नको." हा टोमणा फार मोठा होता. तरी, अजीमखानांनीं त्या वेळीं निमूटपणें सोशिला, आणि आलेल्या पैशानें अफगाणिस्थानांत परत येण्याची तयारी केली. ते, नानाप्रकारचीं संकटें सोशीत सोशीत, इ० स० १८६५ च्या अखेरीच्या सुमारास, स्वात आणि चित्रळ देशांतून येऊन, आकूसस नदी उतरून बदकशान देशांत आले. तेथें त्यांचें चांगलें आगतस्वागत झालें. आणि तेथल्या

संस्थानिकानें त्यांशीं आपल्या मुलीचें लग्न लावून दिलें, आणि त्यांस दोन हजार स्वार दिले. म्हणजे ते जे अज्ञातवासांत जाऊन पडले होते, ते ह्या राजकारणोत्तेजक निरोपानें पुनः राजकारस्थानांत आले.

पुनः तिकडे बुखाऱ्यास अबदुल रहिमानही स्वस्थ बसले नव्हते. तेथें मुझाफरेड नांवाचा राजा राज्य करीत होता. तो रशियनांच्या स्वाधीन झालेला नव्हता, आणि तो अबदुल रहिमान ह्यांचा सासरा होता. तेव्हां त्याचा आश्रय श्रेयस्कर होण्यासारखा होता. मुझाफरेड ह्यास शेरअलींचा विश्वासघातकीपणा कळला होता, आणि त्यावरून त्यास त्यांची चीड आली होती. म्हणून त्यानें अबदुल रहिमान ह्यांस पुष्कळ नजर नजराणे देऊन, पांच हजार सैन्य देण्याचा निश्चय केला. तरी, अबदल रहिमान आपली पदवी राखून होते. ते त्याचे अंकित झाले नाहींत. एके वेळीं दरबारांत त्यास जमिनीपर्यंत डोकें वांकवून राजास सलाम करण्याविषयीं दरबारच्या लोकांनीं वहिवाट सांगून, पुष्कळ आग्रह केला. परंतु, अबदुल रहिमान ह्यांनीं तें मान्य न करितां, साफ सांगितलें कीं, "मला परमेश्वरानें उत्पन्न केलें आहे, आणि जमिनीपर्यंत मस्तक वांकवून, त्याच्याशिवाय दुसऱ्या कोणालाही मी वंदन करणार नाहीं. हें तुम्हांस पुरवत नसलें, तर राजाला जाऊन सांगा. आणि त्यांसही जर हें न आवडलें, तर मला दुसऱ्या देशास जाणें भाग आहे" त्याप्रमाणेंच, त्यांस बुखाऱ्याच्या दरबारांत एक मोठे कामदार होऊन स्वस्थ राहण्याविषयींही पुष्कळ आग्रह झाला. परंत, त्याविषयीं त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, "नौकर होऊन कसें वागायाचें तें मला मुळींच ठाऊक

नाहीं. मी कधीं नौकर व्हावयाचा नाहीं." त्यावर त्यांना कोणीं असें सांगितलें कीं, ह्या तुमच्या नाकबुलीनें राजास राग येईल, आणि त्यापासून तुम्हांला त्रास होईल. त्यास त्यांनीं साफ सांगितलें कीं, "पापाशिवाय ताप व्हावयाचा नाहीं. मीं पाप केलें नाहीं, म्हणून मला तापाचें भय नाहीं." ही निष्ठा मोठ्या साधूस शोभण्यासारखी आहे.

ह्या वेळची हकीकत अबदुल रहिमान ह्यांनीं आत्मचारित्रांत सविस्तर लिहिली आहे. तींत त्यांनीं ह्मटलें आहे:—"बुखाऱ्याचे राजे मशीदींत निमाजाकरितां बसले असतां, त्यांच्या पागोट्याच्या पट्टया त्यांच्या गळयांत येऊं लागल्या, त्या मीं, आपला निमाज जरा एकीकडे ठेवून, सांवरिल्या. माझ्या निमाजांत व्यत्यय आला खरा, पण मी एक चांगलें काम केलें, असें मला वाटलें. राजा जावयास निघाला, तेव्हां, सगळ्या मंडळीनें अगदीं जमिनीपर्यंत वांकून त्यास सलाम केले. पण मी तसाच उभा राहिलों, आणि कांहीं वेळानें आपल्या बिऱ्हाडीं गेलों. पुढें मला असें कळलें कीं, राजास माझ्या वागण्याचा राग येऊन त्यानें मजवर कुलस्त्रियांशीं दुराचार केल्याचा वृथा आरोप घालण्यास आपल्या कोतवाळास सांगितलें आहे. त्यास मीं असें दाखवून दिलें कीं, मजबरोबर अगदीं अष्टौप्रहर साठ सत्तर माणसें असतात, मी एकटा असा कधींही नसतों. तेव्हां त्यांचीं तोंडें बंद झालीं." अशा कितीएक गोष्टी झाल्यावर, आणि अफगाणिस्थानाकडचें वर्तमान कळल्यावर, अजीमखानांस, अफगाणिस्थानांत येण्याविषयीं लिहून पाठवून, ते, आपले पांच हजार लोक, आणि अफजुलखानांच्या पक्षाचे जे दोनशें लोक अबदुल रहिमानांच्या बरोबर बुखाऱ्यास गेले होते ते, असें सगळें सैन्य घेऊन आक्सस

नदी उतरून आलीकडे आले. त्या उताराजवळचा आकचा हा प्रांत एका संस्थानिकाकडे होता. तो संस्थानिकही त्यांस मिळाला. ह्याशिवाय असे दुसरे कितीएक सरदार त्यांस वाटेंत मिळाले. त्यांच्या योगानें त्यांचें सैन्यबळ चांगलें वाढलें, आणि त्यांस एकदम बल्कवर येण्यास मोठी उमेद आली.

इकडे शेरअल्लींची धांदल उडून राहिली होती. त्यांचे सखे भाऊ अमीनखान आणि शरीफखान हे दोघे एकत्र होऊन कंदाहाराहून त्यांजवर चाल करून येत होते. त्यांशीं तोंड देण्यास जाण्याच्या आधीं शेरअल्लींनीं, आपली सगळी स्थिति हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल सर जान लारेन्स ह्यांस कळविली, आणि त्यांचा स्नेह संपादण्याचा प्रयत्न केला. त्यांस सर जान लारेन्स ह्यांनीं लिहिलें कीं, "परमेश्वरानें असे योग घडवून आणावे कीं, त्यांच्या योगानें अमीर साहेबांच्या सगळ्या अप्तांच्या ठायीं परस्परांविषयीं आदरबुद्धि उत्पन्न व्हावी, तिनें अफगाणिस्थानांत शांतता होऊन, राज्य आनंदानें चालावें, असें आम्ही मनापासून इच्छितों." ही इच्छा चांगली होती खरी. परंतु, ती सिद्धीस जाण्यास वेळ राहिला नव्हता. रान सगळें बिघडून गेलें होतें, आणि खडाजंगीशिवाय दुसरा मार्गच उरला नव्हता.

अमीनखान आणि शरीफखान हे दोघे भाऊ कंदाहाराहून निघाल्याचें वर सांगितलेंच आहे. ते जवळ येऊं लागल्याचें वर्तमान कळतांच शेरअल्ली सैन्यासहवर्तमान त्यांवर चालून गेले. ह्या दोन सैन्यांची लढाई इ० स० १८६५ च्या जून महिन्याच्या पांचव्या तारखेस काजबाज येथें झाली. ती एकसारखी दोन तास चालली होती. प्रथमारंभीं कंदाहारच्या

सैन्याची सरंशी झाल्यासारखी दिसली. ती पाहून शेरअलींस मोठा खेद आला, आणि त्या समरांगणांत त्यांचे वडील चिरंजीव महंमदअल्ली होते, त्यांस ते लाजवून कांहीं उणें उत्तर बोलले. तें ऐकून मोठ्या आवेशानें ते जे घनघोर युद्धांत पुढें सरले, ते एकदम, आपले चुलते अमीनखान ह्यांशीं हातांत तरवार घेऊन मोठ्या निकरानें लढूं लागले. तेव्हां अमीनखानांनीं कमरेचें पिस्तूल काढून महंमदखानांवर झाडलें. त्यासरसे ते पडून मरण पावले. तें पाहून अमीर शेरअल्लींच्या एका शिपायानें अमीनखानांचें डोकें तरवारीनें तोडून त्यांचा प्राण घेतला. शेवटीं अमीर शेरअल्ली ह्यांस जय मिळाला. तो फार महाग पडला. कां कीं, शेरअल्ली ह्यांस पराकाष्ठेचा पुत्रशोक झाला. कांहीं वेळानें ते कंदाहारास जाऊन राहिले. ते कितीएक दिवस पर्यंत कोणाजवळ बोलत देखील नसत. भ्रमिष्टासारखे एकांतांत बसत असत. आणि असें ह्मणत कीं, ही राज्याची पीडा मला नको, मीं आतां इंग्लिशांच्या किंवा रशियनांच्या आश्रयास जाऊन स्वस्थ रहातों. एकदां तर त्यांनीं त्या भ्रमांत मध्यरात्रीं एका तळ्यांत उडी घेतली होती. परंतु त्यांस त्यांच्या एका चाकरानें त्यांतून बाहेर काढिलें.

अबदुल रहिमान आक्सस नदी उतरून काबुलाकडे येण्यास निघाल्याचें वर सांगितलें आहे. ते इकडे येत असतां वाटेंत बामियन येथें त्यांस अजीमखान येऊन मिळाले. ते काबुलावर येत आहेत असें कळल्यावर, तेथले लोक, शेरअल्लींचा पक्ष सोडून देऊन, त्यांच्या विरुद्धपक्षास मिळूं लागले. कां कीं, त्यांस शेरअल्लींची गति बरी दिसली नाहीं. अबदुल

रहिमान आणि अजीमखान हे मार्गांतील लोकांस आपणाकडे वळवींत वळवीत, इ० स० १८६६ च्या फेब्रुआरी महिन्याच्या २४ व्या तारखेस काबूल शहरांत आले. तेव्हां तेथलें लष्कर त्यांस शरण येऊन त्या ठिकाणीं त्यांचा चांगला अंमल बसला.

हें वर्तमान शेरअल्लींस कळतांच ते मोठ्या आवेशानें मोठें सैन्य बरोबर घेऊन, काबुलाकडे चालले. त्यांशीं सामना करण्यास इकडून अबदुल रहिमान निघाले. ह्या दोन सैन्यांची मोठी लढाई, इ० स. १८६६ च्या मे महिन्याच्या दाहाव्या तारखेस सौदाबाद येथें झाली. तेव्हां अबदुल रहिमानांकडे एकंदर ७००० सैन्य होतें, आणि शेरअल्लींकडे २९००० असून शिवाय ५० तोफा होत्या. युद्ध फार भयंकर झालें. ह्याविषयीं अबदुल रहिमानांनीं लिहिलें आहे:-" जिकडे तिकडे धूरच धूर झाला. सूर्य देखील दिसेना. सायंकाळच्या चार घटिका दिवसास युद्ध आटपलें. त्यांत आह्मांकडचे मेले आणि जखमी झाले ह्यांची एकंदर गणती २००० झाली, आणि शेरअल्लींकडचे लोक कमींत कमी ह्मटले तरी ह्यांच्या तिप्पट पडले असले पाहिजेत. त्या प्रसंगीं देवानें मला जय दिला. आणि मीं लागलीच एक तुकडी, माझे वडील गिझनीस प्रतिबंधांत ठेविलेले होते, त्यांस सोडवून आणण्यास रवाना केली. परंतु, ती त्या जागीं पोंचण्याच्या आधींच आमच्या जयाचें वर्तमान तेथल्या लोकांस कळल्यावरून, त्यांनीं माझे वाडलांस बंधमुक्त केलें होतें. त्यांच्या बरोबर दुसरेही कितीएक सरदार बंधमुक्त झाले होते. "

गिझनीहून अफ़ज़ुलखान निघून चिरंजीवांकडे आले. त्यांस पाहून अबदुल रहिमानांस फार संतोष झाला. त्याविषयीं त्यांनीं लिहिलें आहे:–" मी घोड्यावरून खालीं उतरून वडिलांच्या पायां पडलों, आणि त्यांची बंधमुक्तता केल्याबद्दल देवाचे फार फार उपकार मानिले. " नंतर अबदुल रहिमानांच्या मनांत, शेरअल्लींचा समाचार घेण्यास लागलेंच हिरातेकडे जावयाचें होतें. परंतु, वडिलांच्या आग्रहास्तव ते सगळे पुन: काबुलास गेले. तेव्हां काबूलच्या लोकांस फार आनंद झाला. त्यांनीं त्यांचें फार आगतस्वागत केलें. ते पितापुत्र राजवाड्यांत गेले, आणि अबदुल रहिमानांनीं इ० स० १८६६ च्या मे महिन्याच्या २१ व्या तारखेस बालाहिसार राजवाड्यांत आपल्या तीर्थरूपांस गादीवर बसवून त्यांच्या नांवाची द्वाही फिरविली, त्यांच्या नांवानें कुतबा पढला, आणि ते काबूलचे अमीर ह्मणून त्यांस सगळे मानपान दिले आणि देवविले. अबदुल रहिमानांसारखे पराक्रमी आणि पितृभक्त पुत्र पोटीं येणें हें कांहीं सामान्य भाग्य नव्हे.

ह्या वेळीं सर जान लारेन्स ह्यांनीं विलायत सरकारास लिहिलें:—" पुढें काबुलांत काय होईल, ह्यांचा कांहीं नेम सांगवत नाहीं. कदाचित् शेरअल्ली हे अमीर होतील. त्यांच्या ठायीं राजाचे पुष्कळ चांगले गुण आहेत, तसे कांहीं अवगुणही आहेत. त्यांस पुष्कळ सरदार प्रतिकूल झाले आहेत, ह्यांत कांहीं संशय नाहीं. शिवाय, अफ़ज़ुलखान ह्यांविषयीं एवढ्या आणाशपता वाहून, त्यांनीं, विश्वासघात करून, त्यांस कैद केलें, ह्यावरून त्यांवर कोणत्याही प्रकारें

विश्वास ठेवितां येत नाहीं, असें झालें आहे. तथापि, अफगाण सरदारांच्या आणि राजांच्या वर्तनाचा विचार ख्रिस्ती धर्मनीतिदृष्टीनें करणें योग्य नाहीं. त्याप्रमाणेंच, सरदार लोक त्यांस पुन: अनुकूल होणार नाहींतच, असाही कांहीं नेम सांगवत नाहीं."

ह्या प्रसंगीं इंग्लिश सरकाराचा संबंध अफगाणिस्थानच्या अमीरांशीं कसा होता, तें थोडेंसें लक्षांत येण्यास, तेव्हांचे हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल ह्यांनीं नवे अमीर अफजुलखान ह्यांस काय लिहिलें, त्याचा गोषवारा येथें देतों.—"अमीर शेअरअल्ली ह्यांनीं इंग्लिश सरकारास कोणत्याही प्रकारें दुखविलें नाहीं, शिवाय त्यांचा अंमल अद्याप कंदाहार आणि हिरात ह्यांवर आहे, ह्या स्थितीमध्यें, त्यांच्याशीं पूर्वीं ठरलेल्या तहनाम्यांत व्यत्यय आणून वागणें हें इंग्लिश सरकाराच्या लौकिकास आणि थोरपणास शोभणार नाहीं. आपण जर काबूलचें सगळें राज्य एक करून चालवाल, आणि इंग्लिश सरकाराशीं मित्रभावानें वागण्याचा विचार कराल, तर, आपण अफगाणिस्थानचे अमीर आहांत असें समजून आह्मी आपणांशीं तह करण्यास तयार होऊं. परंतु, शेरअल्ली अफगाणिस्थानाच्या कांहीं भागावर राज्य करीत आहेत तोंपर्यंत आह्मांस त्यांचा पूर्वसंबंध तोडितां येत नाहीं."

अफझुलखान हे केवळ नामधारी अमीर झाले. त्यांचा अंमल काबूल आणि मध्य अफगाणिस्थान ह्यांत मात्र चालला होता. बल्कचा सुभेदार प्रथम मुळीं कोणत्याच पक्षाकडचा नव्हता, तो कांहीं वेळानें शेरअल्लींकडचा झाला. अब्दुल रहिमान हे एकटे आपल्या सैन्याच्या तयारींत मग्न होते.

परंतु, बाकी सगळा गोंधळ होता. सगळा राज्यकारभार अजीमखान, ह्मणजे अफझुलखानांचे बंधु पाहात असत. त्यांस तो आंवरेना. आणखी त्यांत अफझुलखान हे मोठे विलासी आणि दुर्व्यसनी होते. ते आपल्या चैनबाजींत गरक होऊन गेले. प्रजेची दुर्दशा झाली. जुलूम मी ह्मणून राहिला. महंमद राफिकखान ह्मणून एक चांगला योद्धा आणि राजकारस्थानी पुरुष होता. तो इंग्लिशांशीं स्नेहभावानें वागत असे. इंग्लिशांस त्यानें एक पत्र पाठविलें. त्यांत अफझुलखान ह्यांस अमीर न ह्मणतां वल्ही ह्मटलें होतें, एवढ्या कारणावरून, त्या पुरुषास अजीमखान ह्यांच्या आज्ञेवरून धरून, गळा दाबून ठार मारिलें. त्याचें प्रेत नग्न करून, तें गटारांत फेंकून दिलें. त्याचें घर लुटलें, आणि त्याच्या मुलांमाणसांस एका वस्त्रानिशीं घराबाहेर हांकून दिलें! अशी दुर्दशा केवळ ह्या एकट्याचीच नव्हे, तर शेंकडों माणसांची झाली. ह्यावरून तेव्हांच्या स्थितीची कल्पना सहज करितां येण्यासारखी आहे.

असें इकडे चालल्यामुळें तिकडे शेरअल्लींस चांगलें फावलें. त्यानीं कंदाहारच्या सावकारांपासून पुष्कळ पैसा उसना घेऊन नवें सैन्य ठेविलें, आणि इ० स० १८६६ च्या दिसेंबराच्या अखेरीस त्यांनीं आपल्या स्वारीचा मोर्चा काबुलाकडे फिरविला. त्याशीं सामना करण्यास इकडून अबदुल रहिमान आणि अजीमखान हे आपलीं सैन्यें घेऊन निघाले. त्यांची लढाई खिलातीघिलझाय येथें झाली. तींत शेरअल्लींचा पराभव झाला. तींविषयीं अबदुल रहिमानांनीं लिहिलें आहे:– "आह्मीं आपल्या स्वारांस शत्रूचें सामान लुटण्याची परवानगी दिली. आह्मीं त्याच्या ३९ तोफा घेतल्या."

ह्यानंतर शेरअल्ली तेथून हिरात येथें पळून गेले. तेव्हां अबदुल रहिमानांनीं मोठ्या थाटामाटानें कंदाहारांत प्रवेश केला.

ह्यानंतर उभय पक्षांच्या अशाच झटापटी चालल्या असतां, अमीर अफझुलखान हे इ० स० १८६६ च्या सप्तंबर महिन्यांत खितपून खितपून मरण पावले. तेव्हां वास्तविक ह्मटलें असतां, अबदुल रहिमान हे त्यांच्या गादीवर बसावयाचे. परंतु, त्यांना असें स्पष्ट दिसून आलें कीं, अजीमखान हे प्रबल आहेत; त्यांना पुष्कळ लोक अनुकूल आहेत; त्यांच्यापुढें आपलें कांहींच चालावयाचें नाहीं; उगाच फजीती मात्र होईल. ह्मणून तिसऱ्या दिवशीं त्यांनीं अजीमखानांस हात जोडून ह्मटलें "आतां आपण मला वडिलांच्या ठिकाणीं आहां, आपण अमीर व्हावें." त्यांस अजीमखान ह्मणाले, "तुह्मीं माजी अमीरांचे वडील चिरंजीव आहांत, तेव्हां तुह्मीं ह्यांच्या गादीवर बसावें हें रास्त आहे." त्यांस अबदुल रहिमान ह्मणाले, "काका, आपण वडील आहां, आपली दाढी पिकली आहे, आपण मजसारख्या मुलाच्या हाताखालीं राहणें योग्य नाहीं. आणि मी तरुण आहें. मीं जशी आपल्या वडिलांची सेवा केली, तशी आपली सेवा करीन." आणि त्यांनीं अजीमखानांस गादीवर बसवून, त्यांच्या नांवाची द्वाही फिरविली. आणि ते स्वतः त्यांच्या हाताखालीं सेनापति झाले. लोभास एकीकडे ठेवून प्रसंग पाहून वागणें हें मोठें शहाणपण आहे. तें थोड्यांना असतें.

आपल्या चुलत्याला गादीवर बसवून, आणि आपल्या वडिलांचें और्ध्वदेहिक उत्तम प्रकारें करून, अबदुल रहिमान काबुलांतून सैन्यासहवर्तमान निघाले. ते, शेरअ-

ल्लींस हांकून लावण्याकरितां हिंदुकुशपर्वताकडे गेले. हें वर्तमान ऐकून शेरअल्ली हिरातेकडे गेले. अबदुल रहिमानां-बरोबर सैन्य बरेंच होतें. त्यांतले पुष्कळ लोक थंडीच्या कडाक्यानें मरण पावले. तरी ते न कच-रतां, बाकीच्या लोकांसहवर्तमान तसेच पुढें चालले. ते अकचा येथें आले. तेथें त्यांस लोकांचा कल आपणांविरुद्ध दिसला. ह्मणून दरारा बसण्याकरितां त्यांनीं तेथल्या दोन पुढारी लोकांस जीवंत पुरलें. तेव्हां बाकीचे सगळे लोक त्यांस शरण आले. पुढें ते मेमाना येथें गेले. तेथें कांहीं चांग-लेंसें जमलें नाहीं. तेथच्या किल्ल्याला त्यांनीं एक महिना-पर्यंत वेढा घातला, तेव्हां तो ता० १८ मे १८६८ रोजीं हातीं आला. तेथच्या संस्थानिकानें त्यांस दरसाल ४०००० मोहरा खंडणी देण्याचें कबूल केलें, आणि कांहीं चांगले घोडे नजर केले. तेथें त्यांस जाहांगिरी ह्या नांवाची एक मोठी तोफ मिळाली. ही मोंगलांच्या वेळची असावी ह्मणतात.

मैमाना येथें अबदुल रहिमानांस फार वेळ लागल्यामुळें त्यांस हिरातेकडे लवकर जातां आलें नाहीं. तेंच शेरअल्लींस पाहिजे होतें. तितक्यांत, मागचा बंदोबस्त नीट करण्याकरितां अबदुल रहिमान पुनः परत तक्तपुलास आले. तेव्हां तर तिकडे शेरअल्लींस चांगलेंच फावलें. त्यांचे चिरंजीव याकूबखान ह्यांनीं कंदाहार शहर घेतलें. आणि शेरअल्ली लागलेच इ० स० १८६८ च्या जूनच्या १७ वीस तेथें आले.

तिकडे अमीर अजीमखान एका फकीराच्या नादीं लागले. ते उठल्याबसल्या त्याच्या ह्मणण्याप्रमाणें चालूं लागले. त्याचें नांव सय्यदरोमी होतें. तो कानस्टांटिनोपलचा एक तुर्क होता.

तो इंग्लिशांचा हाडवैरी होता, आणि तो रशियाचा हेर होता, असें लोक समजत. परंतु तें अमीरांस कळेना. ते राज्यकारभाराकडे लक्ष देईनात. आणि तिकडे अबदुल रहिमानांचें काय झालें आहे तेंही पाहीनात. तेणेंकरून लोकांस त्यांविषयीं अतिशय अप्रीति उत्पन्न झाली. ही संधी साधून शेरअल्लींनीं हिरात, कंदाहार आणि गिझनी हीं आपले स्वाधीन करून घेतलीं. फक्त काबूल मात्र त्यांस घ्यावयाचें राहिलें. तें घ्यावयास ते इकडे आले, तेव्हां त्यांशीं सामना करण्याकरितां अबदुल रहिमान मोठ्या सैन्यासहवर्तमान काबुलांतून बाहेर पडले. त्यांच्या बरोबर सैन्य पुष्कळ होतें. परंतु, त्यांत फितूर मनस्वी होता. इस्माळखान-नामक एक सरदार थोड्या दिवसांमागें अबदुल रहिमान ह्यांच्या हाताखालीं मोठी तरवारबहादुरी करीत होता, तो आतां शेरअल्लींकडचा होऊन त्यानें काबूल घेतलें. तेथें लागलेच शेरअल्ली आले. तेव्हां आपला अंमल बसविण्यास त्यांस मुळींच अडचण पडली नाहीं. ते सप्तंबरच्या अकराव्या तारखेस गादीवर बसले, आणि त्यांच्या नांवाची द्वाही फिरली. तें हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल सर जान लारेन्स ह्यांस कळल्यावर त्यांनीं, अमीर साहेबांस स्वसंतोष प्रदर्शक अभिनंदनपर एक पत्र पाठविलें. त्यांत असें ह्मटलें आहे कीं, "आपणास अमिरी प्राप्त झाली आहे, हें आपल्या आंगच्या मोठ्या गुणांचें, धैर्याचें आणि निश्चयाचें फल आहे." आणखी, गव्हरनर जनरलांनीं अमीरसाहेबांस ६ लाख रुपये रोख आणि साडे तीन हजार बंदुका एवढा नजराणा पाठविला. अशा प्रकारें शेरअल्लींचा

जयजयकार झाला, तेव्हां अर्थातच, अजीमखान आणि अबदुल रहिमान ह्यांस देशत्याग करावा लागला. त्यांपैकीं, अजीमखान हे पुन्हा कधीं स्वदेशाला परत आलेच नाहींत. पण, अबदुल रहिमान आले. ती कथा पुढची आहे. पण त्याच्या आधीं अबदुल रहिमानांच्या वांट्यास वनवास आला होता. त्या वेळची त्यांची हकीकत फार चित्त-वेधक आहे. तिचें कथन प्रथम केलें पाहिजे.

---

# भाग चौथा.

## वनवास.

ह्या प्रसंगीं पांडव वनवासास गेल्याचें जें वर्णन पुराणां-तरीं केलें आहे, त्याची आठवण झाल्यावांचून राहत नाहीं. सभापर्वाच्या शेवटच्या अध्यायांत आहेः—

विदुर बोले सखेद वचन वस्त्रें अच्छादूनि वदन
धर्में केलें वनप्रयाण न बोलतां कवणासीं. १.
उभारूनि भुजा सरळा अवलोकीत क्रोधानळीं
हुंकार करीत महाबळी भीम गेला त्यापाठीं. २.
वाळुका घेऊनि वाममुष्टीं सव्य विखुरीत पृथ्वीतटीं
मस्तक चुळीत वीरजेठी गेला किरीटी वनवासा. ३.
कर्दमें लेपोनियां मुख सहदेव जातां देखिती लोक
जैसा अभ्रपडळें अर्क आच्छादिला न लोपे. ४.
मृत्तिका चर्चूनि सर्वांगीं नकुळ गेला धर्ममार्गीं
जैसा योगी सिहसंगीं ब्रह्मतेजें विराजे. ५.

केश मोकळे झाडीत हस्तीं गेली द्रौपदी महासती
हृदयानळा आश्रुपातीं शांतवीत सिंचनें. ६.
दर्भमुष्टी धरे नि धौम्य पढत अंत्येष्टीचें साम्य
ज्येष्ठ कनिष्ठांचीं नांवें आलोटीत तर्पणा. ७.

मुक्तेश्वर.

अशा वेगळ्या वेगळ्या कृति करण्याचें कारण धृतराष्ट्रानें विदुरास विचारिलें. त्याचें उत्तर त्यानें दिलें. तेंही श्रवणीय आहे.

आपुलें नयनें हव्यवाटीं भस्म होईल सर्व सृष्टी
म्हणोनि न पाहतां दृष्टी धर्म गेला जाणपां. १.
आणीक एक कारण येथें चौदा वर्षें कौरवप्रेतें
पाहों न शकें म्हणोनि हातें दृष्टि झांके दयाळू. २.
दोर्दंड अवलोकूनि क्रूर संकल्प नेमी वृकोदर
वधोनि धृतराष्ट्राचे कुमर सार्थक करीन भुजांचें. ३.
समुद्रींचे वालुकाकण इतुके विंधुनियां बाण
करीन कौरवांचें हनन साह्यसंगीं सर्वही. ३.
माझें सौंदर्य देखतां नयनीं भुलोनि जाती जनकामिनी
या लागीं नकुळें मृत्तिकाकणीं तनू घोळिली राजसा. ४.
माझें दुःख नकळो कोणा ह्मणुनि चिखल लावी वदना
सहदेव गेला तेही संज्ञा कुरुभूषणा जाणपां. ५.
अश्रुपातीं चौदा वर्षीं हृदय पिटितील मुक्तकेशा
धृतराष्ट्राच्या सर्वही स्नुषा उदकक्रिया करितील. ६.
एकशत कौरवनारी मजहून कष्ट भोगितील भारी
ऐसें द्रौपदी सुंदरी दावूनि गेली वनवासा. ७.
कौरवांची उत्तरक्रिया मींच सांगेन धर्मराया
कुश हस्तीं अर्पावया धौम्यें धरिले जाणपां. ८.

मुक्तेश्वर.

थोडें विषयांतर झालें. तरी, वाटाड्यानें बोलण्याच्या नादांत, प्रवासी लोकांस थोडा मार्ग चुकवून, रखरखीत सडकेवरून एकाद्या उत्तम उद्यानांत नेलें तर ते कांहीं त्यावर कोपाविष्ट होणार नाहींत, त्याला क्षमाच करतील, किंवा फार तर बोलघेवडा ह्मणतील, त्या न्यायानें ह्या विषयासंबंधानें, आमचे वाचक आह्मांस वागवितील, अशी आशा आहे. असो.

ह्या प्रसंगीं अजीमखान आणि अबदुल रहिमान ह्यांची स्थिति कशी झाली होती, हें सगळें तपशीलवार कथन कंटाळवाणें होईल. ह्मणून, त्याचा थोडासा अंश, अबदुल रहिमानांच्या आत्मचरित्राच्या आधारानें येथें देतों.

अफगाणिस्थानांत आपणांस थारा राहिला नाहीं असें पाहून त्या चुलत्यापुतण्यांनीं इंग्लिश सरकारचे सरहद्दीवरच्या कामदारांस विनंतीपत्र लिहून आश्रय मागितला. त्यांनीं, चुकून ह्मणा कीं कसें ह्मणा, त्यांस असें उत्तर दिलें कीं, आह्मी तुह्मांस आश्रय देतों, परंतु, तुह्मी एक गोष्ट लक्षांत ठेविली पाहिजे कीं, तुह्मी एकदा इकडे आश्रयास येऊन राहिलां कीं तुह्मांला पुनः अफगाणिस्थानांत जाण्याची परवानगी मिळावयाची नाहीं. तें अबदुल रहिमानांस पटलें नाहीं. तेव्हां अर्थात् त्यांनीं इकडचा नाद सोडून, पुढचा मार्ग धरिला. तरी, अबदुल रहिमानांनीं शेरअल्लींच्या सैन्यांतल्या अधिकाऱ्यांस लिहून विचारिलें कीं, माझें प्रेम तुह्मांवर आणि तुमचें प्रेम मजवर इतकें असतां, तुह्मी मजवर शस्त्र धरितां, ह्याचा अर्थ काय? त्यांनीं त्यांस उत्तर दिलें कीं, "तुमच्या चुलत्यानें आह्मांला त्रासवून सोडिलें, आणि तो

आह्मांला नकोसा झाला, ह्मणून आह्मांस शेर अल्लीस मिळावें लागलें." हें पत्र त्यांनीं आपल्या चुलत्यास दाखविलें, आणि ह्मटलें कीं, "मी काबुलास होतों, तेव्हां हे लोक मजवर फार खूष होते; आणि तुह्मीं त्यांस त्रासविल्यामुळें हे आपणां उभयतांवर उठले आहेत." हें ऐकून अजीमखान खालीं मान घालून चूप बसले.

हें इकडे चाललें असतां, तिकडे अंबाला येथें अमीर शेर-अल्ली आणि व्हाइसराय लार्ड मेयो ह्यांची मुलाकत इ० स० १८६९ च्या मार्च महिन्याच्या अठ्ठाविसाव्या तारखेस झाली. प्रातःकाळीं अमीरसाहेबांस इंग्लिश सैन्याची कवाईत दाखविली. ती पाहून ते फार खूष झाले. दुपारून मोठा दरबार झाला. तो तंबूंत झाला. त्यांत मध्यभागीं उंच सिंहासन केलें होतें. त्यावर तीन खुर्च्या होत्या. मधल्या खुर्चीवर लार्ड मेयो बसले, त्यांच्या उजव्या हाताकडच्या खुर्चीवर अमीर साहेब बसले, आणि डावीकडचीवर त्यांचे चिरंजीव बसले. ह्या सिंहासनाच्या डाव्या बाजूच्या पुढच्या रांगेंत दोन लफटनेंट गव्हर्नर, लार्ड नेपियर आफ मागदाला, आणि दुसरे मोठमोठे इंग्लिश कामदार आपापल्या दर्जाप्रमाणें बसले होते. आणि उजवीकडे अमीरसाहेबांचे सरदार लोक, आणि ह्या देशांतले पांच राजे आले होते ते बसले होते. अमीरसाहेबांच्या मागें त्यांच्याजवळ त्यांचे तीन सरदार बसले होते. तेथें, अमीरसाहेबांशीं लार्ड मेयो ह्यांचें भाषण झालें, त्याचें तात्पर्य असें:—

**मेयो**—हिंदुस्थानाच्या प्रभु महाराणीसाहेब ह्यांच्या वतीनें मी अमीरसाहेबांचें अभिनंदन करितों.

**अमीर**—ह्या आदरातिथ्यानें आह्मांस परम आल्हाद झाला आहे. हा इंग्लंडचा लोभ आह्मी जन्मभर आठवूं.

**मेयो**—आमच्या कामदारांनीं अमीरसाहेबांच्या बडदास्ती-कडे चांगलें लक्ष ठेविलें असेलच. अमीरसाहेबांचा प्रवास सुखावह झाला असेल.

**अमीर**—होय. आमचें आगतस्वागत पाहून आह्मांला फार आश्चर्य वाटलें.

**मेयो**—आगगाडीविषयीं अमीरसाहेबांना काय वाटलें ?

**अमीर**—आगगाडीचेंच काय ? आह्मांस सगळ्याच गो-ष्टींचें मोठें नवल झालें आहे. त्यांतही इंग्रजसरकारचें सैन्य खरोखर नवल वाटण्यासारखें आहे.

**मेयो**—अमीरसाहेबांसारख्या महायोद्ध्यांस सैन्याची योग्यता कळावी, हें साहजिक आहे. अमीर साहेबांस लष्कराचा मोठा शौक दिसतो.

**अमीर**—होय. आह्मी उपजत योद्धे आहों. आमचीं पंचेचाळीस वर्षें लढायांत गेलीं आहेत.

**मेयो**—अमीरसाहेबांनीं आमचा तोफखाना पाहिलाच आहे.

**अमीर**—होय. पाहिला आहे. तशा तोफा आमच्या तिकडेही ओतितात. पण काडतुसें मात्र तयार होत नाहींत.

असें बोलणें कांहीं वेळ झाल्यावर, सुमारें पन्नास साठ हजारांचें जवाहीर मोठ्या एकावन ताटांत घालून, तें लार्ड मेयोसाहेबांनीं अमीरसाहेबांच्या पुढें केलें, आणि त्याबरोबर जडावाच्या मुठीची एक बहुमोल तरवारही त्यांस नजर केली. ती तरवार ते हातांत घेत होते, तेव्हां गव्हरनर जनरल

त्यांस ह्मणाले, "आपल्या शत्रूंवर आपणांस जय मिळो, आणि आपल्या अधिकारांचें रक्षण होवो." त्यावर अमीर साहेब ह्मणाले, "इंग्लंडाच्या शत्रूवर मी हें शस्त्र धरीन."

हे अमीर मोठे बहुश्रुत होते. ह्यांस युरोपाचा अर्वाचीन इतिहास—आणि विशेषेंकरून नेपोलियनाच्या वेळचा फ्रान्साचा इतिहास—चांगला अवगत होता. त्यांतल्या गोष्टींचा उल्लेख ह्यांच्या बोलण्यांत वारंवार होत असे. सर डब्ल्यु. मान्सफील्ड ह्यांपाशीं ते स्पष्ट बोलले कीं, तुमचें सैन्य उत्तम आहे; परंतु, तुमच्याकडच्या राजेरजवाड्यांत कांहीं जीव नाहीं. रेव्ह. रिडले ह्यांनीं त्यांस असें सांगितलें कीं, ऐरिश लोक असे भांडखोर आहेत कीं, त्यांस दुसऱ्यांशीं भांडायास न सांपडलें, तर ते आपसांत तरी भांडतील; स्वस्थ बसावयाचे नाहींत. तें ऐकून अमीरसाहेब हंसून ह्मणाले—" बरोबर आहे. ह्यालाच शिपाई ह्मणावयाचें !"

आतां तिकडे अफगाणिस्थानांत काय चाललें होतें तें पाहिलें पाहिजे. शेरअल्लीचें सैन्य मागें आणि हे दोघे पुढें, अशी पळपकड चालली. तरी, अबदुलरहिमानांचें कांहीं इमानी सैन्य त्यांच्या बरोबर होतेंच. ते पळत पळत मैमाना येथें आले. तेव्हां, अबदुलरहिमानांनीं अजीमखानांस विचारिलें कीं, " मोहोरांनीं भरलेल्या वीस पेट्या मीं तुह्मांजवळ संभाळण्यास ठेविल्या होत्या, त्या कोठें आहेत." त्यांनीं उत्तर दिलें कीं, " त्या कोठें आहेत त्या मला ठाऊक नाहींत. त्या खजीनदारांनीं लांबविल्याशा वाटतात." त्यांस शांतपणें अबदुल रहिमान ह्मणाले, "त्या पेट्या मीं तुमच्या स्वाधीन केल्या होत्या, खजीनदाराच्या

स्वाधीन केल्या नव्हत्या. असो. काय करावें! वडील आहेत! आतां पुढें वनवास काढावयाचा! पैशाशिवाय काय करावें!"

मैमाना येथें अशी वाताहात झाल्यावर ते, वझिरी डोंगराकडे गेले. आणि मग ते साररोझा येथें पोंचले. तेथली हकीकत अबदुल रहिमानानीं लिहिली आहे, ती अशीः—"येथल्या लोकांस प्रथमतः आह्मी शेरअल्लींच्या पक्षाचे लोक वाटलों, ह्मणून त्यांनीं आह्मांवर एकदम बार झाडले. परंतु, मग आह्मांस ओळखिल्यावर त्यांनीं आमची क्षमा मागितली, आणि आह्मांस सगळ्या प्रकारचें साह्य केलें. एका फकीरानें मला एक तांब्याचा लोटा दिला, आणि दुसऱ्यानें एक झारी दिली. गेल्या दोन दिवसांत तंबाखू ओढण्यास मिळाली नव्हती, ह्मणून प्रथम गुडगुडी विकत घेऊन मीं आधीं यथेच्छ गुडगुडी ओढिली. त्या वेळीं ह्या जगामध्यें माझी जिंदगी कायती, एक तांब्याची पंचपात्री, एक लोटा, एक झारी, एक गुडगुडी, एक धोतर, आणि तरवार, बंदूक, घोडा, व आंगावरचा लष्करी पोषाक एवढी होती. थोड्या दिवसांमागें माझ्याजवळ बुखाऱ्याच्या ८००००० मोहरा, २०००० इंग्लिश गिनी, ३००० तोळे सोनें, ११०००००० काबुली रुपये, ९००००० कंडूसी रुपये, १०००० चांगले उंची पोषाक, आणि २००० माणसें माझ्या रोजच्या पंक्तीला असत. त्यांच्या स्वैपाकास वगैरे पुरण्याइतकीं भांडीं मजजवळ होतीं. सगळ्या अफगाणिस्थानांत दुसऱ्या कोणाजवळ नव्हती, इतकी जिंदगी माझ्याजवळ होती. आणि आतां असा विपरीत काळ आला होता, तरी त्याचें मला कांहीं फारसें दुःख झालें नाहीं. परंतु,

ज्यांनीं मला लहानाचें मोठें केलें, त्या वडील माणसांची आणि माझ्या इमानी नौकरांची आणि माझी तोडातोड होऊन, त्या सगळया माणसांची अवस्था काय आहे, हें मला कळेना, ह्याचें मला अतिशयित वाईट वाटत असे." ह्यांत अंतःकरणाचें खरें मोठेंपण दिसून येतें.

ही मंडळी पढें बिर्माल ह्या ठिकाणीं गेली. तेथें बर्फ पुष्कळ पडलें होतें. तरी रस्ता मोकळा झाला होता. अबदुल रहिमान आणि त्यांचे लोक हे तेथल्या लोकांच्या दृष्टीस पडतांच, ते लोक ह्यांशीं भांडूं लागले. तें पाहून अबदुल रहिमान खेरीज करून बाकीच्या मंडळीनें पोबारा केला. अबदुल रहिमान न भितां तेथेंच एका घोडयावर बसले, इतक्यांत तेथला एक माणूस त्यांस खालीं ओढूं लागला. त्यासरशी त्यांनीं आपली तरवार उपसली. ती पाहून तो पळून गेला. पुढें अबदुल रहिमान आपल्या मंडळीस पळण्याचें कारण विचारूं लागले. तेव्हां सगळयांचीं तोंडें शिवलीं.

तेथून निघून ही मंडळी वजीरीपर्यंत गेली. येथें एक चमत्कारिक गोष्ट घडली, ती अबदुल रहिमानांनीं बुद्धया लिहिली आहे. ती अशीः—"माझा पराभव झाल्यापासून ह्या देशांत मी येईपर्यंत, मला पोटभर जेवायास मिळालें नव्हतें. ह्मणून बरोबरच्या माणसांकडून, एक लहानसें लोखंडाचें भांडें मिळवून, त्यांत मांस शिजत लावून, तें, खालीं विस्तव लागण्यासाठीं, दोरीनें एका झाडाला टांगळें. इतक्यांत तेथें एक मोठा कुत्रा आला, त्याला तें सगळें मांसच टांगलें आहे असें वाटून त्यानें, त्या दोरासुद्धां तें भांडें तोंडांत धरून पळविलें, तव्हां अर्थात् त्यांतलें मांस जमिनीवर लवंडून,

माझी सगळी खटपट फुकट गेली! तें पाहून मला देवाच्या करणीचा मोठा चमत्कार वाटला. मीं आपल्या मनांत ह्मटलें, अरे, तीन दिवसांपूर्वीं ज्या माझ्या स्वैपाकाचीं भांडीं वाहून नेण्यास १००० उंटें लागत होतीं, त्या माझ्या स्वैपाकाचें भांडें, आंतल्या अन्नासुद्धां एका कुत्र्यानें तोंडांत धरून न्यावें आं! असा विस्मय करून, कोरड्या भाकरीचा एक चतकोर खाऊन मी स्वस्थ निजलों!" अशा कितीएक मजला केल्यावर, त्यांस मर्घा ह्मणून एक किल्ला लागला. त्यांतल्या लोकांनीं मोठ्या अगत्यानें बाहेर येऊन ह्या मंडळीचा चांगला आदरसत्कार केला, आणि त्यांस जें काय लागत होतें, तें सगळें पुरविलें. ह्या किल्ल्यांतल्या सरदाराच्या मुलानें अबदुल रहिमानांस २०० मोहोरा दिल्या. त्या त्यांस ह्या वेळीं दोन लाखांच्या ठिकाणीं झाल्या. त्यानंतर तेथें पुढच्या प्रवासाची तयारी करून ते दात्रा, कानिगुरम, शेरानी, व ाकरझाब, चांघाय, सीस्टन, इत्यादि ठिकाणांवरून मशद येथें गेले. तेथें त्यांस एक हिरातचा काजी भेटला. त्यानें त्यांस आणि त्यांच्या चुलत्यांस मिळून सुमारें ३५००० रुपये उसने दिले. त्यानंतर ते भ्रमण करीत करीत खिवा देशांत आले. तेथल्या खानांस अबदुल रहिमान जाऊन भेटले. त्यांनीं त्यांचें फार चांगलें आदरातिथ्य केलें, आणि प्रसंग पडल्यास बल्क काबीज करण्यास १०००० सैन्य देण्याचें कबूल केलें. कांहीं वेळानें खानांचा खजीनदार येऊन त्यांस सांगूं लागला कीं, आपणांस दोन लाख मोहोरापर्यंत देण्याविषयीं खानसाहेबांचा हुकूम झाला आहे. त्याविषयीं तशीच खात्री खानांच्या दिवाणानींही केली. तेव्हां अबदुल रहिमानांस

तें उपकाराचें मोठें ओझें वाटलें, आणि ते ह्मणाले, "खानसाहेब उदारधी पुरुष आहेत, देव त्यांचा जयजयकार करो. त्यांच्या उपकारांचें वर्णन माझ्यानें करवत नाहीं. पण दोन लाख मोहोरांचें मी काय करूं? माझा दररोजचा खर्च अवघा सात आठ रुपयांचा आहे?" दुसरे दिवशीं खानसाहेबांनीं १००० मोहरा आपल्या खजीनदाराच्या हातीं त्यांजकडे पाठवूनच दिल्या, आणि १५० उंटें आणि दुसरें प्रवासाचें साहित्य त्यांस देऊन खानांनीं अबदुल रहिमानांची पुढें बुखाऱ्याकडे रवानगी करून दिली.

येथें घडलेली एक चमत्कारिक गोष्ट पुस्तकांतून लिहिली आहे. ती खुद्द अबदुल रहिमानांच्या तोंडची आहे ह्मणतात. ती अशीः बरोबरच्या मंडळीस मागें सोडून हे बरेच पुढें गेले. तेव्हां त्यांस अरण्यामध्यें अतिशयित दमल्यासारखें वाटलें, आणि फार तृषा लागली. इतक्यांत त्यांना एक स्फटिकवत् निर्मळ पाण्याची नदी लागली. ती पाहून ते घोड्यावरून उतरले, घोड्यास पाणी पाजिलें, आणि आपण पाणी पिऊन, विश्रांति घेण्याकरितां एका झाडाच्या सांवलींत स्वस्थ पडले. इतक्यांत त्यांचा डोळा लागून, त्यांच्या स्वप्नांत एक अत्यंत रूपवती तेजःपुंज देवता आली, आणि त्यांस ह्मणालीः—"अरे काबुलचे अमीरा, अबदुल रहिमाना, तुला पराकाष्ठेचें दुःख झालें आहे; परंतु, सूर्याच्या उष्णतेनें जसे मेघ नाहींतसे होतात, तसें तें दुःख लवकरच नाहींसें होईल. माझ्या मुला, तुला पुष्कळ संकटें भोगावीं लागलीं आहेत. परंतु, तूं मोठा धैर्यवान व सोशीक आहेस असें दिसून आलें आहे. तुला तुझा मुकुट, तुझा देश, आणि तुझें राज्य पुनः

मिळेल, आणि त्याचा दरारा इतर राज्यांवर राहील. मोठमोठीं राष्ट्रें तुला मोहांत पाडण्याचा प्रयत्न करतील, भुलविण्याचा प्रयत्न करितील, आणि कदाचित् धमकावण्याही दाखवितील, परंतु, बाबा, त्यांस तूं डरूं नको, आणि त्यांस जुमानूं नको. दोन मोठमोठ्या राष्ट्रांचा डोळा तुझ्या राष्ट्रावर राहील, आणि तीं दोन्ही तुला साह्य करण्यास नेहमीं पुढें पुढें करतील. परंतु, अब्दुलरहिमाना, विश्वासघातक्यांच्या वाऱ्यास उभा राहूं नको, आणि खातरी झाल्यावांचून कोणावर विश्वास ठेवूं नको. तूं जर परकीयांच्या बोलण्यावर विश्वास ठेविशील, तर तुझें राज्य नष्ट होईल, आणि तूं आणि तुझे सगळे लोक हे पराधीन गुलाम होऊन बसाल. परंतु, तूं जर शाहाणा असशील, तर, पर्वतशिखरावर ठेविलेल्या रानासारखा तूं वागशील, आणि तुझी संतती पुष्कळ वाढेल." हें बोलून चालून स्वप्नांतलें देवताभाषण आहे. ह्याचा अर्थ अब्दुल रहिमानांच्या मनांत काय आला असेल, तें सहज कळण्यासारखें आहे.

ह्यानंतर, अब्दुल रहिमान आक्ससनदी उतरून, गझ्झ, सोराबखान, व काराकोल, ह्यांवरून बुखाऱ्यास पोंचले. तेथले राजे ह्यांचे मित्र होते. त्यांस हे हिसार येथें त्यांच्या स्वारींत जाऊन भेटले, आणि कांहीं वेळ पाहुणचार घेऊन लगेच समर्कंदाकडे चालते झाले. तेथें रशियन सरकारचे गव्हरनर होते. त्यांनीं त्यांचें फार चांगलें आगतस्वागत केलें. तेथें त्यांची रहाण्यासंवरण्याची चांगली सोय झाली. रशियन सरकारचे व्हाइसराय ताशकंद येथें गेले. त्यांनीं त्यांस भेटावयास बोलाविलें,

त्यांच्या भेटी झाल्या. व्हाइसरायांस अबदुल रहिमानांनीं जडावाची तरवार, पोषाख, इत्यादि वस्तु नजर केल्या. त्यांनीं ह्यांस आपल्या सैन्याची कवाईत दाखविली. नंतर ते समर्कंदास परत आले. तेथें त्यांस एक लक्ष रूबल किंमतीचा एक मोठा बंगला रहावयास दिला. शिवाय त्यांच्या लोकांस राहण्यास एक मोठा वाडाही त्यांच्या हवालीं केला.

समर्कंद येथें येऊन अबदुल रहिमान स्वस्थ बसले नाहींत. त्यांचें सगळें मन अफगाणिस्थानाकडे होतें. तिकडे काय काय चाललें होतें, त्याविषयीं ते बारीक बातम्या ठेवीत होते, आणि स्वदेशांत पुनः अधिकारावरूढ होण्याच्या संधीची वाट पहात होते. समर्कंद येथें रशियन सरकारचा एक मोठा अंमलदार रहात असे, त्याशीं त्यांनीं असें बोलणें लाविलें कीं, रशियन सरकारानें आपणांस २००० बंदुका द्याव्या, इराणी आणि अफगाणी लोक जे तेथें आले असतील, त्यांच्या पलटणी तयार करण्याची परवानगी द्यावी; आणि आपल्या पाहाऱ्याची चौकी आक्सस नदीवर केर्की येथें राहूं देण्याविषयीं बुखाऱ्याच्या राजास हुकूम द्यावा; म्हणजे आम्ही रशियन सरकारचे अंकित होतों. आणखी त्यांनीं असेंही प्रदर्शित केलें कीं, शेरअल्लीचें मन रशियाविषयीं शुद्ध नाहीं. आणि अफगाणिस्थानांतले लोकही त्यांवर संतुष्ट नाहींत. ह्याकरितां हें एवढें झालें म्हणजे, अफगाणिस्थान स्वाधीन होण्यास उशीर लागावयाचा नाहीं. हें म्हणणें, रशियन प्रतिनिधि जनरल काफमन ह्यांनीं ऐकून घेऊन, अबदुल रहिमानांस उत्तर दिलें कीं, शेरअल्लीवर उठण्याकरितां आम्ही तुम्हांस कधींही साह्य करणार नाहीं; तरी, तुमच्या आणि तुमच्या

बरोबरच्या लोकांच्या निर्वाहास दरसाल १८००० रुपये देण्याची तजवीज रशियन सरकार करील. हें उत्तर ऐकून अबदुल रहिमान ह्यांची फार निराशा झाली. तरी, ती त्यांनीं बाहेर दाखविली नाहीं. युक्तिप्रयुक्तीनें नेमणूक मात्र हळूहळू वाढवून घेतली. त्यांना इ० स० १८७३ त २५२६० रुपये मिळाले; इ० स० १८७४ त २५७०० मिळाले; आणि तेव्हांपासून पुढें इ० स० १८८० पर्यंत दरसाल २६००० रुपये मिळत गेले. ते आपला खर्च अगदीं हात राखून करून, दरमहां थोडीबहुत तरी शिलकेस भर घालीत असत.

शिवाय, हें इकडे चाललेलें सगळें वर्तमान रशियन सरकाराकडून म्हणजे -त्यांच्या प्रतिनिधीकडून शेरअल्लींस कळत होतें. इ०स० १८७० च्या मार्चच्या २८ व्या तारखेस रशियन सरकारांतून शेरअल्लींस पत्र गेलें. त्यांत असें आहे:—"आपले पुतण्ये इकडे आले आहेत, हें आपणांस माहीत असेलच. त्यांचें आदरातिथ्य, आमच्या महाराजांच्या वतीनें, रीतीप्रमाणें मीं केलें आहे. तथापि तेवढ्यावरून आपल्या मनांत भलताच संशय येऊं नये, ह्मणून हें पत्र मीं तुह्मांस लिहीत आहे. तुर्कस्थानांतले जे प्रांत सध्या झार महाराजांच्या राज्यांत आहेत, त्यांची सरहद्द तुमच्या राज्याच्या सरहद्दीशीं लागलेली नाहीं. मध्यंतरीं बुखाऱ्याच्या खानांचा मुलूख आहे. तरी, आपल्या उभय पक्षांच्या स्नेहांत विपर्यास होण्याचें कांहीं कारण नाहीं. अबदुल रहिमानांस मी स्पष्ट कळविलें आहे कीं, कोणीही माणूस विपत्तींत असला तर त्याला साह्य करावें, अशी आमच्या महाराजांची वहिवाट आहे, तिला अ-

नुसरून मीं तुमचा हा आदरसत्कार केला आहे. ह्याचा अर्थ तुह्मीं भलताच समजूं नका. तुमचें आणि तुमच्या चुलत्याचें कसेंही असो. त्यांत पडण्याचें कारण रशियन सरकारास नाहीं. आणि रशियन सरकार तुमच्या भांडणांत कधीं पडणार नाहीं, हें मीं त्यांस साफ सांगितलें आहे." आणखी काफमन ह्या रशियन सुभेदारानें झार महाराजांच्या मुख्य प्रधानांस लिहिलें कीं, "स्वतः अबदुल रहिमानांसही आह्मीं असें कळविलें आहे कीं, आह्मी तुह्मांला जो आश्रय दिला आहे, तो तुह्मीं इंग्लिशांचें शत्रु आहांत किंवा काबुलच्या गादीचे मालक आहांत ह्मणून दिला नाहीं. तर, तुह्मी सर्वस्वीं नागवलां आहां, विपत्तींत आहां, तुह्मांला आणि तुमच्या परिवाराला निर्वाहाला आधार नाहीं, ह्मणून दिला आहे. आणखी त्यांस स्पष्ट सांगितलें आहेकीं, तुमच्या चुलत्यांचे पाठीराखे इंग्लिश आहेत, ते आमच्या सरकाराचे मोठे दोस्त आहेत. त्यांच्या स्नेहांत कधीं अंतर पडायाचें नाहीं. एवढेंच केवळ नव्हे, तर, शेरअल्ली ह्यांचें निरंतर कल्याण व्हावें, असें आह्मी निरंतर चिंतितों. त्यांशीं आह्मी लढाई करूं, असें तुह्मी कधीं मनांत देखील आणूं नका." हें सगळें ऐकून अबदुल रहिमानांची अगदीं निराशा झाली. परंतु, तसें कांहीं एक त्यांनीं बाहेर दाखविलें नाहीं.

ह्यानंतर, झारमहाराजांस अबदुल रहिमानांचें सगळें वर्तमान कळलें, आणि त्यांनीं त्यांस सेंटपीटर्सबर्ग येथें भेटायासही बोलाविलें. त्याप्रमाणें जाण्याचेंही ठरलें. परंतु, तें कांहीं कारणामुळें तसें राहिलें. पुढें रशियन फौजेची स्वारी शरह्यारीबाज ह्या ठिकाणावर निघाली. तिजबरोबर जाण्याविषयीं

समर्केदच्या सुभेदारांनीं अबदुल रहिमानांस पर्यायानें सुचविलें. त्यास त्यांनीं साफ उत्तर दिलें कीं, मी कांहीं रशियन सरकारचा नौकर नाहीं; परंतु, शाहारीबाजच्या लोकांस दोन गोष्टी सांगून मी वळवितों. तें कोणीं ऐकिलें नाहीं. ती स्वारी झाली. तें ठिकाण घेतलें, आणि तेथून पुष्कळ लूट सैन्यानें आणिली. परंतु, त्या स्वारींत, रशियन सैन्याचे सेनापति आब्रामाफ ह्यांस गोळी लागली. त्यांच्या समाचारास अबदुल रहिमान गेले. तेव्हां त्यांनीं, लुटीपैकीं, एक सोन्याची तपकिरीची डबी, एक मोठी जोडगोळीची बंदूक, आणि एक मोठी दुर्बीण हीं त्यांस नजर देण्याकरितां त्यांच्यापुढें आणून ठेवविलीं. तीं पाहून त्यांनीं त्या रशियन अधिकाऱ्यांस स्पष्ट सांगितलें कीं, "आमच्या धर्माप्रमाणें, मुसलमानांस लुटून आणिलेल्या वस्तूंस आह्मांस शिवतां कामा नये." तें ऐकून मंडळीस मोठें आश्चर्य वाटलें.

ह्यानंतर पुढें दोन वर्षांनीं उर्गेज ह्या संस्थानावर रशियाच्या लष्कराची स्वारी निघाली. तिचें अधिपत्य ताशकंदच्या सुभेदाराकडे होतें. त्या सुभेदारानें, वाटेनें जातांना, अबदुल रहिमानांची गांठ घेतली, आणि आमच्या स्वारीबरोबर तुह्मीं येतां का, ह्मणून त्यांस विचारिलें. त्यांस त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, "मजपाशीं सैन्य नाहीं, पैसा नाहीं, मी तुमच्याबरोबर आलों काय आणि नाहीं आलों काय, सारखाच. शिवाय, ज्या लोकांवर तुह्मी स्वारी करीत आहां, ते लोक मुसलमान आहेत. आणि आह्मी त्याच धर्माचे आहोंत. आणखी स्वधर्मीयांशीं युद्ध करण्यास आमच्या शास्त्रांत मनाई आहे." तें सगळें बोलणें नुसतें विनोदाचें होतें. तें तितकेंच

राहिलें. तरी त्या सरदारावर अबदुल रहिमान ह्यांचें वजन चांगलें पडलें. आणि त्यानें त्यांस तेथें स्वस्थ कालक्रमणा करण्यास तंबू वगैरे जें सामान पाहिजे होतें तें दिलें. तें पाहून त्याबद्दल त्याचे आभार मानून, अबदुल रहिमानांनीं त्यास आणखी ह्मटलें:—"पुष्कळ अनुभवावरून मला लढाईचा अगदीं वीट आला आहे. तुमच्या सरकाराच्या आश्रयानें खाऊन पिऊन शिकार करून स्वस्थपणें कालक्रमणा करणें मला फार सुखावह वाटतें." हें सगळें बोलणें दरबारी काव्याचें होतें, हें कोणाच्याही लक्षांत येण्यासारखें आहे.

हिंदुस्थान सरकारासही अबदुल रहिमानांच्या हालचालीवर फार लक्ष ठेवावें लागत असे. त्या कामावर वेगळे कामदार नेमलेले असत. त्यांत कर्नल सर रिचर्ड पालक ह्या नांवाचे एक गृहस्थ होते. त्यांनीं ह्या वेळच्या सुमारास त्यांच्याविषयीं इंग्रज सरकारांत लिहून पाठविलें कीं, "अबदुल रहिमान हे शिपायगिरीच्या कामांत फार चांगले तर्बेज आहेत ह्मणतात. परंतु, राज्यकारभार चालविण्यांत त्यांची बुद्धि तितकी चालत नाहीं. त्यांचें आतां सर्वस्व गेलें आहे. त्यांस सैन्य मिळविण्यास कांहींएक साधन राहिलें नाहीं. त्यांस द्रव्यसाह्य आणि शस्त्रसाह्य कोणीं केल्यावांचून त्यांच्या हातून कांहींएक व्हावयाचें नाहीं. त्यांस रशियाकडून किंवा बुखाऱ्याकडून जर द्रव्यसाह्य मिळालें, तर, ते आपलें राज्य मिळविण्याचा प्रयत्न खचीत करतील. तरी, शेरअल्ली गादीवर आहेत तोंपर्यंत त्यांचें कांहीं एक चालावयाचें नाहीं. परंतु, त्यांच्या पश्चात् अफगाण तुर्कस्थानास जर एकादा कमकुवत अधिकारी आला, तर तेथें त्यांचें

चांगलें साधेल. अबदुल रहिमानांचा काल फिरला आहे असें दिसतें. ते आपल्या वडिलांस आणि चुलत्यांस साह्य करण्यास झटत होते, तेव्हांच्या सारखे चांगले दिवस येण्याची आशा आतां राहिली नाही."

अशा परस्वाधीन स्थितींत जरी अबदुल रहिमान होते, तरी, त्यांचें राजकारण आंतून आंतून चाललेंच होतें. त्यांचे कितीएक मित्र काबुलांत होते. ते त्यांस तिकडच्या बातम्या गुप्तपणें देत असत. तसेच अबदुल रहिमानाचे हेर तिकडे फिरत असत. हें सगळें शेरअल्लींस समजलें. तेव्हां त्यांनीं रशियन सरकारास लिहिलें कीं, अबदुल रहिमानांस चांगल्या बंदोबस्तांत ठेवावें, आणि त्यांस अगदीं इकडे तिकडे फिरकूं देऊं नये. त्याप्रमाणें गार्टचकाफ ह्या रशियन प्रधानांनीं लार्ड आगस्टस लाफटस ह्यांस इ० स० १८७४ च्या जानेवारींत असें कळविलें कीं, शेरअल्लींशीं विरुद्ध राजकारण तुह्मीं कारितां कामास नये, आणि जर कराल, तर तुह्मांस समर्कंद येथें राहूं देणार नाहीं, अशी सक्त ताकीद अबदुल रहिमानांस दिली पाहिजे.

आतां तिकडे शेरअल्लींचें काय चाललें होतें तें पाहिलें पाहिजे. पुष्कळ पत्रव्यवहार वगैरे होऊन, त्यांची अशीं खातरी झाली कीं, आपणांस रशियन सरकारचा चांगला आश्रय आहे, त्या पक्षीं इतर कोणाची परवा करण्याचें प्रयोजन नाहीं. ह्मणून, त्यांनीं इंग्लिश सरकाराच्या कामदारांशीं घांसाघांशी लाविली. तिचें साद्यंत वर्तमान इतिहासावरून स्पष्ट कळत नाहीं. तरी, निसुटत्या एका उल्लेखावरून तेव्हांची एक गोष्ट अशी कळते कीं, लार्ड लिटन ह्यांनीं

दिल्लीस जो मोठा दरबार इ० स० १८७७ त महाराणी-साहेबांनीं बादशाहीण ही पदवी धारण केल्याच्या उत्सवानिमित्त भरविला होता, त्या दरबारास, हिंदुस्थानांतल्या राजेरजवाड्यांप्रमाणें त्यांनीं अमीर शेरअल्ली ह्यांसही निमंत्रण पाठविलें होतें. तें त्यांनीं ऐकिलें न ऐकिल्यावारी नेलें, त्यावरून लार्ड लिटन साहेबांस जरा वाईट वाटलें हें साहजिक आहे.

लार्ड मेयो ह्यांशीं इतकें सख्याचें बोलणें झालें असतां, शेरअल्लींनीं आपल्या दरबारांत रशियाच्या वकिलास येऊं दिलें, आणि इंग्लिशांच्या वकिलास नको ह्मटलें, तेव्हां अर्थात् त्यांशीं लढाई करणें इंग्लिशांस भाग आलें. तिकडे सैन्यें रवाना झालीं. तेव्हां भयभीत होऊन अमीर शेरअल्ली पळत असतां वाटेंत मरण पावले, आणि त्यांचे चिरंजीव याकूबखान हे त्यांच्या गादीवर बसले. तेही इंग्लिश सैन्य पाहून गडबडून गेले, आणि त्यांनीं इ० स० १८७९ च्या मे महिन्यांत गंडामक येथें इंग्लिशांशीं तह केला. त्या कामांत इंग्लिश सरकाराच्या वतीनें मुख्य अधिकारी सर लुई काव्हाग्नरी हे होते. त्या तहामध्यें इंग्लिश सरकारानें त्यांस अमीर ह्मणून कबूल केलें. आणि काबूलच्या दरबारीं इंग्लिशांचा रेसिडेंट असावा असें ठरलें. त्याप्रमाणें सर लुई काव्हाग्नरी साहेबच रेसिडेंट ह्मणून तेथें जाऊन राहिले. त्यांचा आदरसत्कार अमीरांनीं चांगला केला. त्यांची राहण्यासवरण्याची सोय चांगली लाविली. आणि कांहीं दिवसपर्यंत सगळें सुयंत्र चाललें. परंतु, पुढें अमीरांचें धोरण बदललें. लोकांत त्यांचें वजन नाहींसें झालें. आणि त्यांच्या सैन्यास त्यांजकडून पगार वेळच्यावेळीं मिळेना. तेव्हां

ते लष्करी लोक बिथरले. आणि काबुलमध्यें त्यांनीं धिंगामस्ती मांडिली. तीमध्यें सर लुई काव्हाग्नरी आणि त्यांच्या बरोबरची मंडळीं ह्यांचे खून इ० स० १८७९ च्या सपटंबरच्या तिसऱ्या तारखेस झाले. ह्या भयंकर कृत्यांत याकूबखानांचें अंग मुळींच नव्हतें. परंतु, त्याच्या मूळाविषयीं दोन पर्याय ग्रंथांतून लिहिले आहेत. त्यांतला एक असा आहे कीं, शेर अल्लींच्या पट्टराणीनें ह्मणजे अबदल्लाजान ह्यांच्या मातुश्रीनें, हें सगळें कारस्थान अशा करितां उभारिलें होतें कीं, त्याच्या योगानें याकूबखान पदच्युत व्हावे, आणि आपले चिरंजीवांस अमीरी प्राप्त व्हावी. ह्या आरोपाच्या पुष्टीस असा एक आधार आहे कीं, हा दंगा होण्याच्या पुष्कळ आधीं ह्या पट्टराणीनें इंग्लिश सरकाराशीं गुप्तपणें असें बोलणें लावलें होतें ह्मणतात कीं, माझ्या अबदल्लाजानास खचीत गादी देण्याची हमी जर तुह्मी घेत असाल, तर मी आपल्या नवऱ्यास ह्मणजे शेरअल्लींस विषप्रयोग करितें. आणि दुसरा पर्याय असा आहे कीं, अफगाण सैन्याचे मुख्य सेनापति दाऊदशाहा ह्यांस ह्या पट्टराणीनें ३०००० रुपये देऊन इंग्लिश रेसिडेंटाचा खून करायास लाविलें, तें एवढ्याच करितां कीं, त्या भानगडींत याकूबखान गादीस मुकावे, आणि ती गादी आपला मुलगा अबदल्लाजान ह्यास मिळावी. ह्यांतला कोणताही पर्याय खरा असो. परंतु, सगळ्याचें तात्पर्य एवढें दिसतें कीं, ह्या विश्वासघातास मुख्य कारण ही पट्टराणी होती. आणि याकूबखानांकडे त्याचा कांहीं दोष नव्हता. तें कांहीं असो. परंतु, पहिला सगळा स्नेहभाव नाहींसा होऊन काबुलावर सैन्य पाठविण्याची तयारी इंग्लिशांस करावी लागली, त्याप्रमाणें तिकडे सैन्य

जाऊन, त्यानें याकूबखानांस आपली गादी सोडणें भाग पाडलें. त्या वेळीं आयूबखान हे गादीचे मालक ह्मणून पुढें येऊन इंग्लिशांशीं लढूं लागले. त्यांनीं मैवाड येथें इंग्लिश सैन्याचा मोड केला. परंतु तदनंतर लार्ड राबर्टस् ह्यांच्या २६०० सैन्याशीं १०००० अफगाण लष्कराची मोठी लढाई चारासाय येथें आक्टोबर महिन्याच्या साहाव्या तारखेस झाली. तींत अफगाण लोक पराभव पावून त्यांची दाणादाण झाली. आणि दाहाव्या अकराव्या तारखेस लार्ड राबर्टस् ह्यांनीं काबूल घेतलें. तेव्हां, अफगाणिस्थानच्या गादीवर बसावयास कोणी वारीसदार अमीर पाहिजे असें झालें. तेव्हां अर्थात् सर्वांचे डोळे अबदुल रहिमानांकडे लागले.

आतां थोडें तिकडचें वर्तमान सांगितलें पाहिजे. अबदुल रहिमान जरी असे एकीकडे जाऊन राहिले होते, तरी, त्यांची खटपट आंतून आंतून चाललीच होती. ती शेरअल्लींस कळल्यावरून, त्यांनीं रशियन सरकाराकडून त्यांस समर्कंद येथून काढून, ताशकंद येथें पुनः नेऊन ठेविलें होतें. त्या संबंधानें त्यांनीं पुष्कळ आढेवेढे घेतले होते, तरी, रशियन सरकारानें त्यांचें कांहींएक ऐकिलें नाहीं, आणि शेवटीं आपलें खरें केलें. ह्या स्थलांतराच्या वेळीं अबदुलरहिमानांस त्यानीं अगदीं एकाद्या साधारण माणसाप्रमाणें वागविलें-किंबहुना कैदीसारखें वागविलें. भोंवतालीं नागव्या तरवारींचा पाहारा देऊन समर्कंदांतून त्यांस बाहेर काढिलें. तेणेंकरून अबदुलरहिमानांस अतिशयित त्वेष आला. तेव्हांच्या प्रसंगाविषयीं त्यांनीं स्वतः लिहिलें आहेः " संतापानें आणि दुःखानें माझ्या डोळ्यांपुढें अंधेरी आली. मला कांहीं दिसेनासें झालें. आणि मला

असें झालें कीं, गाडीखालीं उतरून एकदम आपल्या शत्रूंपैकीं कोणा एकाचा खून करावा, आणि लगेच आत्म-हत्याही करून घ्यावी. परंतु, पुनः भानावर येऊन माझ्या मनाला मीं ह्मटलें, त्वेषासरसा असा आविचार करणें हें मूर्खाचें काम आहे. शाहाणे लोक सूड उगवण्याच्या वेळाची वाट पाहात स्वस्थ राहातात. हें जग विपत्तींनीं भरलें आहे. ह्यांतून युक्तीनें निभावलें पाहिजे. उतावळी करून उपयोगीं नाहीं." ताशकंद येथें त्यांना त्यांचा पहिलाच बंगला रहावयास दिला होता. तेथें ते कालक्रमणा करीत स्वस्थ राहिले.

अफगाणिस्थानची गादी रिकामी पडली, हें हिंदुस्थान सरकारास कळतांच, तीवर अबदुल रहिमानांस बसवावयाचा त्यांचा निश्चय झाला. त्याविषयीं व्हाइसराय लार्ड लिटन ह्यांनीं सेक्रटरी आफ स्टेट फार इंडिया ह्यांस विलायतेस इ० स० १८८० च्या मार्च महिन्याच्या २४ व्या तारखेस अशी तार केली कीं, "काबूल आणि उत्तर अफगाणिस्थान ह्यांस स्वाधीन ठेवून त्यांवर राज्य करणारा असा कोणी गादीचा वारीसदार सध्या अफगाणिस्थानांत एक देखील नाहीं. ह्मणून अमीर दोस्तमहंमदांचे नातू ह्मणून अबदुल रहिमान ह्यांस लवकर अफगाणिस्थानाचे अमीर कबूल करावे हें आवश्यक दिसतें." तें ह्मणणें कबूल झालें, आणि त्याप्रमाणें उद्योग करण्याचा क्रम चालला.

अमीर शेरअल्ली मरण पावल्याचें, आणि त्यांच्या गादी-विषयीं घोंटाळा झाल्याचें बरेंच वर्तमान अबदुल रहिमान ह्यांस इकडे ताशकंद येथें कळलें होतें, आणि तेव्हांच

त्यांच्या मनांत इकडे निघून यावयाचें होतें. परंतु, रशियन सरकारच्या तेथल्या अधिकाऱ्यांनीं त्यांस असें सांगितलें कीं, तुम्हांला जाण्यास मोकळीक आहे. परंतु, एक मात्र तुम्हीं लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, रशियांच्या राज्यांतून आतां एकदां तुम्ही निघून गेलां, म्हणजे, कांहीं झालें तरी, तुम्हांस ह्या राज्यांत येऊं द्यावयाचे नाहींत, आणि तुम्हांला आश्रय मिळावयाचा नाहीं. त्यामुळें त्यांचें मन द्विधा झालें होतें. तरी, पुनः विचार करून, देवावर भरंवसा ठेवून, त्यांनीं तेथून निघून अफगाणिस्थानाकडे येण्याचा आपला निश्चय तेथल्या अधिकाकाऱ्यांस कळविला. त्यांनीं लागलेच त्यांस २५००० रुपये वाटखर्चास दिले. आणि अशा प्रकारें अबदुल रहिमान ताशकंद येथून निघाले. बाबरबादशाहा म्हणत असे त्याप्रमाणें त्यांनीं ह्या वेळीं, "महत्वाकांक्षेचा पाय साहसाच्या रिकाबींत ठेविला."

नकाशावरून पाहिलें असतां असें दिसून येईल कीं, अबदुल रहिमान ह्यांस बदकशान देशांतून आल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. त्याप्रमाणें त्या दिशेनें त्यांनीं अपला मार्गक्रम धरिला. त्यांस वाटेमध्यें नानाप्रकारचीं संकटें भोगावीं लागलीं. त्यांचें साद्यंत वर्णन त्यांनीं आपल्या स्वचरित्रांत केलें आहे. तें सगळें चांगलें आहे. परंतु, फार लांब आहे. त्यास येथें जागा देतां येत नाहीं. तरी, केवळ मासल्याकरितां त्यांतली एक गोष्ट येथें सांगतों. ते अक्सस नदीच्या पलीकडच्या रस्ताक ह्या प्रदेशांत आले. तेथें त्यांच्या वडिलांच्या जावयाच्या भावाचा अमल होता. त्याचें नांव शाहाजादा हसेन होतें. त्याला हें अबदुलरहिमानांचें आगमन बरें वाटलें नाहीं. त्यानें त्यांस आक्ससनदी उतरून आलीकडे येऊं नका असेंच सांगून

पाठविलें. तरी, ते ती नदी उतरून येण्याच्या तयारीनें निघाले. हें शाहाजाद्यास कळतांच त्यानें १००० लोक त्या नदीवर, त्यांचें आलीकडे येणें बंद करण्याकरितां पाठविले. इतक्यांत अंधेर पडला. तेव्हां अबदुलरहिमानांच्या लोकांनीं त्यांवर बंदुका झाडिल्या. ह्मणजे अबदुलरहिमानांबरोबर अवघे १०० स्वार होते. ते त्या १००० स्वारांशीं टक्कर देण्यास तयार झाले. त्या वेळच्या आपल्या स्थितीचें वर्णन अबदुलरहिमानांनीं केलें आहे:—" मला खचीत ठाऊक होतें कीं, अशा प्रसंगीं केवढेंही धैर्य असलें तरी त्याचा उपयोग व्हावयाचा नाहीं. परंतु, मीं आपला जीव देवाला वाहिला होता. आणि जे कोणी आपला जीव देवाला वाहातात, त्यांचें संरक्षण देव करितो, अशा अर्थाचीं कुराणातलीं वचनें मला आठवलीं. त्यांनीं मला धैर्य आलें. मला दाहाहजार लोक आणि दाहा लाख लोक सारखेच वाटूं लागले. माझ्या अंतःकरणांत परमेश्वरभक्ति उत्पन्न झाली. तिच्या जोरावर मी लढायास तयार झालों. आणि परमेश्वरभक्तींत उद्यां आपला देह पडावयाचा, असें मनांत येऊन मला समाधान वाटलें. मीं मनांत म्हटलें, आज ह्यांच्या हातून सुटलों, तर कदाचित् उद्यां इंग्लिश सैन्याशीं प्रसंग यावयाचा. एकंदरींत मरण जवळ आलें आहे. ठीक आहे. माझें मन त्या वेळीं इतकें धीट झालें होतें कीं, जगांतलें सगळें सैन्य मला पायांखालच्या किड्यांसारखें वाटत होतें. हें मी देवाला स्मरून सांगतों. हें कांहीं माझें शौर्य नव्हतें. परंतु परमेश्वराची प्रेरणा होती. मी आपल्या अनुभवावरून सर्वांस असें सांगतों कीं, जर परमेश्वराच्या ठायीं तुमची निष्ठा खरोखर असेल, तर

तुम्हांला यश ठेवलेलें आहे म्हणून तुम्हीं खचीत समजावें. मी आज राजा आहें हें माझ्या निष्ठेचें फल आहे." भगवद्गीतेमध्यें श्रीकृष्णांनीं म्हटलें आहे:—

अनन्याश्चिंतयंतो मां ये जनः पर्युपासते
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम्.

आणखी दुसरी एक गोष्ट आहे. ती अशी. मीरबाबा म्हणून एक माणूस बदकशानांतल्या एका किल्ल्याचा सुभेदार होता. तो मोठा द्रव्यभक्त होता. आणि मनांतून तो अबदुल रहिमानांस पाण्यांत पाहात असे. तरी बाह्यात्कारीं तो आपणास त्यांचा मित्र ह्मणवीत असे, हें ह्यांस ठाऊक होतें. त्यानें एकेवेळीं शिकारीच्या मिषानें त्यांस अरण्यांत नेलें. तेथें, निर्भीडपणानें अबदुलरहिमान त्यास ह्मणाले, "तुमच्या मनांत मला पकडून कैद करून इंग्लिशांकडे पाठवावयाचें आहे, आणि त्यांची मर्जी संपादायाची आहे, त्यास ही वेळ ठीक आहे, नाहीं?" असें ह्मणून त्यांनीं आपली भरलेली बंदूक त्याच्या डोक्याकडे रोंखिली, आणि आपल्या लोकांस त्याच्या लोकांवर हल्ला करावयास सांगितलें. परंतु, ते लोक त्यांस अनुकूळ होते, ह्मणून त्यांनीं त्यांस जीवदान दिलें. पुढें बाबाच्या किल्ल्याजवळची गोष्ट अबदुलरहिमानांनीं अशी लिहिली आहे कीं, "त्याच्या लोकांत शिरून त्याची मान मीं धरिली आणि त्यानें आपली तरवार खालीं टाकिल्यावर, आणि तो शरण आ ल्यावर मीं त्याला सोडिलें. नंतर, मी त्याच्या बरोबर त्याच्या घरीं गेलों, आणि त्याच्या बायकोस आह्मांस जेवायास वाढायास सांगितलें. आणि आह्मी त्याजकडे जेवलों." ही गोष्ट अमीर अबदुलरहिमान ह्यांनीं स्वचरित्रांत तपशीलवार लिहि-

ली आहे. तेव्हां तिच्या सत्यतेविषयीं संशय घेण्यास जागा नाहीं. तरी, तीवरून अबदुलरहिमानांच्या स्वभावाविषयीं मोठा चमत्कार वाटतो. आणि असें मनांत येतें कीं, ह्या गोष्टीस कल्पनेची थोडी भर घालून जर कोणी चांगला ग्रंथकार एकादी कादंबरी लिहील, तर ती फार मनोरम होईल. असो.

काबुलामध्यें ह्या वेळेस इंग्लिश सरकारचे मुख्य आमलदार दोन होते, एक लार्ड राबर्टस् आणि दुसरे सर लिपेल ग्रिफिन. ह्यांस तेथल्या आसपासच्या अमीर लोकांचीं पत्रें येत होतीं. त्याप्रमाणें, अबदुल रहिमान इकडे येत आहेत असें त्यांस कळल्यावरून त्यांसही त्यांचीं पत्रें जात होतीं. कांहीं लोक अबदुल रहिमानांस अनुकूल होते, कांहीं प्रतिकूल होते. प्रतिकूल असण्याचें कारण असें होतें कीं, ते हा अफगाणिस्थान देश इंग्लिशांच्या स्वाधीन करणार आहेत, असा भलताच ग्रह त्यांचा झाला होता. अबदुल रहिमान काबुलाच्या जवळ जवळ येत चालले, तसे वाटेंत हजारों लोक त्यांस मिळाले. तसे कांहीं मोठे संस्थानिकही मिळाले. इंग्लिश अधिकाऱ्यांची ही इच्छा अनुकूल होती ती कळली. ह्मणजे अफगाणिस्थानाच्या गादीवर बसण्यास जें साहित्य त्यांस पाहिजेसें वाटत होतें तें सगळें मिळालें. तेव्हां येथें त्यांचा वनवास सरला, आणि भूपति होण्याच्या पथास ते लागले. ह्यास्तव आतां हें वनवासपर्व येथें पूर्ण केलें पाहिजे. आणि राजपदारोहण कसें झालें त्याचें कथन केलें पाहिजे. तेंही असेंच चित्तवेधक आहे. तें आतां पुढच्या भागीं करूं.



# भाग पांचवा.

——:o:——

## राजपदारोहण आणि शांतिस्थापना.

जया राष्ट्रावरी देवाजीची दया
गुणी राजा तया देव देतो. १.
राष्ट्र निर्दाळावें असें वाटे त्यास
देतो राक्षसास तेव्हां तो तें. २.

**एक इराणी कवि.**

प्रजा हाच कीं वास भू धेनुकेचा
नृपा तूं करीं फार सांभाळ याचा
स्ववत्साचिया जाण वात्सल्ययोगें
अभीष्टार्थ देईल ती भूमि वेगें. १.

**वामन.**

अबदुल रहिमान हे अफगाणिस्थानाच्या जवळ जवळ येत आहेत--किंबहुना अफगाणिस्थानाच्या सरहद्दीपर्यंत आले आहेत, असें कळल्यावर, सर लिपेल ग्रिफिन ह्यांनीं त्यांस इ० स० १८८० च्या एप्रिल महिन्याच्या पहिल्या तारखेचें पत्र एका जासुदाच्या हातीं पाठविलें. त्याचा आशय असा:--"आपण अफगाणिस्थानांत आलां आहां हें इकडे कळलें आहे, ह्मणून हें पत्र लिहिलें आहे. तर, आपण कोणकोणते हेतु मनांत धरून अफगाणिस्थानांत आलां आहां तें आपण काबुलांतल्या इंग्लिश सरकारच्या अमलदारांस कृपा करून कळवावें." त्या जासुदाबरोबर त्यांनीं आणखी असेंही सांगून पाठविलें होतें कीं, तुमचें कल्याण व्हावें, अशी इंग्लिश सरकाराची फार इच्छा आहे; आणखी, तुम्ही रशियन

सरकाराच्या आश्रयास जरी इतकीं वर्षें होतां, तरी, तुम्हांविषयीं इंग्लिश सरकाराच्या मनांत कांहीं एक संशय नाहीं; म्हणून इंग्लिश सरकाराशीं मित्रत्वाच्या नात्यानें वागणें हें तुम्हांस फार हितावह आहे.

ह्या पत्राचें उत्तर अबदुल रहिमान ह्यांनीं चांगलें संभावितपणाचें पाठवून, इंग्लिश सरकाराविषयीं आपली आदरबुद्धि प्रगट केली. आणखी, काबुलास एकदा लवकर येऊन देशाचें अधिपत्य घ्यावें असा आग्रह एप्रिलच्या १६ व्या तारखेच्या पत्रांत त्यांस सर लिपेल ग्रिफिन साहेबांनीं केला होता, त्याचें उत्तर त्यांनीं त्यांस मे महिन्याच्या १६ व्या तारखेस पाठविलें. त्यांचें तात्पर्य असें:-"इंग्लिश सरकाराकडून मला चांगलें साह्य मिळेल अशी आशा मला फार दिवसांपासून होती, तीस आपल्या पत्रावरून पुष्कळ पुष्टीकरण मिळालें आहे. आपणांस अफगाण लोकांचा स्वभाव ठाऊक आहेच. त्यांची पक्की खातरी झाल्याशिवाय ते कोणावर तिळभरही विश्वास ठेवीत नाहींत. मीं काबुलास जावें, अशी अफगाण लोकांची इच्छा आहे खरी. परंतु, त्याच्या आधीं त्यांस कांहीं प्रश्नांचीं उत्तरें पाहिजेत. आहेत ते प्रश्न हे:-

१. माझ्या राज्याच्या सरहद्दी कोणत्या?

२. कंदाहार हें आमच्या राज्यांत मोडावयाचें कीं नाहीं?

३. अफगाणिस्थानांत इंग्लिश सरकाराचा वकील किंवा त्यांचें सैन्य राहावयाचें कीं काय?

४. इंग्लिश सरकाराच्या कोणत्या शत्रूला मीं मागें हटवावें, अशी इंग्लिश सरकाराची इच्छा आहे?

५. इंग्लिश सरकार मला आणि माझ्या देशाला कोणत्या देणग्या देणार?

६. आणि त्या देणग्यांच्या मोबदला आह्मीं इंग्रज सरकाराची कोणती कामगिरी करावी, असें त्यांस वाटतें?

ह्या प्रश्नांचीं उत्तरें कृपा करून पाठवावीं. तीं मी अफगाण लोकांस कळवीन, त्यांचा विचार घेईन, आणि त्यांच्या आमच्या सल्ल्यानें जें काय ठरेल, तें आपणांस कळवीन. माझ्या हातून आणि ह्या राष्ट्राच्या हातून इंग्रज सरकाराची कांहींतरी सेवा व्हावी, असें देवापाशीं मागणें आहे. ह्या सेवेची गरज इंग्रज सरकारास लागावयाचा वेळच यावयाचा नाहीं, आणि येऊं नये. परंतु, काल निरवधि आहे. त्यांत केव्हां काय होतें, ह्याचा काय नेम आहे?" हें पत्र आणिलें त्या जासुदाबरोबर अबदुल रहिमानांनीं तोंडी असा निरोप पाठविला कीं, आज बारा वर्षें मीं रशियाचें अन्न खाल्लें आहे. मी त्यांचा उपकारबद्ध आहें. म्हणून, त्यांच्या मनास वाईट वाटेल, अशी कोणतीही गोष्ट मला पतकरावयाची नाहीं. मी रशिआ आणि इंग्लंड ह्या दोघांचाही स्नेही आहें. त्यांतही, इंग्लंडाकडे माझा ओढा थोडा अधिक आहे. कांकीं, इराणाइतकें स्वातंत्र्य माझ्या देशास त्यांकडून मिळेल, अशी माझी आशा आहे.

ह्या पत्राचें उत्तर येण्यास बरेच दिवस लागले. दरम्यान, अबदुल रहिमान पांजशिर येथून निघून चारिकर येथें येऊन पोंचले. तेव्हां, जमतजमत त्यांजपाशीं ३०००० लोक जमा झाले, आणि सगळे लोक त्यांस आपले राजे म्हणून कबूल करूं लागले. तेव्हां त्यांस मोठा संतोष झाला. तरी ह्या सगळ्यांत कांहीं ईश्वरीसूत्र आहे, असें त्यांच्या मनांत

वारंवार येई, आणि ते त्याचे आभार मानीत. त्यांच्याजवळचे कांहीं लोक, अज्ञानामुळें, आपण होऊन त्यांस असें म्हणाले कीं, आम्ही इंग्लिशांशीं लढण्यास एका पायावर तयार आहों. त्यांस अबदुल रहिमानांनीं उत्तर दिलें कीं, इंग्लिशांशीं लढण्याचें कारण मुळींच नाहीं आहे. कांकीं, काबूलच्या गादीवर बसण्याविषयीं मला त्यांचाच आग्रह आहे, आणि त्याविषयीं त्यांचीं पत्रें मला आलीं आहेत.

अब्दुल रहिमानांच्या पत्राचें उत्तर सर लिपेल ग्रिफिन ह्यांनीं जूनच्या १४ व्या तारखेस लिहिलें. त्याचा आशय येणेंप्रमाणें:—"अफगाणिस्थानाच्या राजकारणांत इराण आणि रशिया ह्यांनीं पडावयाचें नाहीं, हें ठरलेंच आहे. म्हणून, त्यांत इंग्लिश सरकाराशिवाय दुसऱ्या कोणत्याही परकीय सरकारानें पडतां कामास नये—ह्मणजे काबूलच्या अमीरांनीं इंग्लिशांशिवाय दुसऱ्या कोणत्याही परकीय राजाशीं राजकीय संबंध ठेवूं नये. जर एखादें परकीय राष्ट्र अफगाणिस्थानाच्या राज्यकारभारांत हात घालण्याचा प्रयत्न करील, आणि त्यापासून तुह्मांला त्रास होऊं लागेल, तर तुह्मांस साह्य करण्यास इंग्लिश सरकार तयार होईल. आणि तुम्ही जर इंग्लिश सरकाराच्या ह्मणण्याप्रमाणें परकीय राष्ट्रांशीं वागायास सिद्ध व्हाल, तर अशा परकीय राष्ट्रांतल्या लोकांस अफगाणिस्थानांतून काढून लावण्याचा प्रयत्न इंग्लिश सरकार करील. आतां, तुमच्या राज्याच्या मर्यादेविषयीं असें आहे कीं कंदाहार हा सगळा प्रांत दुसऱ्या एका संस्थानिकाच्या स्वाधीन केला आहे, आणि त्यांतले पिशिन आणि सिबी हे दोन गांव मात्र इंग्लिश सरकारानें आपलेकडे ठेविले आहेत. ह्मणून

वायव्येकडचे जे भाग याकूबखानांच्या स्वाधीन होते, त्यांविषयीं इंग्लिश सरकाराला कांहींएक बोलतां येत नाहीं. एवढें कायम राखून, हिरात सुद्धां तुह्मीं आपल्या स्वाधीन करून घेऊन तुह्मीं अफगाणिस्थानावर राज्य करावें, अशी इंग्लिश सरकाराची फार इच्छा आहे. अफगागिस्थानच्या अंतर्गत राज्यकारभारांत हात घालण्याची इच्छा इंग्लिश सरकाराला मुळींच नाहीं. त्याप्रमाणेंच तुह्मी आपल्या राज्यांत इंग्लिश रेसिडेंट ठेवला पाहिजे असेंही नाहीं. तरी, परस्परांचे हेतु परस्परांस कळ-च्या सोईसाठीं काबूळच्या दरबारीं कोणी एक मुसलमान गृहस्थ इंग्लिशांच्या वतीचा असावा, हें बरें."

ह्याचें उत्तर तारीख बावीस जूनचें अब्दुल रहिमानांकडून आलें. त्यांत त्यांनीं बाकी सगळ्या गोष्टी मान्य केल्या. परंतु, कंदाहाराविषयीं असें ह्मटलें कीं, अफगाणिस्थानच्या राज्यांतून कंदाहार वेगळें करावें हें आह्मांस पसंत नाहीं. कां कीं, कंदाहार हें शहर राजकुटुंब राहाण्याचें ठिकाण आहे. तें जर राज्यांत नाहीं, तर बाकीचा मुलुख कांहीं उपयोगाचा नाहीं. तें इंग्लिश सरकारानें कबूल केलें.

ह्याप्रमाणें सगळें ठरलें. अबदुल रहिमानांची काबुलास जाण्याची तयारी झाली. परंतु, पूर्वीपासून त्यांचें असें ह्मणणें होतें कीं, इंग्लिशांचें सैन्य काबुलांत आहे तोंपर्यंत मी तेथें जाणार नाहीं. म्हणून, जूलैच्या २२ व्या तारखेस काबुलामध्यें अफगाण सरदार आणि इंग्लिश सरदार ह्यांचा एक दरबार भरून ग्रिफिन साहेबांनीं अबदुल रहिमान हे अफगाणिस्थानचे अमीर झाले आहेत असें प्रसिद्ध करून असें भाषण केलें कीं, "सरदार अबदुल रहिमानखान हे अफगाणिस्थानाचे अमीर

झाले आहेत, ही गोष्ट महाराणी सरकारास आणि व्हाइसराय साहेबांस फार संतोषदायक झाली आहे. अफगाण लोकांनीं आणि सरदारांनीं असे थोर पुरुष आपले राजे कबूल केले आहेत, ही गोष्ट आभिनंदनीय आहे. त्यांचे ठायीं इंग्लिश सरकाराविषयीं फार प्रेमभाव आहे. तो जोंपावेतों तसाच कायम राहील, तोंपर्यंत त्यांस इंग्लिश सरकाराचें साह्य मिळाल्याशिवाय राहाणार नाहीं. हा स्नेहभाव दाखविण्याचा आतां प्रथम प्रसंग हा आहे कीं, ह्या देशांतल्या ज्या लोकांनीं इंग्लिश लोकांस साह्य केलें आहे, त्यांस त्यांनीं आपल्या मित्रांप्रमाणें वागवावें."

ह्याप्रमाणें काबूल सोडून लार्ड राबर्टस् ह्यांच्या बरोबर कंदाहाराकडे सैन्य रवाना होतांच, अबदुल रहिमान काबुलांत गेले. तेथें लोकांनीं त्यांचा फार बहुमान केला. सर लिपेल ग्रिफिन ह्यांची आणि त्यांची तेथें मुलाखत झाली. तेव्हां लहानसा दरबार तेथें भरला. त्यांत अबदुल रहिमानांनीं भापण करून असें सांगितलें कीं, इंग्लिश सरकारानें माझा बहुमान केला आहे, हे मजवर त्यांचे मोठे उपकार झाले आहेत, हे मी कधीं विसरणार नाहीं. आणि ही माझी तरवार निरंतर त्यांच्या कार्यास सिद्ध राहील. हें वर्तमान जुलैच्या अखेर तारखेस घडलें. परंतु, त्या दिवशीं अबदुल रहिमान बालाहिसार किल्ल्यांत जाऊन सिंहासनारूढ झाले नाहींत. कां कीं, त्यांच्या ज्योतिषी बावांनीं त्यांस असें सांगितलें होतें कीं, त्या दिवशीं कुयोग होता. आणि शिवाय, "अबदुल रहिमान १२९७" असें वर खोदून एक पाचेची आंगठी राज्याभिषेकाकरितां पाहिजे होती, ती तयार

व्हावयाची होती. ह्मणून, तिकडच्या परिपाठानुरूप, अबदुल रहिमान हे, आदितवारीं, आगष्ट महिन्याच्या पहिल्या तारखेस सुमुहूर्तीं, बालाहिसार किल्ल्यांत अफगाणिस्थानच्या गादीवर बसले. अशा प्रकारें, नुसते सरदार अबदुल रहिमान होते, ते, इ० स० १८८० च्या जुलै महिन्याच्या बाविसाव्या तारखेस अफगाणिस्थानचे अमीर झाले.

पुढें, अयूबखानांनीं मैवाड येथें इंग्लिश सैन्याचा पराभव केल्याची तार सिमल्याहून, २९ व्या तारखेस काबुलास आली. तीवरून तेथले अधिकारी घाबरले, आणि अमीर अबदुल रहिमान जवळच झामा येथें गेले होते, तेथें, ग्रिफिन साहेब जाऊन, त्यांस सांगू लागले कीं, आमचें जाणें अफ-गाणिस्थानांतून सुरक्षितपणें होईल, अशी तजवीज लवकर करावी. तेव्हां अमीरसाहेबांनीं त्यांजपाशीं असें सांगितलें कीं, इंग्लिश सरकार आणि आह्मी—अफगाण सरकार—ह्यांच्यामध्यें जो काय तहनामा तोंडीं ठरला आहे, तो कागदावर पडून तो मला मिळावा. त्याप्रमाणें ग्रिफिन साहेबांनीं तहनाम्याचा कागद त्यांस दिला. त्याचें तात्पर्य असें:—"इंग्लिश सरका-राच्या सूचनेप्रमाणें अमीर काबुलाच्या राजासनावर आरूढ झाले आहेत, हें ऐकून गव्हरनर जनरलांस फार संतोष झाला आहे. अमीर साहेबांच्या कारकीर्दींत अफगाणिस्थानच्या लो-कांचें आणि सरदारांचें फार कल्याण होणार आहे, अशी इंग्लिश सरकाराची खातरी आहे, ह्मणून, अमीर साहेबांस अफगाणिस्थानचे अधिपति ह्मणून इंग्लिश सरकारानें कबूल केलें आहे. अमीर साहेबांच्या राज्याच्या अंतर्गत कारभारांत हात घालण्याची इच्छा इंग्लिश सरकारास मुळींच नाहीं,

त्याप्रमाणें अमीर साहेबांच्या दरबारांत इंग्लिश सरकाराचा रेसिडेंटही ठेवावयाचा नाहीं. दोन्ही राष्ट्रांतल्या संबंधाच्या सोईकरितां, कोणी एक मुसलमान गृहस्थ इंग्लिश सरकाराचा एजंट ह्मणून काबूलच्या दरबारांत असावा. परकीय राजांस अफगाणिस्थानाच्या राज्यकारभारांत हात घालण्याचा अधिकार नाहीं असें ठरलें आहे, आणि इराण व रशिया ह्यांनीं त्यांत हात न घालण्याविषयीं अभिवचन दिलें आहे. त्या पक्षीं, इंग्लिश सरकाराखेरीज दुसऱ्या कोणत्याही सरकाराशीं अफगाण सरकाराचा संबंध नसावा. आणखी, यदाकदा, अफगाणिस्थानावर परचक्र आलेंच, तर, जोंपर्यंत, अमीर साहेब, परकीय राज्यसंबंधानें, इंग्लिश सरकाराच्या सल्ल्याप्रमाणें वागतील, तोंपर्यंत, त्यांस, स्वराज्यरक्षणास यथायोग्य प्रकारें साह्य इंग्लिश सरकार करील."

इतके दिवस वनवास काढिल्यासारखी अफगाणिस्थानाची गादी मिळाली, ह्याचा अत्यानंद अबदुल रहिमानांस झाला असेल, आणि ते फार सुख पावले असतील, असें सहज वाटण्याचा संभव आहे. कांकीं, राजपद हें सुखाच्या परमावधीचें माहेरघर आहे, अशी समजूत लोकांत फार दिवसांपासून भरली आहे. परंतु, तो भ्रम आहे. खरा प्रकार अगदीं त्याच्या उलट आहे. तो अबदुल रहिमानांच्या लेखावाटे स्वचरित्रांत बाहेर पडला आहे. त्याचा सारांश असाः—"मी सिंहासनारूढ झाल्या घटकेपासून माझें स्वातंत्र्य नष्ट झालें आहे, आणि अडचणी, निराशा, काळजी आणि दुःख हीं वाढलीं आहेत. माझ्या वडिलांच्या आणि चुलत्यांच्या अमीरीच्या वेळीं मी पुष्कळ राज्यकारभार करीत होतों. पण,

जबाबदारी मजवर नव्हती. ती त्यांच्यावर होती. अधिकार मोठा तितकी जबाबदारी मोठी, आणि जबाबदारी मोठी तितकी काळजी मोठी असें ह्मणतात, तें शब्दशः खरें आहे. 'ज्याचे अंगीं मोठेंपण तया यातना कठीण' हें कांहीं खोटें नव्हे. आमच्या धर्मांत सांगितलें आहे कीं, इतर साधारण माणसांस देवापुढें फक्त आपापल्या मात्र कर्मांचा झाडा द्यावा लागावयाचा आहे, परंतु, राजांस, स्वतःच्या कर्मांचा झाडा द्यावा लागून, शिवाय, देवानें ज्या प्रजा त्यांच्या स्वाधीन केलेल्या असतात, त्यांच्या सुखसमाधानांत कमी पडल्याचा झाडा द्यावा लागतो. पैगंबर महंमद ह्यांचे दुसरे अनुयायी ओमार हे बगदाद येथें राज्य करीत असतां व त्या शहरांतल्या एका पुलावरून बकऱ्यांचा कळप चालला असतां, त्या पुलास एक भोंक पडलें होतें, त्यांत अडकून एका बकऱ्याचा एक पाय दुखावला, त्याबद्दल देवानें ओमार ह्यांस बोल लाविला, असें मौलवी रूम ह्यांनीं आपल्या काव्यांत सांगितलें आहे. ह्यावरून देवानें मजवर केवढी जबाबदारी ठेविली आहे, हें मी समजलों, आणि मनोभावेंकरून त्याची अशी प्रार्थना केली कीं, देवा माझ्या स्वाधीन जीं माणसें केलींस आहेस, त्यांचें संगोपन यथास्थितपणें करण्यास मला शक्ति दे. माझी प्रार्थना तो मान्य करील, अशी मला खातरी होती. कां कीं, कुराणांत पैगंबरानीं ह्मटलें आहे कीं, "जे कोणी, धैर्य आणि शांति धरून, परमेश्वरावर विश्वास ठेवून काम करितात, त्यास तो साह्य करितो." ह्यावरून, सिंहासनारूढ झाल्यावर अमीर अब्दुल रहिमान ह्यांच्या मनाची स्थिति कशी झाली होती, ह्याचें अनुमान सहज होण्यासारखें आहे.

हा सगळा प्रकार इंग्लिश सरकाराच्या मनासारखा झाला. ह्मणजे, अफगाणिस्थानास आंवर घालण्यास जसा अमीर पाहिजे होता, तसा मिळाला. आणि त्यावर तेथल्या बहुतेक लोकांची फार भक्ति होती. ही दुधांत साखर पडली. शिवाय आपली संतुष्टी नवीन अमीरांस प्रदर्शित करण्यास, इंग्लिश अधिकाऱ्यांनीं, काबूल सोडते वेळेस, त्यांस ६६९०००० रुपये रोख दिले, आणि आणखी ९००००० रुपये सप्तंबरांत पाठवून देतों ह्मणून सांगितलें. शिवाय त्यांस तीस तोफाही दिल्या. आणखी, काबूल शहरामध्यें इंग्लिश लोक असतां, त्यांनीं आपल्या संरक्षणाकरितां कांहीं तटबंदी केली होती, ती मोडून टाकून चालतें व्हावें असा त्यांचा विचार होता, ती पाडूं नये ह्मणून अमीर साहेबांनीं त्यांस सांगून पाठविलें. तेव्हां ती त्यांनीं तशीच राहूं दिली. पाडिली नाहीं.

अबदुल रहिमान ह्यांस काबूलची गादी मिळाली. पण, ती सुळावरची पोळी होती. फार काय सांगावें, नुकत्याच झालेल्या राज्यक्रांतीमध्यें राजवाड्यांचा जाळपोळा झाला असल्यामुळें, त्यांस तंबूंत आणि काड्यामोड्यांच्या घाणेरड्या झोंपड्यांत राहून दिवस काढावे लागले. त्यांना निजायला देखील चांगली खोली नव्हती. शिवाय, कांहीं लोकांस हे पाहिजेत होते; कांहीं लोक ह्यांस पाण्यांत पहात होते; पूर्वींच्या अमीरांची मंडळी जागोजाग होती; कोणावर विश्वास ठेवावा आणि कोणावर ठेवूं नये हें कळत नव्हतें; आणि जो तो आपल्या ठिकाणीं चपापून होता. हिंदुकुश पर्वताच्या पलीकडे ह्यांचा पुतण्या इझाक हा अंमल करीत होता. तो उदा-

सीन होता. मैमाना येथील संस्थानिक, उजबंग लोकांचा मुख्य, हा अबदुल रहिमानांचा अधिकार कबूल करीना; तरी त्यांशीं आगळीक करण्याचें धैर्य त्याला होईना. कंदाहारास इंग्लिशांची छावणी होती. तेथें त्यांचा अंमल चालत होता. आणि हिरात शहर अयुबखान बळकावून बसले होते. ह्या सगळ्या जागीं अबदुल रहिमानांस आपला अंमल बसवावयाचा होता. ह्यांपैकीं त्यास कंदाहाराविषयीं फारसे प्रयास पडले नाहींत. कां कीं, तेथें वेगळा संस्थानिक आपल्या स्वाधीन ठेवावयाचा जो विचार इंग्लिश सरकाराच्या मनांत घुटमळत होता, तो त्यांनीं सोडून दिला होता. हें लार्ड राबर्टस् ह्यांस मुळींच संमत नव्हतें. तरी कंदाहार अमीरांच्या स्वाधीन करण्याविषयीं विलायत सरकारचा हुकूम आला. त्यापुढें त्यांचा निरुपाय झाला. त्याप्रमाणें इ० स० १८८१ च्या एप्रिल महिन्याच्या १९ व्या तारखेस कंदाहार इंग्लिश सैन्यानें सोडिलें, परंतु तेथें, याकूबखानांचे बंधु अयूबखान येऊन बसले. त्यांशीं लढाई करून आणि त्यांचा पराभव करून, तें शहर अमीरांनीं सप्तंबरच्या बाविसाव्या तारखेस आपले स्वाधीन करून घेतलें. ह्या प्रसंगाचें वर्णन अमीर अबदुल रहिमानांनीं स्वचरित्रांत केलें आहे. तें फार चमत्कारिक आहे. त्याचें तात्पर्य असें:—“ आमची कारकीर्द चालू होईपर्यंत अफगाणिस्थानांतल्या कवाईत शिकलेल्या सैन्याची रीति अशी होती कीं, समरांगणीं, स्वपरपक्षाचा कांहीं एक विचार न करितां, जय होतोसा दिसेल त्या पक्षास एकदम जाऊन मिळावें. त्या रीतीस अनुसरून, आमच्या पक्षाची सरशी होत चाललेली दृष्टीस पडतांच, कंदाहार शहराजवळच्या

टेंकडीवर ज्या चार पलटणी अयूबखानाच्या होत्या, त्या आ-मचेकडच्या होऊन, खालीं त्यांच्याच पक्षाच्या सैन्यावर गोळ्यांचा वर्षाव करूं लागल्या. तेव्हां, अर्थात्च आमच्या पक्षाच्या लोकांस विशेष स्फुरण आलें, आणि ते मोठ्या आवेशानें लढूं लागले, आणि त्यांनीं शत्रूचा पराभव केला." नंतर अयूबखान इराणांत पळून गेले. तेव्हां हिरातही सहज अमीरसाहेबांस ध्यात्रयास सांपडलें.

ह्या वेळेस अफगाणिस्थानची स्थिति कशी होती ह्याचें वर्णन स्वतः अमीर साहेबांनीं केलें आहे:—" न्यायमनसुबीची व्यवस्था मुळींच नव्हती. मी एकदा हमामखान्यांत गेलों तेथें एक म्हाताऱ्या अफगाणानें आणि त्याच्या बायकोनें मला गांठून, माझ्या दाढ्यामिशा धरून मजकडून आपल्या एका खटल्याचा निकाल करून घेतला. पूर्वींचा राजा आणि त्याचे कामदार हे चैनबाजींत मग्न असल्यामुळें आणि प्रजेस कोणी त्राता नसल्यामुळें, सगळे लोक विपत्तिसागरांत बुडाले होते. त्यांवर कर मनस्वी होते. ते त्यांच्यानें देववेनात. मशीदींत निमाज पढण्यास कोणी जाईनात. त्या रिकाम्या पडल्यामुळें त्यांत नेहमीं गांवांतलीं कुत्रीं भरून राहिलीं असत, आणि तीं तेथें अतिशयित घाण करीत असत. शुक्रवार म्हणजे देवभक्तीचा दिवस. तो सर्व लोक थट्टामस्करींत, जुगारांत, चैनींत, आणि दुराचरणांत घालवीत असत. शहराबाहेर जाबा ह्या ठिकाणीं एवढाले दांडगाईचे खेळ चालत कीं, त्यांत कितीएक माणसें जखमी होत. परमेश्वर कोणत्याही राष्ट्राचा नाश आपण होऊन करीत नाहीं, तर राष्ट्र आपल्या दुष्क-

मींनीं आपला नाश करून घेतें, असें जें कुराणांत म्हटलें आहे तें खरें आहे."

जे लोक अबदुल रहिमानांस विरुद्ध होते, त्यांची भीति त्या- वेळीं फार वाटे. ह्मणून असे लोक हुडकून काढून, त्यांतल्या कितीएकांस देशाबाहेर काढून लाविलें, आणि जे कोणी अपराधी ठरले त्यांस शिक्षा दिल्या. अशा प्रकारें त्यांचा बीं मोड केल्यावर अमीर साहेब देशाच्या व्यवस्थेस लागले. त्यांत त्यांनीं प्रथमतः जागोजागच्या सगळ्या जातींच्या प्रमु- खांत अशीं पत्रें लिहिलीं कीं, तुह्मी जर आह्मांशीं वैर- भावानें वागाल तर तुह्मांस आह्मीं शिक्षा केल्यावांचून राहा- णार नाहीं. परंतु, जर प्रजाधर्मानें नम्रतेनें वागाल, तर, तुह्मांला कोणत्याही प्रकारची इजा न होतां, यथायोग्य रीतीनें साह्य मिळेल. आणि हे अमीर मोठे करारी होते, अशी तिकडे मोठी आख्या होती. तिच्या योगानें ह्या पत्रांनीं लोकांत चांगली दहशत बसली, आणि जिकडे तिकडे स्वस्थता झाली. तरी अमीरांचे हेर गुप्त रीतीनें सगळ्या देशभर हिंडत असत, आणि त्यांजकडून कोठें काय चाललें असे तें सगळें त्यांस तपशीलवार कळत असे.

बंदोबस्ताचें काम सुतीं लागल्यावर अमीर अबदुल रहि- मान ह्यांस दोन बाबींचा विचार पडला. त्यांतली पहिली बाब रोख पैशाची होती. ह्मणजे, त्यांनीं ह्या वेळीं पुष्कळ सैन्य ठेविलें होतें, त्यास पगार द्यावयास रोकड बरीच पाहिजे होती, आणि शिवाय दुसरे खर्च आ करून उभे होतेच. त्यांकरितां त्यांनीं प्रथम टांकसाळ चालू केली. ती जुन्या पद्धतिप्रमाणें हात कामाची करावी लागली; कांकीं, तेव्हां तेथें यंत्रें नव्हतीं.

आणखी त्या टांकसाळेंत त्यांनीं इंग्लिशांकडचे मिळालेले रुपये पाठवून आपल्या शिक्क्याचे करून घेतले. त्यांत त्यांनीं शेंकडा साहा प्रमाणें तांबें मिसळावयास सांगितलें होतें, शिवाय लोकांकडे सरकार देण्याची बाकी थकली होती, ती वसुलांत आणिली, व नुकत्या झालेल्या राज्यक्रांतीच्या वेळीं लुटालूट करून जे कोणी आपला तळीराम गार करून बसले होते, त्यांचें द्रव्य घेऊन त्याचेंही नाणें पाडविलें. अशा प्रकारें पैशाच्या टंचाईची बुजावूज त्यांनीं केली.

दुसरी बाब हत्यारांची होती. देशांत शांतता ठेवण्यास सैन्य तयार पाहिजे, आणि सैन्य तयार राहाण्यास त्यापाशीं शस्त्रें पाहिजेत. तीं नव्हतीं. ह्मणून अबदुल रहिमानांनीं असे हत्यारें तयार करणारे जितके कामगार देशांत मिळाले, तितके मिळवून, त्यांस बंदुका आणि तोफा ओतण्याच्या कामास लाविलें. देशांतल्या लोकांपाशीं हत्यारें होतीं, तीं विकत घेतलीं. शिवाय, जेथें कोठें हत्यारें मिळण्यासारखीं होतीं, तेथें आपले लोक पाठवून त्यांजकडून तीं विकत आणविलीं. अशा प्रकारें हत्यारांची भरती केली. येथें हेंही सांगितलें पाहिजे कीं, अमीर अबदुल रहिमानांच्या आजाच्या वेळेपासून हत्यारें तयार करण्याचा जो कारखाना काबुलांत चालला होता, त्यांत हे स्वतः पुष्कळ काम शिकले होते, तें ह्या वेळीं ह्यांच्या फार उपयोगीं पडलें. म्हणजे, अमीर साहेबांच्या स्वतःच्या देखरेखीनें हत्यारें लवकर आणि चांगलीं तयार झालीं. तीं सैन्यास दिलीं, तेव्हां दंग्याधोप्याची भीति नाहींशी झाली.

शेरअल्लींच्या वेळेपासून लष्करांत चाकरी करण्याविषयीं सर्व लोकांवर सक्ती असे. म्हणजे, अमुक वयाच्या माणसानें कवाइतीचें काम शिकलेंच पाहिजे, आणि प्रसंग पडेल तेव्हां सैन्यास येऊन मिळालेंच पाहिजे, असा कायदा होता; तो अमीर अबदुल रहिमान ह्यांनीं रद्द केला. आणि लष्करांत चाकरीस राहाणें हें लोकांच्या खुषीवर ठेविलें. तें सर्वांस आवडलें.

प्रत्येक पलटणींत एकएक दवाखाना स्थापिला. आणि तेथें जखमी आणि रोगी शिपायांची सर्व प्रकारची शुश्रूषा राहावी, असें केलें. त्याप्रमाणेंच प्रत्येक पलटणींत शाळा घातली. तींत शिपायांनीं फावल्यावेळीं शिकावें, असा नियम केला.

मोठमोठ्या शहरांस आणि गांवांस जाण्यास चांगले रस्ते केले. आणि व्यापार सुरक्षितपणें चालावा म्हणून त्यांवर पोलिसाचे पाहारे ठेविले. त्यांच्या योगानें देशांत रहदारी पुष्कळ वाढली, आणि व्यापारास फार उत्तेजन आलें.

त्या स्थितीमध्यें अबदुल रहिमान ह्यांस मंत्री देखील चांगलेसे मिळाले नव्हते. त्यांनीं त्यांविषयीं अशी एक गोष्ट लिहिली आहे कीं, एकदा शहरामध्यें धान्य अतिशयित महाग झालें, आणि गरीब लोकांस पोट भरावयाची अडचण पडूं लागली. तेव्हां आतां पुढें काय करावें असें मीं आपल्या मंत्र्यांस विचारिलें. तेव्हां त्यांनीं मला सांगितलें कीं, दाणेवाल्यांस खूब शिक्षा करावी, ह्मणजे ते धान्य सस्तें विकूं लागतील. तें ऐकून मला अतिशयित हंसायास आलें. आणि तेव्हांपासून पुढें मीं त्यांना कधींही सल्लामसलत विचारिली नाहीं.

राज्याची अंतर्गत व्यवस्था लावण्याच्या कामाकडे अमीर अब्दुल रहिमानांचें लक्ष लागलें असतां, मध्यंतरींच त्यांस आपल्या सरहद्दीवरच्या शिगनान नामक एका संस्थानावर फौज पाठवून तें खालसा करावें लागलें. त्याचा प्रकार असा. त्या संस्थानाचा अधिपति मीरशाहा युसफअल्ली ह्या नांवाचा माणूस होता. त्यानें आपल्या सापत्न आईस हालहाल करून ठार मारून गादी बळकाविली होती ह्मणतात. तरी, तो त्या संस्थानांतल्या लोकांचा सांभाळ चांगला करीत असे, तेणेंकरून तो त्यांस फार आवडत असे ह्या संस्थानांत इ० स० १८८२ ह्या वर्षी डाक्टर आलबर्ट रीगल हा रशियन गृहस्थ प्रवासाकरितां आणि कांहीं नवीन शोध करण्याकरितां आला. तें ऐकून अमीर अब्दुल रहिमान ह्यांस फार वाईट वाटलें. त्याविषयीं त्यांनींच आपल्या चरित्रांत ह्मटलें आहे कीं, "माझ्या हेरांनीं मला खातरीनें असें कळविलें कीं, मीर युसफ अल्ली हा रशियन लोकांस अनुकूल झाला आहे, आणि तो त्यांच्या तंत्रानें वागायाच्या विचारांत आहे. तेव्हां मला असें भय पडलें कीं, कांहीं वेळानें रशियन लोक त्या संस्थानांत येऊन राहिले, तर त्यांस तेथून हांकून लावण्याचें काम आपल्याच्यानें होणार नाहीं, आणि तें आपल्या राज्यास एक मोठें भय होईल. ह्मणून मीं जनरल कत्तलखान आणि सरदार अबदुल्लाखान ह्यांस सैन्यासहवर्तमान त्यावर स्वारी करण्यास पाठविलें. त्यांनीं पहिल्या तडाक्यास त्याचा पराभव करून त्याला त्याच्या कुटुंबासह कैद करून आणिलें. नंतर मीं कंदाहारच्या गुलअझरखानांस त्या प्रांतावर सुभेदार नेमिलें. त्यांचा अमल तेथें बसतो न बसतो इत-

क्यांत, पूर्वीच्या मीर युसफ अल्लीच्या बोलावण्याप्रमाणें, एम्. इव्हानाफ हा एक रशियन सरदार कांहीं सैन्य घेऊन तेथें आला. पण त्याचें कांहीं जमलें नाहीं. हा वाद इ० स० १८९३ च्या डुरांड कमिशनापर्यंत तसाच भिजत पडला होता."

हें संस्थान खालसात झालें, हें एके प्रकारें फार चांगलें झालें. कां कीं, ह्यांत गुलामांचा व्यापार मनस्वी चालत होता, आणि जुलुमाची तर कमाल झाली होती. मीर ह्यांस जरा कोणी अपराधी सांपडला कीं, त्याला ते बाहेरदेशीं पाठवून गुलाम ह्मणून विकून टाकवीत असत; आणि तसा काहीं एकादा मोटा अपराध असला ह्मणजे त्याच्या सगळ्या कुटुंबाच्या नशीबीं ती शिक्षा भोगावयाची येई. आणखी त्या संस्थानांत गुलाम कमी झाले ह्मणजे मीर हे पामीर येथें आपले लष्करी लोक पाठवून त्यांजकडून तेथील लोक पकडून आणून गुलाम करीत असत. हें अमीर अबदुल रहिमान ह्यांस अतिशयित अन्यायाचें वाटत असे. ह्मणून त्यांनीं तो प्रांत घेऊन तेथला दुष्ट व्यापार नाहींसा केला, हें योग्यच केलें.

नंतर, शिनवारी ह्या जातीचे रानटी लोक जलालाबादेच्या आग्नेयीकडच्या भागांत पेशावरच्या सडकेच्यानजीक राहात होते, त्यांस आपल्या ताब्यांत आणण्याचा उद्योग अमीर अबदुल रहिमानांनीं चालविला. ते जबरदस्त दांडगे, लुटारू आणि क्रूर होते. पेशावराहून काबुलास यावयाचें ह्मटलें ह्मणजे प्रवाशांस प्राणसंकट वाटे. ह्या लोकांचा बंदोबस्त सरदार पाठवून व्हावयाचा नाहीं, असें अमीरांस वाटून, त्यांनीं काबु-

लास आपले वडील चिरंजीव हबीबुल्ला ह्यांस ठेविलें, आणि इ० स० १८८३ ह्या वर्षी ते स्वतः सैन्यासहवर्तमान त्या लोकांवर स्वारी करायास निघाले. ते प्रथम जलालाबादेस आले. आणि त्यांनीं त्या लोकांच्या नायकांस बोलावून आणून, आणि त्यांस धर्माच्या पुष्कळ गोष्टी सांगून. नीट शांतपणें राहाण्याविषयीं पुष्कळ बोध केला. परंतु, त्याचा कांहीं एक उपयोग झाला नाहीं. ह्याचें कारण, ते स्वभावतः द्वाड होते, हें तर खरेंच. आणखी त्यांविषयीं अबदुल रहिमान, पुस्तु भाषेंतलें एक पद्य ह्मणून दाखवीत असत. त्याचा आशय असा होता कीं, "तुह्मी पिढ्यानपिढ्या पाहिजे तितकी डोकेंफोड करा, परंतु, विंचू, सर्प आणि शिनवारी लोक ह्यांचें मन कदापि धरितां यावयाचें नाहीं." ह्यांत कांहीं शंका नव्हती.

परंतु, त्यांत असें झालें होतें कीं, शेरअल्लींच्या कारकीर्दीत जलालाबादेस शाहामद ह्मणून एक सुभेदार महामूर्ख होता. त्याजकडे लोक लुटालुटीची आणि मारामारीची दाद मागायास गेले ह्मणजे तो उलटा त्यांनाच धिसपिटावून लावी, आणि ह्मणे कीं, त्या शिनवारी लोकांचें आणि आमचें वैमनस्य यावें ह्मणून तुह्मी ह्या सगळ्या कागाळ्या उठवीत आहां. त्यामुळें ते लोक फारच त्रासदायक झाले होते.

ते लोक सामोपचारानें वळत नाहींत असें पाहून, अमीर अबदुल रहिमानांनीं त्यांशीं लढण्याचा विचार केला, आणि सर्व सैन्याची सिद्धता केली. तिकडे ते लोकही दुसऱ्या कांहीं लोकांस साह्यास बोलावून अमीर अबदुल रहिमानांशीं लढण्यास तयार झाले. त्यांचें एकंदर सैन्य

१५००० जमलें. त्यांवर हल्ला करण्यास अमीरांनीं ३ पायदळ पलटणी, १ स्वारांची पलटण, आणि दोन तोफखाने इतकें सैन्य देऊन गुलाम हैदर ह्या सरदारास हुकूम केला. त्याप्रमाणें तो हल्ला होतांच, त्या रानटी लोकांची त्रेधा उडाली, आणि त्यांचा अगदीं पराभव झाला. त्यांचे हजारों लोक समरांगणीं पतन पावले. त्यांच्या मुंडक्यांच्या राशी घालण्याविषयीं अमीरांनीं हुकूम केला. तेव्हां त्या लोकांत त्यांचा दरारा बसून, ते आपोआप शरण आले, आणि अमीरांशीं प्रजाधर्मानें वागण्यास कबूल झाले.

मैमाना हा प्रांत दिलावरखान ह्याजकडे होता. तो आपणास स्वतंत्र ह्मणवूं लागला. त्याला आपल्या ताब्यांत आणण्याकरितां अमीरांनीं त्याजवर सैन्य रवाना केलें. तेथें किल्ला होता. आणि दिलावरखान त्यांत मोठ्या बंदोबस्तानें राहिला होता. ह्मणून त्यास कांहीं दिवस वेढा घातल्यावर आणि एक लहानशी चकमक झडल्यावर तो किल्ला आणि तो प्रांत अमीरांच्या सैन्याच्या हातीं आला. आणि दिलावरखानास कैद करून काबुलास आणिलें. आणखी त्याच्या कैदेंत बहुतदिवसपर्यंत मीर हुसेनखान ह्मणून जो एक गृहस्थ अमीरसाहेबांच्या पक्षाचा होता, त्यास मुक्त करून त्यालाच त्या प्रांतावर सुभेदार नेमिलें. हीं वर्तमानें इ० स० १८८४ त घडलीं.

इ० स० १८८५ ह्यावर्षी देशांतलीं कांहीं बंडें अमीर अबदुल रहिमानांस मोडावीं लागलीं. तीं फार महत्वाचीं नव्हतीं. परंतु, रशियन लोकांच्या नेहमींच्या परिपाठाप्रमाणें, त्यांनीं हळूहळू एकएक मजल सरकत सरकत पुढें पुढें

येऊन पेंजदे हें ठिकाण घेतलें, त्याविषयीं अमीरांस फार वाईट वाटलें, आणि त्यांस मोठी काळजी उत्पन्न झाली. कांकीं, त्यांस तें ठिकाण इंग्लिश सरकार घेऊं देणार नाहीं, अशी त्यांना आशा होती. त्याप्रमाणें कांहीं झालें नाहीं.

ह्याच्या पुढच्या वर्षी तर अमीर अबदुल रहिमान ह्यांच्या सगळ्या राज्यात-म्हणजे सगळ्या अफगाणिस्थानांत चोहीं-कडे थोडाबहुत बंडावा उठल्यासारखा झाला. त्यास कारणें काय झालीं होतीं, त्यांतलीं कांहीं कारणें अमीरांनीं आपल्या चरित्रांत सांगितलीं आहेत. तीं हीं:-१. शेरअल्लींच्या बेबंद कारकीर्दीमध्यें सगळे मुल्ले आणि सगळे खान हे अगदीं स्वतंत्र राजासारखे होऊन बसले होते, त्यांचे अधिकार ह्या वेळीं कमी करून, त्यांस इतर रयत लोकांप्रमाणें वागायास लाविलें होतें, हें त्यांस आणि त्यांच्या अनुयायांस विषवत झालें होतें. २ शेरखान तोखी गिलझाई हा एक प्रमुख बंडवाला होता, त्याला धरून कैदेंत टाकिलें होतें. त्याचे अनुयायी पुष्कळ होते, ते सगळ्या मुलुखांत ढवळाढवळ करीत होते. ३. अस्मतुल्लाखान आणि दुसरे गिलझाई सरदार हे शेरअल्लींच्या पक्षाचे होते, आणि त्यांचे आप्तही होते, त्यांचा पत्रव्यवहार अब्दुल रहिमानांच्या शत्रूंशीं गुप्तपणें चालला होता. त्यानें लोकांचीं मनें चलबिचल होत होतीं. ४. लोकांकडे सरकारदेणें राहिलें होतें, तें वसूल करण्यास अमीरांनीं हुकूम दिला होता. तो सगळ्या लोकांस फार कडू वाटत होता. ५. एकंदर देशाच्या उत्पन्नांतलें अर्धें उत्पन्न मुल्ला वगैरे धर्मप्रचारकांस देण्याचा परिपाठ पडला होता, आणि बाकीच्या अर्ध्यांत देशाचा खर्च भागेना. ह्मणून

त्या धर्मसंबंधीं नेमणुका ह्या अमीरांनीं कमी केल्या होत्या, तें लोकांस वाईट वाटलें होतें. अशा अनेक कारणांनीं पुष्कळ लोकांचीं मनें क्षुब्ध झालीं होतीं. आणि ते अबदुल रहिमानांच्या विरुद्ध उठण्यास तयार झाले होते. कितीएक ठिकाणीं गडबडी झाल्या देखील. शिवाय, त्यांच्या दुसऱ्याही खटपटी कमी चालल्या होत्या असें नाहीं. त्यांतल्या कांहीं लोकांनीं सर आलिव्हर सेंट जान ह्यांच्या मार्फत महाराणी व्हिक्टोरिआ ह्यांस देखील असा एक अर्ज पाठविला होता कीं, " आपल्या मनांत अफगाणिस्थानांतल्या विपत्तिग्रस्त लोकांस जर साह्य करावयाचें असेल, तर त्यास ही संधि फार उत्तम आहे. अशी संधि पुनः यावयाची नाहीं. द्यावयाचें असल्यास आह्मांस साह्य लवकर द्यावें." हें पत्र महाराणीसाहेबांच्या प्रधानांच्या हातांपर्यंत पोंचलें होतें कीं नाहीं, हें कळत नाहीं. परंतु, असा कांहीं प्रयत्न झाला होता, असें अमीरसाहेबांस खातरीच्या माहितीवरून कळलें होतें.

पुढें गिलझाई लोक उठले. त्यानीं काबुलापासून कंदाहारपर्यंत जो रस्ता आहे, त्यावर कितीएक वाटसरूंस ठार मारिलें, आणि आसपासच्या प्रदेशांत धुमाकूळ मांडिला. त्यांवर अमीर साहेबांनीं आपलें सैन्य पाठविलें. त्यांवर मुख्य सरदार सय्यद अल्लीखान हे होते. त्यांशीं लढाई करून गिलझाई लोकांनीं त्यांचा अगदीं पराभव केला, आणि त्यांपासून १४० उंटें, ८० तंबू, आणि ३०००० रुपये रोकड इतकें हिसकावून घेतलें. तेव्हां त्यांस मोठें स्फुरण चढलें आणि त्यांस दुसरे पुष्कळ बदमाश लोक मिळाले. परंतु, इतक्यांत हिंवाळा

लागला. त्यामुळें उभय पक्षांस लढाईचा उद्योग तकूब करणें भाग पडलें. तरी, अमीरांवर उठण्याविषयीं लोकांस चिथविण्याचें काम गिलझाई लोक करीतच होते. पुढें उन्हाळा लागतांच बंडखोरांनीं दंगा चालविला. स्वतः अमीर साहेबांच्या कांहीं पलटणी गिलझाई लोकांनीं भरलेल्या होत्या, त्या आपल्या जातिबांधवांच्या चिथवणीवरून बिथरल्या, आणि त्यांस मिळाल्या. हा प्रकार हिरातेस झाला. परंतु, अमीरसाहेब तिळभरही डगमगले नाहींत. त्यांनीं आपल्या दुसऱ्या सैन्याची जमवाजमव करून बंडखोरांवर हल्ला केला, आणि एक दोन मोठ्या लढायांत त्यांची अगदीं दाणादाण करून टाकिली. हातीं लागलेल्या बंडखोरांपैकीं फाजलखान ह्याचे हालहाल करून त्यापासून त्या बंडाविषयींचीं सगळीं कारस्थानें वदवून घेतलीं, त्याची दाढी उपटली, आणि शेवटीं त्याच्या डोक्यावर कढत तेल ओतिलें, त्यानें तो मरण पावला. मुल्ला अबदुल करीम हा कुरम येथें पळून गेला. तेव्हां इकडे त्याच्या बापाचें प्रेत खणून काढून, त्याच्या थडग्यावर गाढवांचा नांगर फिरविला. आणि फजलखान ह्मणून एक सरदार होता. तो मूळचा अमीरसाहेबांच्या लष्करांतला अमलदार होता. त्यानें पेंजदेच्या आणीबाणीच्या वेळीं जरी सुस्ती केली होती, तरी अमीरसाहेबांनीं, त्यास त्याची क्षमा करून, त्यास दुय्यम सेनापतीच्या जागीं नेमिलें होतें. तो ह्या बंडास सामील झाला त्याला अमीरसाहेबांच्या हुकुमावरून, दगड मारमारून ठार मारिलें. हें शासन त्यास अशासाठीं दिलें कीं,

निमकहरामपणा राजाशीं केला ह्मणजे काय गति होते, ती सगळ्या लोकांस कळावी.

ह्या लढाईंत मोठा पराक्रम जनरल गुलाम हैदरखान ह्यांनीं केला. ते परत काबुलाकडे येऊं लागले, तेव्हां अमीरसाहेबांनीं त्यांस सामोरें कांहीं सैन्य पाठविलें. आणि ते शहरांत आल्यावर त्यांचा मोठा मान करून त्यांस दरबारांत रत्नजडित पदकें वगैरे बहुमोल बक्षिसें दिलीं. अशा प्रकारें गिलझाई लोकांच्या बंडाचा शेवट झाला.

इ० स० १८८७ च्या सुमारास अयूबखानांनीं हिराते-जवळ येऊन पुनः कांहीं उचल मांडिली होती, तीवरून अमीरसाहेबांच्या ताब्यांतल्या मुलुखांत पुनः गडबड होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं होतीं. परंतु, पुढचें भविष्य जाणून, त्या संबंधाची तयारी आधींच झालेली होती. तिच्या योगानें तीपासून कांहीं उपद्रव झाला नाहीं. तेव्हां अयुबखानांची सर्व प्रकारीं निराशा झाली. आणि आतां आपल्या हातून पुढें कांहीं एक व्हावयाचें नाहीं, असें त्यांच्या मनास वाटून, ते हिंदुस्थान सरकारचे एजंट जनरल म्याकलीन ह्यांच्या स्वाधीन झाले. आणि त्यांनीं त्यांना हिंदुस्थानांत पाठवून दिलें. तें ऐकून, अफगाणिस्थानांतल्या त्यांच्या पक्षपात्यांचे हातपाय मोडले. तें अफगाणिस्थानांत शांतता स्थापित हो-ण्यास पुष्कळ उपयोगीं पडलें.

एंझाकखान हा अमीर साहेबांचा चुलत भाऊ अझीम ह्यांचा मुलगा होता. तो अफगाण तुर्कस्थानचा सुभेदार होता. त्यावर अमीर साहेबांचा फार लोभ होता, आणि त्यांनीं त्याला स्वतःच्या आणि प्रांताच्या रक्षणार्थ आपल्या जवळचीं उत्तम

उत्तम शस्त्रास्त्रें दिलीं होतीं. तो शिरजोर झाला होता. तो आपणांस स्वतंत्र म्हणवूं लागला, आणि अमीर अबदुल रहिमान ह्यांस जुमानीनासा झाला आहे, असें लोकांस वाटे. तो मोठा धर्मिष्ट होता, त्यामुळें लोकांत त्याचें वजन पुष्कळ होतें. हा वनवासामध्यें, अमीर साहेबांच्या बरोबर होता, आणि हे दोघे आक्ससनदी बहुतेक एकाच वेळीं उतरून इकडे आले असेंही म्हणतात. आणखी मी तुम्हांशीं प्रजाधर्मानें वागेन, अशी त्यानें त्यांशीं आणभाक केली होती. परंतु तें सगळें तो विसरला होता. त्यास, आपल्या ताब्यांतल्या प्रांताचा हिशेब देण्याकरितां अमीर साहेबांनीं काबुलास बोलाविलें. तेव्हां स्वतः न येतां, त्यानें आपला एक कारकून पाठविला. त्यास अमीर साहेबांनीं ठार मारिलें. तेव्हां उघड बंडावा माजून, त्यावर अमीर साहेबांनीं गुलाम हैदरखान आणि अबदल्लाखान ह्यांस रवाना केलें. त्यांसही तें काम भारी जाईल असें वाटल्यावरून अमीरसाहेब स्वतः सैन्यासहवर्तमान त्यावर गेले. तेव्हां ऐझाकखान आणि त्याचे अनुयायी ह्यांची धाारण पांचांवर बसली. ह्या सैन्याचें तुमुळयुद्ध सप्तेंबरच्या २९ व्या तारखेस गिझनीगाक ह्या दरीमध्यें प्रातःकाळापासून संध्याकाळापर्यंत झालें. तेव्हां ऐझाक ह्याजकडे सुमारें २४००० सैन्य होतें. पुष्कळ झटापटी होऊन शेवटीं अमीरसाहेबांच्या सैन्यास जय आला. त्याच्या थोडेसें आधीं अमीरसाहेबांच्या सैन्यांतले कांहीं लोक निमकहराम होऊन, ऐझाक बसला होता, तेथें त्याला मिळण्याकरितां ह्मणून गेले. ते आपल्या शत्रूकडचे लोक आपणास धरण्यास आले आहेत, असें त्याला वाटून तो एकसारखा पळत

सुटला, आणि रशियाच्या आश्रयास जाऊन राहिला. तो पळाला असें कळल्यावर मगतर त्याच्या सैन्यास पळतां भूय थोडी झाली. ह्या अमीरांच्या सैन्यानें कुडजचे सुलतान मुराद ह्यांस आक्सस नदीच्या पार हांकून लाविलें, आणि काबलच्या लोकांस चांगली दहशत बसण्याकरितां, कितीएक बंडखोरांस काबूल येथें नेऊन ठार मारिलें. कितीएकांस तर जागच्याजागीं गोळ्या घालून ठार मारिलें. ह्या प्रकरणीं अमीरसाहेबांनीं ह्मटलें आहे कीं, "माझींच हत्यारें माझ्या लोकांस मारक होतील—आणि ज्या गोळ्या ऐझाक ह्याच्या हातांत मीं दिल्या, त्या माझ्यावर सुटतील, असें कधीं माझ्या स्वप्नींही आलें नव्हतें. तो स्वतः आपल्या पित्याशीं बेइमान झाला. तुर्कस्थानच्या सैन्यास उत्पन्न पुरत नाहीं, असें ढोंग मला दाखवून, मजकडून आणखी पैसा नेऊन, पुष्कळ धनसंचय त्यानें केला, आणि सैन्य ठेविलें, आणि तुर्क लोकांस भुलवून, त्यांवर आपल्या साधुत्वाची छाप त्यानें बसविली. त्याच्या लांबलांब प्रार्थना पाहून मुल्लालोक देखील त्यास मोठा ईश्वरभक्त मानूं लागले. पैगंबर महमदांनीं असें ह्मटलें आहे कीं, 'उपास करणें ह्मणजे अन्न वांचविणें आहे, लांबलांब प्रार्थना करीत बसणें हें आळशी विधवांसारखें काम चुकविणें आहे, परंतु, दुसऱ्यांस साह्य करणें हीच शूराची खरी भक्ति आहे,' हें ते विसरले. त्याप्रमाणेंच त्यांनीं सांगितलें आहे कीं, आकाशांत उडणें हा कांहीं साक्षात्कार नव्हे, भिकार माशा त्या देखील आकाशांत उडतात; पुलाशिवाय किंवा नावेशिवाय नदीपार जाणें हाही साक्षात्कार नव्हे, कुत्रीं मांजरें आणि लांकडांचें

भूस ह्यांसही तें सहज करितां येतें; परंतु, दुःखितांस साह्य करणें आणि त्यांचें प्रेम संपादणें हाच खरा साक्षात्कार आहे. तो माणसानें करून दाखवावा, अशी देवाची इच्छा आहे.' हें त्या मुल्लालोकांस आठवत नाहीं, ह्याचें नवल वाटतें."

हें सगळें क्रूरपण इकडे हिंदुस्थानच्या गव्हरनरजनरलांस कळलें, तेव्हां त्यांनीं अमीरसाहेबांस असें लिहिलें कीं, ह्या सगळ्या निर्दयपणाविषयीं आह्मांस फार खेद वाटत आहे. त्याचें उत्तरही त्यांस अमीरसाहेबांनीं दिलें. परंतु, हा पत्रव्यवहार कोठें बाहेर आलेला आढळत नाहीं. तरी, गव्हरनर जनरलांनीं त्यांस लिहिलें होतें ह्मणतात कीं, तुमचें हें क्रूरपण रशियास तुमच्या राज्यव्यवस्थेंत ढवळाढवळ करण्यास एक चांगलें कारण सांपडेल, तें बरें नाहीं. त्यावर अमीर साहेबांचा असा जबाब गेला ह्मणतात कीं, सध्याच्या स्थितींत काय करावें, हें तुमच्या लक्षांत येण्यासारखें नाहीं. हे बंडखोर पुनः डोकें वर न करतील असा पक्का बंदोबस्त केला पाहिजे, तो ह्याशिवाय दुसऱ्या मार्गानें व्हावयाचा नाहीं. ह्या गोष्टीविषयीं इ० स० १८९० त पार्लमेंटामध्यें ब्राडला ह्यांनीं प्रश्नही केला होता, आणि माझरीशेरिफ येथें जे अनर्थ झाले, ते जर तेव्हां सगळे बाहेर येऊन लोकांस कळले असते, तर, इंग्लिश सरकारच्या स्नेहांतल्या राजानें अशीं घोर कर्में कशीं होऊं द्यावीं, ह्याविषयीं पुष्कळच चर्चा झाली असती, आणि लोकमत चलित झालें असतें, ह्यांत कांहीं संशय नाहीं.

ह्या स्वारीच्या वेळीं अमीरसाहेब काबुलापासून बरेच दूर असतां, असें घडलें कीं, तुर्कस्थानच्या रशियन गव्ह-

रनरानें त्यांस असें सांगून पाठविलें कीं, अफगाणिस्थान आणि रशियन तुर्कस्थान ह्यांच्या सरहद्दीवर आह्मी आपल्या पांचशें लष्करी लोकांची लटकी पळपकड करून कवाईतीची परीक्षा घेणार आहों, त्याविषयीं आपले मनांत भलताच दुजाभाव येऊं नये. त्यावर अमीर साहेबांनीं त्यांस असें उत्तर दिलें कीं, त्याविषयीं भलतीच कल्पना आमच्या मनांत येण्याचा मुळींच संभव नाहीं. कां कीं, त्याच वेळाच्या सुमारास त्या जागेच्या समोरच आह्मी आपल्या पांच हजार लष्कराची कवाईत कांहीं दिवस पाहाणार आहों. डोळा फुटूं नये आणि काडी मोडूं नये, असें उत्तर देणें आणि असें वागणें हेंच कायतें मुख्य शहाणपण आहे.

ह्यानंतर हजारा लोक उठले. ते काबुलाच्या पश्चिमेस हिरातेच्या जवळच्या जंगली प्रातांत मुख्यत्वें राहातात. तरी, हजारा लोक, थोड्याबहुत प्रमाणानें सगळ्या अफगाणिस्थानभर—किंबहुना घरोघर पसरले आहेत. कां कीं, घरांतले बहुतेक सगळे नोकर ते आहेत. ते जातीचे मोठे अभिमानी आणि कडक आहेत. ते कितीएक पिढ्यांपासून अफगाणिस्थानाच्या मुलुखावर वारंवार हल्ले करून त्रास देत आले आहेत. परंतु, पूर्वींच्या कोणत्याही राजाच्यानें त्यांस पूर्णपणें जिंकवलें नाहीं. त्यांनीं ह्या वेळाच्या सुमारास पूर्ववत कांहीं बंडाळी माडिली. तेव्हां अमीर साहेबांनीं त्यांवर कडसखान सरदारांस सैन्यासहवर्तमान पाठविलें. त्यांनीं त्यांचा बराच बंदोबस्त केला. तरी, त्या लोकांशीं कडक रीतीनें वागणें परिणामीं बरें व्हावयाचें नाहीं, असें अमीर साहेबांस खचीत वाटून, त्यांनीं त्यांतल्या कितीएकांस दरबारीं बोलावून

आणून कांहीं चांगलीं बक्षिसें देऊन खूष केलें. तरी त्यांवर त्यांचा विश्वास नव्हता. कांहीं हजारा लोकांनीं अमीरसाहेबांस अशी विनंती केली कीं, आह्मांस आमच्याच देशांत कांहीं अधिकारावर नेमावें. त्यांस उत्तर ह्मणून अमीरसाहेबांनीं एक गोष्ट सांगितली. ती अशी. एका बागेमध्यें एक माळी होता, त्याच्या मुलास एक साप डसला, ह्यानें तो मरण पावला. त्या सापास तो माळी ठार मारावयास धांवला, आणि त्यानें त्यावर कुऱ्हाड घातली. तिनें त्याचें शेंपूट तुटलें, आणि तो आपल्या बिळांत जाऊन बसला. तरी, त्याचा सूड घेण्याकरितां, कपटानें तो त्यास ह्मणाला, “ मित्रा तूं बाहेर ये; तुझ्याशिवाय आह्मांला कोणाला करमत नाहीं.” त्यास त्या सापानें उत्तर दिलें,“बाबा, जोंपर्यंत तुझ्या मुलाची आठवण तुला आहे, आणि माझ्या शेंपटाची आठवण मला आहे, तोंपर्यंत तुझी माझी मैत्री कदापि व्हावयाची नाहीं. कवितेंत हें ह्मणायाचें ह्मणजे जसें:—

तुजला तव पुत्राचें मत्पुच्छाचें मला असे स्मरण
तोंवरि तुजमजमध्यें नाहीं घडणार खचित मित्रपण.

हें देशांतलेंच काम अमीरसाहेबांस करावयाचें होतें असें नाहीं. रशियाच्या बाजूचाही त्यांस त्रास मिळावयाचा होता. तो त्रास मुख्य रशियन सरकाराकडून होत नव्हता, तर सरहद्दीवरच्या त्यांच्या कामदारांकडून होत होता. त्याचीं एक दोन उदाहरणें सांगतों. कर्नल यानाफ हा एक रशियाचा सरदार इ० स० १८९२ च्या जूलै महिन्यांत शिगनान ह्या गांवाकडे चाल करून आला, त्याची आणि अफगाणिस्थानाकडचे सरदार समशुद्दीनखान ह्यांची गांठ सोमाडरश ह्या ठिकाणीं पडली. रशियन सरदारानें, अफगाण सरदारांस तें ठिकाण

सोडून पलीकडे जाण्यास सांगून पाठविलें. त्यांस त्यांनीं असें उत्तर दिलें कीं, आम्हांस आमच्या यजमानांचा म्हणजे अमीर अबदुल रहिमान ह्यांचा मात्र काय तो हुकूम मानावयाचा आहे, इतरांच्या हुकुमास आम्ही जुमानीत नाहीं. हें बोलणें समक्षही होण्याचा वेळ आला. तेव्हां यानाफ ह्यानें समशुद्दीनांच्या नाकावर ठोंसा मारिला, आणि तरवारीस हात घातला. त्यासरसें समशुद्दीनांनीं बंदूक काढून गोळी झाडली. ती यानाफ ह्यास निसुटती लागून, त्याच्या मागच्या त्याच्या शिपायास लागली. तिनें तो मरण पावला. तेव्हां सगळे लोक हातघाईस आले. आणि तेथें मोठीच मारामार झाली. तींत, अफगाण लोक सगळे दाहाबारा होते, आणि रशियन लोक पुष्कळ होते, त्यामुळें, रशियनांची सरशी होऊन, सगळे अफगाण लोक तेथें मरण पावले. भिऊन पळाले नाहींत. अमीरसाहेबांनीं असें म्हटलें आहे कीं, ह्याविषयीं रशियास आम्ही काय तें दाखविलें असतें, परंतु, रशियाच्या वाटेस न जाण्याविषयीं इंग्लिश सरकाराशीं आमचें वचन गुंतलें होतें, त्यापुढें आमचा निरुपाय झाला.

डुरांड साहेबांचें सरहद्दीसंबंधाचें मिशन अफगाणिस्थानाकडे येत आहे, असें रशियन लोकांस कळलें तेव्हां त्यांस फार वाईट वाटलें. आणि ते अगदीं खवळून गेले. त्यांच्या लष्कराची एक तुकडी बदकशानांतल्या मर्घाब ह्या अफगाण शहरावर चालून आली, आणि त्याविषयीं अमीरसाहेबांनीं, जलालाबादेस, डुरांडसाहेबांस आणि हिंदुस्थान सरकारालाही लिहून कळविलें, आणि चकमक झाडण्याची आपली उत्सुकता प्रगट केली. परंतु, त्यांजकडून तावडतोब असें लिहून आलें

कीं, तुह्मी कांहीं एक बोलूं नका. पण, हें इकडे होत होतें तितक्यांत तिकडे खडाजंगी वाजून, अमीरसाहेबांचे सरदार सय्यद शाहाखान ह्यांनीं, रशियाच्या लोकांवर गोळ्यांची वृष्टि करून त्यांना एकदम मागें हटविलें. आणि अफगाण लोक कसे आहेत हें त्यांस चांगलें शिकविलें. तेव्हां त्यांचे डोळे उघडले. आणि त्या वेळेपासून—इ० स० १८९३ पासून—ह्या वेळेपर्यंत रशियन लोक अफगाण लोकांच्या वाटेस कधीं गेले नाहींत.

अमीरसाहेबांनीं अगदीं शेवटचा जो प्रांत घेतला तो काफरिस्थान होय. हा प्रदेश काबूल प्रांताच्या ईशान्येस आहे. येथले लोक अतिशयित बेबंद, दांडगे, आणि रानटी आहेत. हा प्रांत घेण्याचें मुख्य कारण हें कीं, रशियन लोकांनीं हा प्रांत घेतला तर ते अगदीं जवळ येऊन भिडल्यासारखे होतील, आणि अफगाणिस्थानांत ढवळाढवळ करतील तें टळावें. आणि दुसरें कारण असें कीं, काफीर लोक अफगाणिस्थानाच्या प्रांतांत येऊन नेहमीं उपद्रव देत असत, त्याचा बंदोबस्त व्हावा. त्या कामावर त्यांनीं चार सरदारांची नेमणूक करून, एकाएकानें एका एका बाजूकडे जाऊन, प्रथम त्या प्रांताची कोंडी करावी, आणि मग त्यांत स्वारी करून तो घ्यावा, असें ठरविलें. त्याप्रमाणें ते सरदार चार बाजूंनीं त्या देशांत शिरून, त्यांनीं तो देश काबीज केला, आणि तेथें अमीरसाहेबांचा अमल बसविला. ते लोक अतिशयित रानटी होते. ते गाईच्या मोबदला आपल्या बायका अफगाण लोकांस देत असत. आणि त्यांचे ठायीं क्रूरपणा मनस्वी होता.

परंतु, अमीर साहेबांनीं त्या लोकांस आतां पुष्कळ सुधारिलें आहे, त्यांस चांगल्या रीती लाविल्या आहेत. त्यांच्यांतल्या कितीएकांस सरकारी कामें सांगितलीं आहेत, आणि ते लोक शांततेची किंमत जाणून आतां अमीर साहेबांच्या राज-छत्राखालीं स्वस्थपणें कामधंदा करून आनदानें कालक्रमणा करीत आहेत.

काफरिस्थानांत, मध्यभागीं, कुलम हा एक मोठा किल्ला आहे. त्याविषयीं प्राचीन आख्यायिका अशी आहे कीं, तो कधीं कोणासही घेतां आला नाहीं. तो किल्ला अमीरसाहेबांच्या सैन्यानें घेतला. तेव्हां त्या किल्ल्याच्या वेशीशीं एक मोठा शिलालेख दृष्टीस पडला. त्यावर असें खोदलेलें होतें कीं, "हा देश ह्या ठिकाणपर्यंत जिंकून घेतला असा काय तो अगदीं पहिला मुसलमान मोंगल बादशाहा तैमुलरंग; परंतु, हा किल्लाच असा बिकट आहे कीं, हा त्याच्यानें देखील घेववला नाहीं." त्याच दगडावर, अमीरसाहेबांचे सरदार कपतान महंमद अल्लीखान ह्यांनीं असें खोदविलें कीं, "अमीर अबदुल रहिमान खान गाजी ह्यांनीं कुलम किल्ला सुद्धां सगळें काफरिस्थान काबीज केलें आहे, आणि तेथल्या लोकांनीं खरा धर्म—मुसलमानी धर्म- ह्याचा स्वीकार केला आहे. सत्यनिष्ठा आणि सद्गुण हीं आलीं आहेत, आणि असत्याचा संहार झाला आहे."

ह्या स्वारींत आणि हजारा लोकांवरच्या स्वारींत अफगाणिस्थानांतल्या मुसलमान लोकांनीं आपण होऊन अमीरसाहेबांस पुष्कळ साह्य केलें असें अमीरसाहेबांनींच एके ठिकाणीं लिहिलें आहे.



# भाग साहावा.



## हिरात काबीज केलें.

सिंहासनारूढ झाल्यावर अमीर अबदल रहिमान ह्यांस राज्यांतले पुष्कळ बखेडे मोडावे लागले, आणि जे प्रदेश स्वाधीन नव्हते ते स्वाधीन करून घ्यावे लागले. त्यांत त्यांस पुष्कळ श्रम पडले, आणि त्यांचें चातुर्य व शौर्य हीं प्रगट झालीं. त्या सर्वांचें कथन करण्यास अवकाश नाहीं. तरी, त्याच्या मासल्याकरितां, हिरात त्यांनीं कसें घेतलें, ह्याचें वर्णन करितों.

अमीर साहेबांनीं ह्मटलें आहेः—"काबुलामध्यें माझें स्थिरस्थावर झालें न झालें तोंच सैन्याची चांगलीशी तयारी नसतां, मला लढाईवर जाणें भाग पडलें. आयूबखान ह्यांचा पराभव इंग्लिशांनीं केल्या दिवसापासून ते हिरातेस धरून राहिले होते, आणि एकसारखी लढाईची तयारी करीत होते. सैन्य बरेंचसें जमविल्यानंतर ते त्यासहवर्तमान कंदाहाराकडे निघाले. असें होणार असें मला पूर्वीच वाटलें होतें."

ह्या स्थितीमध्यें अयूबखानांस अनुकूळ अशा आणि अमीर अबदुल रहिमानांस प्रतिकूळ अशा गोष्टी पुष्कळ होत्या. अयूबखानांजवळ सैन्य पुष्कळ होतें, दारूगोळा चांगला होता, आणि मुल्ला लोकांनीं त्यांचें माहात्म्य वाढवून, त्यांच्या स्वारीस धर्मयुद्धांचें स्वरूप दिलें होतें. त्यामुळें लोकांचा ओढा त्यांजकडे होता. आणखी अमीरसाहेब इंग्लिश

लोकांस—म्हणजे मुसलमानी धर्माचे नाहींत अशा लोकांस—सामील झाले आहेत, असें त्यांनीं पिकविलें होतें. त्यामुळें लोकांचीं मनें त्यांच्याविषयीं सरळ नव्हतीं.

हिरात शहरांत आयूबखानांजवळ १२००० सैन्य तयार होतें. त्यांतले कांहीं लोक मुसाजान ह्या नांवाच्या सेनापतीच्या हाताखालीं त्या शहराच्या रक्षणार्थ ठेवून, बाकीच्या सैन्यासहवर्तमान ते कंदाहारावर स्वारी करण्यास चालले. हें कळतांच, कंदाहारचे सुभेदार—अर्थात अमीर अबदुल रहिमानांचे अमलदार—ह्यांनीं त्यांशीं सामना करण्याकरितां कांहीं सैन्य रवाना केलें. तें सैन्य ७ पायदळ पलटणी, २ तोफखाने, ४ स्वारांच्या पलटणी आणि ३००० इतर शिपाई इतकें होतें. ह्या दोन सैन्यांची गांठ इ० स० १८८१ च्या जूलै महिन्याच्या विसाव्या तारखेस कोरेझ येथें पडली, आणि त्यांची लढाई जुंपली. तेव्हां प्रथमारंभीं कंदाहारच्या सैन्याची सरशी दिसली. अयूबखानांचे स्वार कचरले, आणि ते दशदिशा पळूं लागले. त्यांच्याकडचे अवघे ऐंशीं लोक समरांगणावर शिलक राहिले. त्यांनीं असें पाहिलें कीं, पळून जाऊन कांहीं आपले जीव बचावण्याची आशा नाहीं, त्यापेक्षां, रणांगणी तरवार गाजवून मरावें हें बरें. असा जीवाचा धडा करून, हे एवढेसे लोक कंदाहाराच्या सैन्यावर एकदम तुटून पडले, आणि त्यांचा अधिपति काजी सय्यद दीन ह्याकडे त्यांनीं आपला मोर्चा फिरविला. त्या वेळीं चमत्कार असा झाला कीं, कंदाहारच्या सैन्याचा सगळा गोंधळ होऊन, त्याचा पराभव झाला, आणि ते आपल्या शहराकडे धूम पळत सुटले. त्यांचा

पाठलाग अयूबखानांच्या लोकांनीं केला, आणि त्याच्या मागामाग तिकडे जाऊन त्यांनीं कंदाहार शहर घेतलें. त्यांत त्यांना मुळींच प्रयास पडले नाहींत.

अमीरांच्या ज्या सरदारांचा पराभव झाला, त्यांतले हाशिम आणि गुलाम हैदर हे खिलत येथें पळून गेले, आणि हसन मक्केस गेले. समशुद्दीन हे खिर्का ह्या स्थळीं जाऊन लपले. त्यांच्या मरणाची गोष्ट चमत्कारिक आहे. खिर्का ह्याचा अर्थ पैगंबर महंमदाचा झगा असा आहे. तो झगा, मुसलमान राजांनीं, अत्यंत पवित्र मानून, कंदाहार शहरीं एका इमारतींत ठेविला आहे. त्या इमारतीविषयीं अशी वहिवाट आहे कीं, अपराधी कोणत्याही प्रकारचा लहान मोठा असो, तो जोंपर्यंत त्या इमारतींत आहे, तोंपर्यंत त्याला हात लावावयाची कोणाचीही प्राज्ञा नाहीं. पण, तो आपण होऊन बाहेर आला ह्मणजे हा प्रतिबंध नाहींसा होतो. ह्या खिर्का गृहांत तो समशुद्दीन होता, तोंपर्यंत त्याला कोणींही हात लाविला नाहीं. आणि तुह्मी खिर्का ह्यांत गेलां असतां तुमच्या जीवाला धक्का लावावयाचा नाहीं, असें अभिवचन आयूबखानांनीं जरी त्यांस दिलें होतें, तरी, त्या इमारतीच्या बाहेर पडतांच, त्याला काठ्यांनीं मारमारून त्यांनीं त्याला ठार मारविलें!

हें सगळें वर्तमान अमीर अबदुल रहिमान ह्यांस कळतांच, हबिबुल्लाखान ह्यांस काबूल संभाळण्याकरितां मागें ठेवून, आणि पर्वानखान ह्यास त्यांच्या साह्यास ठेवून, ते १२००० सैन्यासहवर्तमान बरोबर दुसरे कांहीं चांगले चांगले योद्धे घेऊन अयूबखानांवर कंदाहाराकडे चालून जाण्यास निघाले.

त्यांस मार्गामध्यें आणखी १०००० लोक मिळाले. तिकडे अयूबखानांनींही २०००० सैन्य जमविलें. ह्या वेळीं कांहीं मुल्लांनीं अमीर अबदुल रहिमानांच्या विरुद्ध कांहीं जाहीरनामे काढिले होते. त्यात त्यांस इंग्लिशांचे सामलाती ह्मटलें होतें. ह्मणजे, अमीरांविषयीं लोकांचीं मनें दूषित करण्याचा हा प्रयत्न होता. आणि हा उद्योग, निरुपायास्तव, अयूबखानांच्या आग्रहास्तव मोठ्या नाखुषीनें त्यांनीं केला होता, असें ह्मणतात.

मजला करीत करीत अमीर अबदुलरहिमानांची ही स्वारी मोठ्या झपाट्यानें तामर्यान ह्या गांवापर्यंत गेली. हें गांव कंदाहारापासून चार मैलांवर आहे. तिकडे अयूबखानांस हें वर्तमान कळलें तेव्हां, ते, आपली छावणी खेलिमुल्ला अलिम येथें–ह्मणजे कंदाहारापासून एका मैलावर होती, ती सोडून कंदाहाराच्या शेजारच्या लष्करांत जाऊन राहिले. ह्या दोन सैन्यांची गांठ ता० १२ सप्तंबर १८८१ इ० रोजीं जुन्या कंदाहार मैदानांत पडली. तेव्हां लढाईच्या आरंभींच अयूबखानांच्या सैन्याची दाणादाण झाली. ती त्यांच्या चुक्यांमुळें झाली, असें अमीर अबदुल रहिमानांचें मत आहे. त्या चुक्या कोणत्या त्या त्यांनीं सांगितल्या आहेत. त्या ह्याः—

पहिली चूक—आयूबखान एकदम कंदाहारशहराच्या बाहेर सैन्यासह आले नाहींत, त्यांनीं प्रतिपक्षाच्या सैन्यावर हल्ला केला नाहीं, आणि त्यास हल्ला करूं दिला. त्यानें त्यांचा भितरेपणा व्यक्त झाला.

दुसरी चूक-कंदाहार आपल्या स्वाधीन राहावें असा बंदोबस्त न करितां ते तेथून निघाले.

तिसरी चूक—खेलीमुल्ला अलिम येथून ते हालले.

चौथी चूक—लढाईच्या आरंभापासूनच ते समरांगणांत आले नाहींत, आणि दूर पाव कोसाच्या अंतरावरच्या एका टेंकडीवर लढाईची मौज पाहात बसले. त्यावरून हे लढाईस भितात असें त्यांच्या सैन्याच्या मनांत येऊन, त्यांचा उत्सव नाहींसा झाला, त्यांचे हातपाय थकले.

पांचवी चूक—त्यांनीं त्याच टेंकडीच्या मागें सुमारें ७००० स्वार लपवून ठेविले होते, ते अशाकरितां कीं, प्रसंग पडेल तेव्हां एकदम इशारत करून, त्यांस समरांगणावर आणावें, आणि प्रतिपक्षावर सोडावें. परंतु, त्या वेळीं त्यांची इतकी धांदल उडाली कीं, तींत त्या स्वारांची त्यांस आठवण देखील झाली नाहीं. त्यामुळें ते स्वार, कांहीं एक न करितां, जागच्याजागीं राहिले.

अयूबखानांच्या सैन्याची जरी दाणादाण झाली, तरी, त्यांत काहीं चांगले लढाऊ लोक होते, ते कचरले नाहींत. ते एकसारखे लढत होते. त्यांचा तोफखाना कंदाहाराजवळच्या टेंकड्यांवर ठेविला होता, त्यानें आपली कामगिरी चांगली बजाविली. दोनतास घनघोर संग्राम झाला. तोंपर्यंत, विजयश्री अमक्या पक्षाकडे आहे, असें कोणासच सांगतां आलें नाहीं. अमीर अबदुल रहिमानांची प्रथमतः डावी बाजू किंचित् मागें हटल्यासारखी वाटली. परंतु, मध्यभागीं ते स्वतः उभे राहिले होते, आणि आपल्या सैन्यास प्रोत्साहन देत होते, ते एक एक पाऊल पुढें पुढें चालले होते, आणि प्रतिपक्षास मागें हटवीत होते. प्रत्येक शिपाई आपल्या कर्तव्यांत अगदीं चूर होता. मागें अमीर साहेबांच्या जवळ एक घोडेवाला मात्र काय तो उभा होता. आयूबखानांच्या सैन्याचें

पाऊल मागें मागें पडत चाललेलें पाहून, अमीरसाहेबांच्या ज्या चार पलटणी पूर्वी एकदम अयूबखानांकडच्या झाल्या होत्या, त्या काबुलावरच्या उंच प्रदेशावर ठेविलेल्या होत्या, त्या लागल्याच अमीरसाहेबांच्या कडच्या होऊन, त्यांच्या सैन्याशीं लढेनाशा झाल्या, आणि अयूबखानांच्या सैन्यावर तुटून पडल्या. ह्यांत कांहीं चमत्कार वाटण्याचें कारण नाहीं. ह्याविषयीं अमीर साहेबांनीं स्वतः असें लिहिलें आहे कीं, " आह्मीं गादीवर बसण्याच्या अगोदर अफगाणिस्थानांतल्या कवाईत शिकलेल्या सैन्यांत असा परिपाठच पडून गेलेला होता कीं, समरांगणावर ज्या पक्षाची सरशी दृष्टोत्पत्तीस येईल, त्या पक्षाकडे एकदम जाऊन मिळावें." त्याप्रमाणें येथें झालें. मग काय विचारावें! अयूबखानांच्या सैन्याची दुर्दशा उडाली आणि ते जे तेथून निघाले, ते एकदम हिरातेकडे चालते झाले.

अयूबखानांचा स्वभाव अमीर अबदुल रहिमान ह्यांस चांगला ठाऊक होता. त्यांस असें खचीत वाटलें होतें कीं, अयुबखान हिरातेहून निघतील तेव्हां तेथला चांगला बंदोबस्त करण्याचें त्यांस कांहीं सुचावयाचें नाहीं; आणि हिरात बहुतेक असंरक्षित राहील. ह्मणून, त्या शहरावर परस्पर हल्ला करण्याविषयीं, अमीरसाहेबांनीं, तुर्कस्थानचे सुभेदार सरदार कडसखान ह्यांस काबुलाहून निघण्याच्या आधींच कळविलें होतें. त्याप्रमाणें ते ४०० पायदळ, ४०० स्वार, आणि दोन तोफा इतक्या सैन्यासहवर्तमान तिकडे गेले. तेथें अयूबखानांचे सरदार लोय नायब खुषदिल हे होते. त्यांनीं कडसखानांच्या सैन्याशीं सामना करण्यास कांहीं सैन्य पाठविलें. परंतु अमीरसाहेबांच्या सैन्यानें त्याचा पराभव

केला. नंतर, कडसखान ह्यांनीं तारीख ४ आगष्ट रोजीं हिरातेवर हल्ला करून तें शहर आणि तो किल्ला घेतला. तेव्हां ते खुषदिल सरदार, काहीं एक तक्रार न करितां त्यांच्या हातीं लागले. ह्याप्रमाणें हिरात येथें अमीर अबदुल रहिमानांचा अमल बसला.

ह्या कडसखानांचें वर्णन अमीरसाहेबांनीं फार केलें आहे. तुर्कस्थानांत जे अधिकारी अमीरसाहेबांनीं पाठविले होते, त्यांत हे एक होते, आणि ह्यांनीं आपली कामगिरी तिकडे फार उत्तम रीतीनें बजाविली. ह्यांजवर अमीर साहेबांचा अतिशयित विश्वास असे. अत्यंत भरंवशाचें काम ह्मटलें ह्मणजे तें कडसखानांस सांगावयाचें, असें अमीर साहेबांचें मत असे.

हिरातेकडची सगळी व्यवस्था नीट लाविल्यावर अमीर साहेब परत काबुलाकडे गेले. तेव्हां वाटेंत अबदुल रहिम आखुंद काकर ह्या नांवाचा एक काजी त्यांस आढळला. त्याविषयीं असें कळलें कीं, तो अमीर साहेबांस नास्तिक ह्मणे. आणि तो कंदाहारच्या वर सांगितलेल्या पवित्र देवालयांत आश्रय धरून राहिला होता. त्याविषयीं अमीर साहेबांस अतिशयित संताप आला, आणि अशा पातकी माणसास अशा पवित्र संस्थेचा आश्रय मिळावा, हें त्यास अतिशयित वाईट वाटून, त्यांनीं त्याला त्या देवालयांतून ओढून काढविलें, आणि आपल्या हातानें ठार मारिलें.

काबुलास येऊन पाहूं लागले तों, हबिबल्लाखान जरी त्या वेळीं अल्प वयस्क होते, तरी, त्यांनीं, मुख्य सेनापति पर्वानखान आणि इतर प्रधानमंडळ ह्यांच्या सल्ल्यानें राज्यकार-

भार उत्तम चालवून, पुष्कळ बखेडे मोडिले होते, आणि सर्वांस संतुष्ट ठेविलें होतें, हें पाहून त्यांस फार संतोष झाला. त्या मुदतीमध्यें कोहिस्थान, हिसारक, इत्यादि ठिकाणच्या लोकांत बंडावा उठविण्यचा प्रयत्न कोणीं दुष्टांनीं केला होता. तरी, त्या संबंधानें आपल्या सैन्यांतल्या लोकांची समजूत घालून आणि त्यांचें साह्य घेऊन, त्यांनीं त्या सगळ्या खटपटी निष्फळ केल्या. हें सगळें फळ पर्वानखान ह्या उत्कृष्ठ सेनापतींच्या मसलतीचें आणि कर्तबगारीचें होतें. हे पर्वानखान अमीरसाहेबांचे फार जुने मित्र होते. ते अमीरसाहेबांच्या समागमें त्यांच्या वनवासांत आणि अज्ञातवासांत होते. आणखी अमीरसाहेबांस त्या संकटसमयीं पैशाची गरज लागली, ती भागविण्याकारितां, त्यांनीं, एकदा नाहीं चार वेळां आपणांस गुलाम ह्मणून विकून घेतलें होतें. त्यांस शेवटीं अमीर साहेबांनीं सोडविलें. त्यांवर अमीरसाहेबांच्या सर्व प्रजाजनांची मोठी भक्ति असे. ते इ० स० १८९४ त मरण पावले. त्यांच्या मुलांपैकीं एका मुलावर अमीरसाहेबांची फार मर्जी असे.

अयूबखानाचा पराभव आणि हिरात काबीज करणें हीं कामें झालीं. आपटलीं. परंतु, अमीर अबदुल रहिमानांस आणखी एक फार मोठें काम करावयाचें होतें. तें केल्यावांचून त्यांना चैन पडेना; कां कीं, तें झाल्यावांचून देशांतल्या लोकांस शांतता मिळना. तें काम ह्मटलें ह्मणजे हें कीं, मुल्ले हे सुमारें दोनशें वर्षांपासून राजापेक्षांही कांकणभर अधिक होऊन बसले होते, त्यांचें वजन लोकांत पुष्कळ होतें. त्यांची आज्ञा मानणें हें महत्पुण्य आहे, आणि त्यांची आज्ञा उल्लंघणें हें महत्पाप आहे, असें लोकांच्या

मनांत भरलें होतें. त्यामुळें राजे देखील त्यांच्या वाटेस कधीं जात नसत. आणि ते मुल्ले आपल्या शिष्यशाखांस गुरांपेक्षां देखील वाईट रीतीनें वागवीत. त्यांतल्या एकाद्याला ठार मारणें ह्मणजे त्यांना कांहींच वाटत नसे, आणि त्याबद्दल त्यांना कोणी विचारीत नसे. शिवाय त्यांच्या आश्रयास चोरांच्या झुंडी असत. ते चोर लोक रस्त्यांत वाटसरांस गांठून त्यांचें सर्वस्व घेत, आणि त्याचा बराच अंश ह्या आपल्या धन्यांस देत. ह्मणजे, आपले इकडच्या पेंढाऱ्यांसारखें हें बंड होतें. ते अत्यंत क्रूर होते—केवळ राक्षस होते—राक्षसांपेक्षांही अधिक क्रूर होते. माणसांचीं—स्त्रीपुरुषांचीं—डोकीं तोडून तापलेल्या अगदीं विस्तवासारख्या लाल झालेल्या मोठ्या थोरल्या तव्यावर टाकावीं, आणि तेथें तीं कशीं पटापट उडतात ह्याची मौज पाहावी, ही त्यांची एक करमणूक होती!!! त्यांचें प्रस्थ अगदीं मोडून टाकायाचें, आणि ह्या क्रूरपणाचें निवारण करावयाचें—ह्याकरितां, त्यांस वठणीस आणून सन्मार्गास लावण्यास अमीर साहेबांनीं प्रयत्न केला. तो पुष्कळ अंशीं सिद्धीस गेला. ह्याविषयीं अमीरसाहेब ह्मणतात, "हें काम कांहीं सोपें नव्हतें. कठिण होतें. ह्या कृत्यास मला पंधरा वर्षें पर्यंत एकसारखा त्रास सोसावा लागला. तेव्हां ते वठणीस आले."

आपल्या देशांतल्या लोकांशींच अमीर हे कडक रीतीनें वागत, ह्मणून कांहीं लोक त्यांस नांवें ठेवीत. हें त्यांच्या कानीं गेलें होतें. आणि त्याचें त्यांनीं उत्तर दिलें आहे. तें असें. "चांगल्या देशांत देखील, आरंभीं, ह्मणजे सुधारणा लोकांस कळत नसते तेव्हां, राज्यकर्त्यास असें कडक व्हावें लागतें,

ह्याचीं उदाहरणें इतिहासांत पुष्कळ आहेत. ह्याच शतकांत मजूर लोकांनीं इंग्लन्डांत संप केले होते, आणि त्या वेळीं सरकारानें त्यांस कडक रीतीनें ताळ्यावर आणिलें. माझ्या राज्यांतल्या लोकांत सुधारणा थोड्या अवकाशांत पुष्कळ झाली आहे, ह्याचा मला मोठा अभिमान वाटतो." अभिमान वाटण्यासारखा विषय होता खरा.

ह्या भागांत सांगितलेल्या गोष्टींवरून एवढें कळून येईल कीं, आपल्या लोकांच्या सुधारणेसाठीं अमीर साहेब कायावाचामनेंकरून अहर्निश झटत होते. त्यांत करवेल तितकी कृपा करीत, आणि निरुपाय होई तेव्हां मात्र ते कडक होत. अशा प्रकारचा कडकपणा किंवा क्रूरपणा हा दयेचाच एक प्रकार आहे, दयेचेंच एक रूप आहे, असें तत्वज्ञ समजतात.

---

## भाग सातवा.



## दिनचर्या.



दिसे क्षणिक सर्व हें भरंवसा घडीचा कसें
धरील मन आधिनें बहु परि भ्रमे चाकसें.

**मोरोपंत.**

ऐका सुदैवपणाचें लक्षण
रिकामा जाऊं नेदी क्षण.

**रामदास.**

पृथ्वीच्या पाठीवर राजे फार थोडे; आणि त्यांत चांगले राजे ह्मटले ह्मणजे तर फारच थोडे; अगदीं क्वचित. असें असल्यामुळें चांगले राजे आपला काळ कसा घालवितात, आपली कालक्रमणा कशी करितात, हें साधारण लोकांस कळण्यास मार्ग नसतो. आणखी, त्यांतही, अमीर अबदुल रहिमानांसारख्यांची–ह्मणजे ज्यांनीं टांक्यांचे घाय सोसून देवकळा मिळविली होती, कारागृहवास, अरण्यवास, अज्ञात-वास इत्यादि संकटें भोगून राजपद मिळविलें होतें, आणि राज्य उत्तम प्रकारें चालविलें होतें, त्यांची दिनचर्या तर खरोखरच दर्शनास किंवा श्रवणास दुर्मिळ असावयाची. परंतु, प्रकृत ग्रंथाच्या विषयाच्या संबंधानें ती उणीव जाणवत नाहीं. कां कीं, अफगाणिस्थानाच्या अर्वाचीन इतिहासावरून अबदुल रहिमानांचा वर्तनक्रम पुष्कळ व्यक्त होत असून, शिवाय, त्यांनीं स्वचरित्राच्या ग्रंथांत त्या विषयाकडे संबंध एक अध्याय खरचिला आहे. त्याच्या आधारें आह्मी ती येथें थोडक्यांत सादर करितों.

चरित्रांच्या अवलोकनावरून असें अनुमान निघतें कीं, ज्या माणसांचें लहानपण कष्टांत जातें, हालांत जातें, तीं माणसें मोठेपणीं मोठीं कष्टाळू, नीतिमान आणि चांगलीं निपजतात. ह्याचेंच एक उदाहरण अमीर अबदुल रहिमानांचें होतें. बालपणांत ह्यांचे कोणीं फारसे लाड केलेले दिसत नाहींत. ह्यांचे वडील फार तापट आणि कडक होते. त्यांनीं ह्यांस, क्षुल्लक कारणावरून, बिड्या घालून तुरुंगांत टाकिलें होतें, ते मागें वर्णिलेंच आहे. आणखी, वडिलांच्या पश्चात् त्यांस राज-कारणांत पडावें लागून लढायांसारख्या जीवावरच्या संकटांच्या

गोष्टी कराव्या लागल्या, आणि पुढें पुढें वनवास काढावा लागला, तेव्हां, ह्या सगळ्या अनुभवांच्या योगानें, ह्यांची वृत्ति, इतर राजपुत्रांच्या वृत्तीहून वेगळी झाली होती, हें उघड आहे. विपत्ति ही एक प्रकारची उत्तम शाळा आहे. तींतले उत्तम विद्यार्थी साधु निपजावे हें साहजिक आहे. त्यांच्या मुखांतून साधूंसारखे विचार बाहेर पडतात. अमीर अबदुल रहिमान ह्यांनीं ह्मटलें आहे.—"आपलें मन आणि आपला देह हीं उगाच आळसांत स्वस्थ राहूं देणें—कांहींएक उद्योग न करितां वेळ व्यर्थ घालविणें ह्या एवढें दुसरें मोठें पाप नाहीं. हा देवाशीं कृतघ्नपणा आहे....थोडा-वेळ विश्रांतिपुरतें निजावें, आणि बाकी सगळा वेळ अहोरात्र कांहींतरी उद्योग करीत असावें, हें मला फार आवडतें. आणि तशा परिपाठानें माझा स्वभावच आतां तसा झाला आहे. मी दुखणेंकरी असलों, मला जागेवरून हालवत नसलें, तरी मी कांहीं तरी लिहितों वाचतों, किंवा कोणाकडून वाचवून तें ऐकत राहतों. पण रिकामा राहात नाहीं. एकसारखें काम करीत राहणें ह्मणजे मला कांहींच वाटत नाहीं. तें मला मनापासून आवडतें. मला कधीं दमलोंसें वाटत नाहीं. मला काम पाहिजे. कोणाला कांहीं पाहिजे, कोणाला कांहीं पाहिजे, मला उद्योग पाहिजे. आणखी असा एक चमत्कार आहे कीं, जों जों मी अधिकाधिक उद्योग करायास लागतों, तों तों न दमतां तो अधिकाधिक करावासा मला वाटतो. जों जों अधिकाधिक खावें तों तों अधिकाधिक भूक लागत जावी, असें कांहीं चमत्कारिक होतें."

अबदुल रहिमान हे अहोरात्र आपल्या राज्याच्या व्यवस्थेच्या विचारांत गढलेले असत. त्यांना ध्यानींमनीं सगळें तें दिसत असे. ते नेहमीं असें ह्मणत कीं, “ मी परमेश्वराचा परम नम्र सेवक आहें. त्यानें माझ्या हवालीं जीं गरीब माणसें केलीं आहेत, त्यांचा प्रतिपाळ मला केला पाहिजे. आणखी कुराणांत असें सांगितलें आहे कीं, जी गोष्ट एकाद्या माणसानें करावी अशी देवाची इच्छा असते, ती गोष्ट करण्यास तो त्यास सामर्थ्य देतो, त्याला साहित्य पुरवितो. अफगाणिस्थानास त्रासमुक्त करावें, अशी देवास इच्छा झाली, ह्मणून मला गरीब सेवकाला हा अधिकार त्यानें दिला आहे.” असे विचार ज्यांच्या मनांत रात्रंदिवस घोळत असत, तेव्हां त्यांच्या हातून राष्ट्राचें कल्याण व्हावें, ह्यांत काय नवल होतें !

एकादा थोर मनुष्य दृष्टीस पडला ह्मणजे मातापितरांच्या मनांत असें येतें कीं, आपल्या पुत्रानें त्यांच्यासारखें व्हावें, त्याप्रमाणें, सांप्रत काळच्या सुधारणापंथास लागलेल्या राष्ट्रांचा विचार करून, अमीर साहेबांस आपल्या अफगाणिस्थानाविषयीं वाटत होतें. त्याविषयीं त्यांनीं ह्मटलें आहे कीं, “ इतर राष्ट्रांची प्रगति पाहून मला चैन पडेनासें होतें. आणि त्यांच्या इतकी आपल्या राष्ट्राची प्रगति केव्हां एकदां होईल, ह्याचा विचार मनांत घोळूं लागतो. तो कांहीं केल्या जात नाहीं. रात्रीं स्वप्नें देखील त्याविषयींच पडतात. ह्मणजे मांजरास स्वप्नांत नेहमीं उंदीर दिसत असतात, असें ह्मणतात तसें माझें होतें.” राज्यकर्त्या प्रभूस स्वराष्ट्राच्या उन्नतीविषयीं एवढी कळकळ असणें हे त्या राष्ट्रांचें केवढें तरीं भाग्य!

अमीर साहेब ह्यांनीं आपल्या कामाचे दिवस ठरविले होते. त्याप्रमाणें ते आपलीं कामें पाहात. सोमवारीं हिरात, कंदाहार वगैरे बाहेर प्रांतांचें काम; मंगळवारीं लष्करी अमलदारांच्या भेटी; बुधवारीं आणि शनिवारीं न्यायाचीं कामें, ह्मणजे अपिलांचे निकाल आणि मोठ्या अपराधांची चौकशी; गुरुवारीं, हिंदुस्थान संबंधाचा पत्रव्यवहार; शुक्रवारीं सुटी—भजनाचा दिवस; आदितवारीं खासगत काम; अशी योजना त्यांनीं केली होती. आणखी ह्यात त्यांचें असें होतें कीं, आळस किंवा हलगर्जीपणा हा काडीमात्र व्हावयाचा नाहीं. सगळीं कामें मनापासून करावयाचीं. दमणें हें यांना मुळीं ठाऊकच नव्हतें. मोंगल बादशहा हुमायून ह्याची रीती अशीच असे. हातांत एकादें काम घेतलें ह्मणजे तें मनासारखें पुरें झाल्याशिवाय त्याचा पिच्छा ते सोडीत नसत. त्या कामाशिवाय त्यांस दुसरें कांहीं एक दिसत नसे. सरकारी काम करीत बसले ह्मणजे प्रहरानप्रहर जवळचें वाढलेलें ताट तसेंच राहून जाई, निऊन जाई, शिळें होऊन जाई, तरी त्यांस जेवण्याची शुद्धि राहात नसे. रात्र झाली केव्हां आणि उजाडलें केव्हां ह्याचें सद्धां भान त्यांस राहात नसे. ह्याविषयीं त्यांनीं स्वतःच्या हकीकतींत दृष्टांत देऊन असें लिहिलें आहे कीं, “ माझी अवस्था, मजननासारखी होते. मजनन हा एक तरुण मनुष्य होता. त्याचें मन लीलानामक एका तरुणीवर अतिशयित जडलें होतें. तिचा कुत्रा एकदा त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां तो त्याच्या मागोमाग, एका मशीदींत पुष्कळ मुसलमान लोक निमाज पढत बसले होते, त्या मशीदींत गेला. पुढें धर्मोल्लंघन केल्याबद्दल त्याला टपका

देऊन, असा वेडेपणा करण्याचें कारण त्यास धर्माधिकाऱ्यांनीं विचारिलें. त्यांस त्यानें असें उत्तर दिलीं कीं, मी मशीद पाहिली नाहीं, आणि तींत निमाज पढत होते, त्यांनाही पाहिलें नाहीं. कां कीं, माझें सगळें लक्ष, प्रेमाच्या भरानें, त्या कुतऱ्याकडे लागलें होतें. आणि ज्यांनीं ही तक्रार केली आहे, त्यांविषयीं मी असें ह्मणतों कीं, माझें लक्ष जितकें त्या कुतऱ्याकडे लागलें होतें, तितकें त्यांचें लक्ष, प्रार्थनेच्या वेळीं, देवाकडे लागलें नव्हतें. ह्मणूनच त्यांची दृष्टि त्या कुत्र्याकडे आणि माझ्याकडे वळली. तेव्हां अर्थात् त्यांची ती प्रार्थना आपली प्रार्थनाच होती."

अमीरसाहेबांचे हकीम आणि वैद्य हे त्यांना नेहमीं असें सांगत असत कीं, आपण नेमल्या वेळीं आपलें खाणें पिणें करीत नाहीं, ह्मणून आपणाला दुखणीं वारंवार येतात. त्यांस ते उत्तर देत असत कीं, "तेथें माझा निरुपाय आहे. माझें दुखणें मला पुरवतें. माझ्या प्रजेचें दुखणें मला पुरवत नाहीं. शिवाय, माणसास आवडत्या कामापासून कधीं त्रास वाटत नाहीं. वाघ शेळ्यांच्या कळपाकडे चालला असतां त्या कळपाच्या पायांनीं जरी पुष्कळ धूळ उडून त्याच्या डोळ्यांत जाऊं लागली, तरी वाघास त्रासदायक वाटत नसते."

दंगेधोपे आणि लोकांतली दांडगाई, ह्यांचा कंटाळा आला ह्मणजे त्यांच्या मनांत कधीं कधीं असें येत असे कीं, हा सगळा त्रास सोडून, जें काय व्हावयाचें असेल तें होऊंद्या असें ह्मणून कोणीकडे तरी जाऊन स्वस्थ बसावें. परंतु, ते पुनः असें ह्मणत कीं, "असें करणें हें अगदीं भागूबाईपण

होईल. नेमलेलें काम मीं केलें नाहीं तर मला देव बोल लावील. माझें काम मला केलें पाहिजे."

इ० स० १८९१ त अमीर साहेबांनीं आपले चिरंजीव हाबिबुल्लाखान ह्यांस दरबारचें बहुतेक काम पहावयास सांगितलें; आणि परराज्याशीं संबंध, राजकारण, खजीना, राजद्रोहासारख्या मोठ्या अपराधांची चौकशी, अपिलें, लढाईचें सामान तयार करणें किंवा खेरदी करणें, नवीन कोर्टें स्थापणें, कायद्यांत सुधारणा करणें, राज्यांत कोठें काय चाललें आहे त्याच्या बातम्या घेणें, इत्यादि मुख्य कामें त्यांनीं स्वतःकडे ठेविलीं होतीं.

अमीरसाहेब जागे होऊन पुनः झोंपी जातपर्यंत त्यांच्या सन्निध अनेक माणसें असत. त्यांतलीं कांहीं सांगतों. चिटणीस, शिक्केदार, हकीम, डाक्टर, शस्त्रवैद्य, पाणीउदक देणारा, हुक्का धरणारा, फरास, दप्तरदार, पाहारेकरी, जोशी, चोपदार, इत्यादि. शिवाय दरबाराच्या अगदीं जवळ कांहीं मंडळी तयार असे. ह्मणजे हांक मारली कीं त्यांनीं आंत यावें. त्यांतले कांहीं सांगतों. बुद्धिबळें खेळणारे, पत्रें वगैरे वाचून ऐकविणारे, गोष्टी सांगणारे, हिंदु इराणी आणि अफगाण तंतु वाद्यें वाजविणारे, गाणारे, गाडीवान, भोई, माळी, न्हावी, झाडू, नकाशे काढणारे, जमीनीची मोजणी करणारे, इमारती बांधणारे, जासूद, पत्रें किंवा निरोप नेणारे स्वार, धर्मोपाध्ये, छत्री धरणारे, बावटे धरणारे, इत्यादि. स्वारी बाहेर पडली ह्मणजे अमीरसाहेबांच्या अगदीं सन्निधच्या वलयामध्यें हुजऱ्ये, कामदार, आणि विशेष कामाचे नौकर असत. त्याच्या पलीकडच्या वलयांत हलकारे,

चप्रासी, हे त्यांच्या घोड्याच्या किंवा पालखीच्या बरोबर पायीं पळत असत. त्याच्या बाहेरच्या वलयांत शिपी, फरास, हुक्केवाले, इत्यादि लोक असतात. ह्यांशिवाय त्यांच्या स्वतःच्या संरक्षणाचे पलटणी पायदळ स्वार असतच.

अमीरसाहेबांची एकदम कूच करण्याची नेहमीं तयारी असे. त्यांच्या स्वतःच्या आंगरख्यांच्या आणि विजारींच्या खिशांत पिस्तुलें भरलेलीं तयार असत. त्याप्रमाणेंच एका दिवसास त्यांस पुरतील इतके पाव तयार असत. ते पाव रोजच्या रोज जुने काढून नवे घालावयाचे असत. अमीरसाहेब निजत किंवा बसत, तेथें, त्यांचा हात सहज पुरावा, अशा तरवारी आणि भरलेल्या बंदुका ठेविलेल्या असत. आणि बाहेरच्या बाजूस, खोगीरलगाम घातलेले घोडे अगदीं तयार उभे असत. ते केवळ अमीरसाहेबांपुरतेच नसत, तर बरोबरच्या ब-याच मंडळीस पुरण्यासारखे असत. स्वतः अमीरसाहेबांच्या घोड्याच्या खोगिराच्या दोहों बाजूस दोन बार भरलेलीं पिस्तुलें तयार बांधलेलीं असत.

अमीरसाहेब झोंपीं गेले तरी, पाहारेकरी शिपाई, त्यांचे अमलदार, चाहावाले, पाणीवाले, हुक्केवाले, आणि हुजऱ्ये हे पाळीपाळीनें जागे राहात.

गुलाम हा शब्द मात्र अफगाणिस्थानांत आहे, आणि गुलाम ज्यांस म्हणतात असे कांहीं लोक आहेत. परंतु, ते खरोखर गुलाम नाहींत आहेत. अबदुल रहिमानांनीं गुलामांचा व्यापार अगदीं बंद केला. मोठमोठ्या श्रीमान कुटुंबा-मध्यें गुलाम असतात, ते चाकर असतात. त्यांस त्यांचे धनी आपल्या घरच्या इतर माणसांप्रमाणें वागवितात. आणि

त्यांत जर कोणी चांगले निपजले, तर ते मोठमोठ्या पदांस चढतात. नाझिरमहंमद सफरखान हे अमीरसाहेबांच्या अगदीं सन्निध असणारे अधिकारी, पूर्वी गुलाम होते. ह्यांच्या हातांत, अमीरांनीं, आपलें शिक्कामोर्तब दिलें होतें, आणि सरकारी विशेष महत्वाचे कागदपत्र ह्यांच्याच स्वाधीन असत. परवानाखान, दुय्यम सेनापति, आणि जानमहंमद-खान माजी खजीनदार हेही आरंभीं गुलामच होते.

गुलामगिरी नाहींशी करण्याकरितां अमीरसाहेब स्वतः पुष्कळ घस सोशीत. त्यांनीं इ० स० १८९६ त काफि-स्थान जिंकिलें, तेव्हां असा हुकूम फर्माविला कीं, कबूल नसल्यास काफ्री बायकोशीं कोणीं लग्न लावूं नये. आणि ज्यांनीं गुलाम म्हणून कांहीं माणसें धरून नेलीं होतीं आणि आपला लुटीचा वांटा म्हणून जवळ ठेविलीं होतीं, त्यांस त्यांनीं त्यांच्या ऐवजीं पैसे देऊन त्यांची सुटका केली.

खाण्यापिण्यांत अमीरसाहेब फारच नेमस्त होते. ते स्वतः मद्यास कधीं शिवत नसत, आणि आपल्या चाकर माणसांस मद्यास शिवूं देत नसत. हा नियम जर कोणीं मोडिला तर ते त्यांस मोठी शिक्षा करीत. दुखण्यामध्यें वैद्य सांगतील तेवढ्यापुरतें मात्र मद्य घेण्याविषयीं त्यांस मोकळीक होती. अमीरसाहेब नेहमीं ह्मणत असत कीं, "आह्मी जगण्याकरितां खातों, खाण्याकरितां जगत नाहीं." अगदीं सन्निध राहणाऱ्या नौकरांस सरकारच्या पंक्तीस जेवा-यास सांपडे. त्याप्रमाणेंच, अमीरसाहेबांचे वडील चिरंजीव, आठवड्यांतून एका दिवशीं, लष्करी आणि मुलकी मुख्य मुख्य अमलदारांस बोलावून आणून त्यांची भेट घेऊन,

आणि त्यांस आपल्या पंक्तीस फलहारास घेत. त्या कामाकरितां एक मोठा दिवाणखाना बांधलेला आहे. ह्यांत दीड हजार लोक सहज बसतात.

राजवाड्यांतला मुदबखखान्याचा खर्च सरकारी तिजोरींतून होत असतो. प्रांतांतल्या सुभेदारांसही तो खर्च मिळतो. त्यानींही आपल्या हाताखालच्या लष्करी आणि मुलकी अमलदारांस आठवड्यांतून एकदा भेटीस आणि पंक्तीस बोलवावें असा परिपाठ आज कितीएक वर्षांपासून चालला आहे. हा एक फार मोठा खर्च आहे. ह्याची फारशी आवश्यकता नाहीं. परंतु अमीरसाहेब ह्याविषयीं म्हणत कीं, "तो तसाच चालविणें भाग आहे."

अमीरसाहेबांचे मुलगे, मुली, सुना, आणि नातोंडें ह्यांस खाणेंपिणें, वस्त्रपात्र, जागापागा, हें सगळें यथास्थितपणें राजवाड्यांतून मिळून शिवाय, त्यांस, त्यांच्या खासगत खर्चास ह्मणून, कांहीं पैसे, त्यांच्या योग्यतेप्रमाणें मिळत असत. हबीबुल्ला आणि नासरुल्ला ह्या दोघां मुलांस दरमाहा वीस वीस हजार रुपये मिळत. ह्याशिवाय त्यांच्या बायकांमुलांस नेमणुका मिळत त्या वेगळ्याच.

अमीरसाहेब आपल्या जनानखान्यांत आणि खाजगी दिवाणखान्यांत फारच थोडावेळ घालवीत. कां कीं, त्यांस राज्याचें काम पाहातां पाहातां पुरेपुरेसें होत होतें. त्याविषयीं ते नेहमीं ह्मणत कीं, " परमेश्वरानें जें राष्ट्र माझ्या स्वाधीन केलें आहे, त्याच्या कल्याणार्थ त्यानें मला उत्पन्न केलें आहे. मीं ऐषआरामांत राहावें आणि चैन मारावी, ह्याक-

रितां त्यानें मला निर्माण केलें नाहीं. त्याच्या सेवेचें काम निरंतर करीत राहणें हेंच कायतें मला उत्तम सुख वाटतें."

आपल्या कुटुंबांतल्या मुलांची व्यवस्था अमीर साहेब फार उत्तम ठेवीत. प्रत्येक मुलाला आणि नातोंडाला वेगळें वेगळें घर दिलेलें आहे. त्याच्या भोंवतीं लहानसा बाग आहे. त्या मुलांस सांभाळायास चांगल्या अनुभविक, विश्वासू आणि आस्थेवाईक अशा वेगळ्या वेगळ्या दाया ठेविलेल्या आहेत. त्यांनीं त्या मुलांस खाणेंपिणें घालून वाढवावें. त्या मुलांस आयांकडे दिवसांतून एक दोनदां न्यावें, आणि कधीं एकादे वेळीं अमीर साहेबांकडेही न्यावें. त्यांस शिकविण्यास चांगले हुशार, नीतिमान आणि अनुभविक शिक्षक ठेविलेले होते. खाणेंपिणें, आरोग्य, वागावेिणें, वस्त्रप्रावरण, आणि शिक्षण ह्यांवर अमीर साहेबांचें फार लक्ष असे. त्याच्या योगानें त्यांस लहानपणापासूनच चांगल्या सभ्यपणाच्या संवयी लागल्या होत्या. आणि त्यांच्या प्रकृति चांगल्या राहिल्या आहेत; तीं वयांत आलीं ह्मणजे त्यांचीं लग्नें करून देतात. आणि मग तीं आपापल्या घरांत आनंदानें स्वतंत्रपणें नांदूं लागतात, तरी, त्यांनीं नित्य वाचनलेखनाचा पाठ ठेविला पाहिजे, हवा खाण्यास आणि शिकारीस गेलें पाहिजे, आणि लोकांत संभावितपणानें वागून लौकिक मिळविला पाहिजे, ह्याविषयीं अमीर साहेब त्यांजवर फार नजर ठेवीत.

अफगाणिस्थानांत गरिबांस दाद मागण्यास अमीर साहेबांनीं मार्ग चांगले करून ठेविले होते. ज्या कोणास फिर्याद करावयाची असे, त्यानें स्वतः जाऊन अमीरापुढें किंवा अधिकाऱ्यांपुढें उभें राहून आपली हकीकत सांगावी, किंवा

कागदावर लिहून कळवावी. प्रत्यक्ष अमीरसाहेबांस कांहीं सांगावयाचें असल्यास तें कागदावर लिहून, लखोट्यावर असें स्पष्ट ल्याहावें कीं, " अमीरसाहेबांशिवाय दुसऱ्या कोणीं हें फोडूं नये." ह्मणजे पत्र त्यांच्या हातीं जाई, आणि ते त्याचा विचार ताबडतोब करीत. बाकी, मुख्य इनसाफाचें बहुतेक काम त्यांनीं हबिबुल्लाखानांकडे दिलें होतें. ते गरीबगुरीबांचें बोलणें ऐकून घेऊन, निष्पक्षपातानें न्याय करीत. न्यायाच्या कामांत श्रीमंत आणि गरीब हा भेद मुळींच नव्हता. परकीय राजांकडचे पत्रव्यवहार, खजीन्यांवर वराती देणें, शिपाई लोक नवीन ठेवणें, पेनशनें देणें, कारखान्यांची देखरेख करणें, इत्यादि सगळीं कामें हबिबुल्ला ह्यांच्या हातीं दिलीं होतीं. तीं ते उत्तमप्रकारें चालवीत. त्याप्रमाणें नासरुल्लाखानालाही कांहीं कामें सांगितलीं होतीं. तीं ते चांगलीं करीत. त्यांजकडे मोठें काम ह्मटलें ह्मणजे खजीन्याच्या हिशेबाचें होतें. त्याच्या संबंधानें कांहीं कोणाशीं वाद पडल्यास, आणि नासरुल्लांचा ठराव त्यांस न आवडल्यास तें प्रकरण हबिबुल्लाकडे किंवा स्वतः अमीरसाहेबांकडे जाई, आणि त्यांचा निकाल होई तो शेवटचा समजत.

अमीर साहेबांची स्वारी राजधानींत असो का प्रांतांत फिरत असो, तैनातींतल्या मुलांच्या शिक्षणाकरितां शाळा चालू असे. तींत लिहिणें वाचणें, गणित, इतिहास, भूगोल, धर्मनीति इत्यादि विषय शिकवीत. त्यांतले अर्धे मुलगे तैनातींत असत, तेव्हां बाकीचे अर्धे त्या शाळेंत शिकत असत.

अमीर साहेबांस करमणूक हवीशी वाटत असे. पण, त्यांस मुळीं बनतच नसे. तरी, मधून मधून ते वाद्य, गान,

बुद्धिबळें खेळणें, गोष्टी सांगणें, इत्यादिकांकडे थोडें थोडें लक्ष देत. गानवादन चालत असे, त्यानें भोंवताल्च्या मंडळीस मात्र पुष्कळ करमणूक होत असे स्वतः अमीर साहेबांस गानवादनांत बरेंच गम्य होतें जे कोणी प्रामाणिक आणि मनापासून काम करणारे सेवक अमीरांस वाटत, त्यांशीं ते अगदीं उघड्या मनानें, मित्राच्या नात्यानें, प्रसंगोपात थोडाबहुत विनोद करून, प्रेमानें वागत. परंतु, जे विश्वासघातकी, तोंडपुजे असत, त्यांस अमीर साहेब केवळ काळ होते. त्या संबंधानें त्यांच्या बोलण्यांत सादी कवीचें एक वचन नेहमीं येत असे. त्याचा आशय असा आहे कीं, " जे कोणी शांततेस विघ्नें आणितात, त्यांस ममताळूपणानें वागविणें हें, जे कोणी शांत वृत्तीनें राहायास इच्छितात, त्यांचें शत्रु होणें आहे. " खरें आहे.

अमीर साहेबांना बिछान्यावर पडल्याबरोबर झोंप लागत नसे. ह्मणून, जो एक वाचक नेमलेला असे, तो इतिहास, भुगोलविद्या, चरित्रें, राजकारणें इत्यादि विषयांवरचे ग्रंथ वाचीत जवळ बसे. तें अमीर साहेब लक्षपूर्वक ऐकत असत. ह्याविषयीं अमीर साहेबांनीं ह्मटलें आहे:–" हें ग्रंथश्रवण फार लाभदायक आहे. त्यानें ज्ञान वृद्धि पावतें. शिवाय, प्राचीन काळच्या लोकांचे विचार कसे होते, आणि ते बदलत बदलत आतां कसे झाले आहेत, हें समजतें. आणखी गडबडींत झोंप लागण्याची संवय लागते, हा एक मोठा फायदा आहे. लढायांत तोफांचे गडगडाट चालले असतांही मला गाढमूढ झोंप येते. " झोंप अगदीं जवळ धजलीशी वाटली, ह्मणजे हें वाचणें बंद होऊन कोणी नेमलेला

माणूस कांहीं चमत्कारिक गोष्टीं सांगू लागे. त्या गोष्टींच्या नादनें अमीर साहेबांस गाढमूढ झोंप लागे आणि मग बरें वाटे. ह्मणून त्या गोष्टी तो सकाळीं अमीरसाहेब जागे होतपर्यंत सांगत बसे.

अमीरसाहेब फावल्या वेळांत लिहीत असत. त्यांचे कितीएक ग्रंथ काबूलच्या छापखान्यांत छापून प्रसिद्ध झाले आहेत. ह्यांस पुष्टु ह्मणजे अफगाण लोकांची मूळ भाषा, फारशी, तुर्की, रशियन, आरबी आणि हिंदुस्थानी, इतक्या भाषा येत. ह्यांस सगळे विषय आवडत, आणि सर्व प्रकारचें ज्ञान मिळविण्याचा प्रयत्न ते करीत. त्यांना कोणी माणूस भेटो-मग तो त्यांच्या देशांतला असो कीं पर देशांतला असो, त्यास उलट सुलट नानाप्रकारचे प्रश्न करून, त्यास येत असत त्या विषयांची माहिती ते मोठ्या अगत्यानें मिळवीत. ते ह्मणत, "प्रत्येक माणसापासून मी कांहींना कांहीं तरी नवें शिकतों."

ह्यावरून हें सहज दिसून येईल कीं, अमीर अबदुल रहिमान हे आपल्या राज्याच्या कामास अगदीं वाहलेले होते, आणि त्याशिवाय त्यांना दुसरें कांहींएक त्यांच्या डोळ्यांसमोर दिसत नसे. फार काय सांगावें, ते आपल्या सुखाकडे पाहात नसत—आपल्या जीवाची परवा करीत नसत. आणखी दुसरी मोठी लक्षांत ठेवण्यासारखी जी गोष्ट ह्या भागावरून दिसते, ती ही कीं, शिक्षण ह्मणजे काय, आणि तें माणसाच्या स्थितीच्या अनुरोधानें कसें वेगळ्या वेगळ्या प्रकारचें पाहिजे, हें त्यांस उत्तम प्रकारें कळत होतें. आपल्या चिरंजीवांस आपल्या पश्चात् अफगाणिस्थानाचें राज्य चाल-

वायाचें आहे, ह्यास्तव तें काम त्यांना करितां येईल, असें शिक्षण त्यांस देणें अवश्यक आहे, आणि पुस्तकी शिक्षण कांहीं कामाचें नाहीं, तर प्रत्यक्ष अनुभवानें मिळालेलें शिक्षण पाहिजे, असें मनांत आणून, राज्यांतलीं बरींच मोठमोठीं खातीं हबिबुल्लाखान आणि नासरुल्लाखान ह्यांच्या स्वाधीन त्यांनीं केलीं होतीं, आणि त्यांच्या कामावर ते फार बारीक नजर ठेवीत असत. ही गोष्ट सामान्य नव्हे.

---

# भाग आठवा.

## राज्याची व्यवस्था.

साधारण माणसांस कुटुंबाची व्यवस्था लावणें देखील कठिण जातें. त्या मानानें राज्याची व्यवस्था लावणें-आणि त्यांतही—रानटी लोकांनीं भरलेल्या राज्याची व्यवस्था लावणें हें किती कठिण आहे, ह्याची कल्पना केली पाहिजे. परंतु अमीर अबदुल रहिमानांसारख्या महामति पुरुषांस त्यांत कांहीं कठिण वाटत नसतें ह्या अमीरांनीं आपल्या राज्याची व्यवस्था कशी सुरेख लाविली आहे, ती येथें थोडक्यांत सांगतों.

ह्यांत एक चमत्कार सांगावयाचा आहे कीं, सांप्रत काळीं विद्याचारसंपन्न राष्ट्रांच्या विद्वन्मंडळांत, तीन प्रकारच्या राज्य-व्यवस्थांपैकीं राजप्रजासत्ताक ही जी राज्यव्यवस्था अत्युत्तम मानितात, ती अल्प प्रमाणानें कां होईना, पण अमीरसाहेबांनीं

अफगाणिस्थानांत—अशा अज्ञान आणि आडदांड लोकांत चालू केली. ह्मणजे, जी गोष्ट संपादायास इतर विद्याचारसंपन्न राष्ट्रांस शतकांचीं शतकें घालावीं लागलीं, ती गोष्ट अमीरसाहेबांनीं दहा वीस वर्षांत साधिली. ती अशी. त्यांचें मत असें होतें कीं, आपल्या देशांतल्या राज्याची व्यवस्था इंग्लंड, जर्मनी, इत्यादि उत्तम देशांतल्या राज्यव्यवस्थेसारखी असावी. परंतु, ती चालू करण्यास लोक असावे तितके समंजस नव्हते. तरी, वाट पाहात बसण्यांत अर्थ नाहीं, पाण्यांत पडल्याशिवाय कधीं पोंहतां यावयाचें नाहीं, असें मनांत आणून, तीस त्यांनीं आरंभ केला. तो असा. अफगाण दरबारांत तीन प्रकारचे लोक असतात; सरदार, खवानिन मुलकी, आणि मुल्ले. ह्यांपैकीं सरदार हे पिढीजाद असतात. बापाच्या जागीं मुलानें बसावें, असें चालतें. तरी त्यास अमीरांची मंजुरी लागतेच. दुसऱ्या प्रकारचे लोक खवानिन मुलकी, ते निवडलेले असतात. त्यांस निवडण्याची रीति अशी आहे. खेड्यांतले किंवा गांवांतले लोक बहुमतानें, आपणांतला कोणी एक माणूस शाहाणा ह्मणून निवडितात, त्यांस **मालिक** अशी संज्ञा आहे. असे सगळे मालिक एकत्र जमून, आपणांतला शाहाणा असा एक माणूस बहुमतानें निवडितात, त्यास **खान** अशी संज्ञा आहे. ही निवड गुण पाहून कायम करणें अमीरसाहेबांच्या हातीं असतें. त्यांत त्यांचें ज्ञान, त्यांचें वर्तन, त्यांचें वजन, आणि त्यांची राजनिष्ठा आणि त्यांनीं स्वतः किंवा त्यांच्या वडिलांनीं काय पराक्रम केले आहेत, ह्या गुणांचा विचार करितात. आणि तिसऱ्या प्रकारचे लोक ह्मणजे मुल्ले, ते धर्मोपाध्ये होत.

ह्यांत काजी, मुफती हेही असतात. त्यांना ह्या पार्लमेंटांतल्या जागा मिळविण्यास नेमलेल्या परीक्षा द्यावयाच्या असत. त्या परीक्षा धर्मशास्त्र आणि देशाचे कायदे ह्या विषयांत होत, आणि ह्या तीन प्रकारच्या लोकांतल्या बहुमताप्रमाणें अमीरसाहेब आपल्या राज्याचा सगळा कारभार चालवीत. ह्यावरून राजप्रजासत्ताक राज्याच्या स्थापनेस अमीर-साहेबांनीं हळू हळू कसा आरंभ केला होता, आणि ह्या राज्यकारभाराचें शिक्षण आपल्या प्रजाजनांस ते कसें देत होते, हें पाहून खरोखर मोठें आश्चर्य वाटतें. ही मुख्य दरबारच्या कामाची व्यवस्था झाली. आतां देशांतली व्यवस्था सांगतों.

त्यांनीं सगळ्या व्यवस्थेचीं दोन खातीं केलीं. लष्करी आणि मुलकी. त्या खात्यांतले नौकर आपापलीं कामें बरोबर करितात कीं नाहींत, हें अमीरसाहेब फार दक्षतेनें पाहत असत. लष्करी खात्यास जें दारुगोळा वगैरे सामान लागतें तें तयार करण्याचे कारखानेही त्याच खात्यांत मोडतात. त्यांतल्या लोकांस महिन्याच्या महिन्यास पगार देत. त्यांनीं लष्कराच्या मुख्य शाखा तीन केल्या; तोफखाना, घोडेस्वार आणि पायदळ. शिवाय पोलीसखातें वेगळें होतेंच. आणखी, ह्या खेरीज आपखुषी शिपायांची एक शाखा होती. ह्या अपखुशीच्या शिपायांच्या शाखेंत अफगाणिस्थानांतल्या प्रत्येक सोळावर्षांपेक्षां अधिक आणि सत्तरवर्षांपेक्षां कमी वयाच्या सगळ्या पुरुषांचा समावेश होतो. देशांतल्या आठ जवानांला एक जवान, ह्याप्रमाणें, स्वसंतोषानें आपल्या खर्चानें कांहीं लोक लष्करांत काम शिकण्याकरितां पाठवि-

तात. ते तीन वर्षे लष्करांत राहून काम शिकून परत आपापल्या घरीं कामधंद्यावर जातात, आणि मग त्यांच्या मोबदला दुसरे येतात. हा क्रम केवळ लोकांच्या आग्रहास्तव अमीरसाहेबांनीं इ० स० १८९६ पासून चालू केला. ह्या आपखुषी शिपायांविषयीं त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, " सक्तीनें सरकारी नौकरी करायास लावणें ह्याच्या अगदीं विरुद्ध मी आहें. लोकांनीं आपल्या इच्छेविरुद्ध कांहींएक करूं नये, आणि त्यांस पतकरत असल्याशिवाय त्यांस कामास लाऊं नये अशी माझी इच्छा आहे. अफगाण लोक हे चांगले शूर योद्धे आहेत, हें खरें आहे. परंतु, त्यांना कवाईत आल्यावांचून त्यांच्या त्या गुणाचा उपयोग व्हावयाचा नाहीं. त्यांस कवाईत शिकाविल्याशिवाय, कवाईत शिकलेल्या चांगल्या शिपायांशी टक्कर देतां यावयाची नाहीं. परंतु, आतां त्यांस कवाईत येत आहे, त्यांस पगार देण्यास पैसा आहे, आणि ते आपल्या देशाच्या रक्षणार्थ लढण्यास तयार आहेत, ह्याचा मला फार संतोष वाटतो. " काय नवल आहे ! अमीरसाहेबांस त्यांच्या देशाचा आणि त्यांच्या लोकांचा मोठा अभिमान होता. तो त्यांच्या मनांत नेहमीं घोळत असे. आणि तो जरा सवड सांपडली कीं, पुढें होई. वर जें सांगितलें आहे, तें लिहिल्यावर लगेच खालीं त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, " मी रशियाकडे होतों. तेव्हां त्यांनीं एक मोठी तोफ आणविली होती, ती पाहायास मी गेलों. तेथल्या अधिकाऱ्यांनीं मला सांगितलें कीं, ही तोफ हिरात शहरावर सोडण्याकरितां आणिली आहे. त्यांस मीं उत्तर दिलें कीं, अफगाणिस्थान जर देवानें माझ्या नशीबीं लिहिलें आहे, तर

जेथें ह्या तोफेचा पराभव होईल, तेंच हिरात ह्मणावयाचें. पण, हिरातचें स्वामित्व जर मजकडे यावयाचें नसलें, तर मग काय होईल तें सांगवत नाहीं. त्यावर रशियन सरदार मला ह्मणाले, ‘ तुह्मी जर आमच्या पैशावर राहातां, तर तुह्मीं असें कां बोलावें ? ’ त्यांस मीं उत्तर दिलें, ‘मी रशियन सरकाराकडची नेमणूक पतकरली आहे, ती, माझा देश, माझें राष्ट्र, माझा धर्म, आणि देशभिमान त्यांस विकण्याकरितां पतकरिली नाहीं. अफगाणिस्थानाची निंदा ऐकून स्वस्थ बसणारे जे कोणी आहेत, त्यांतला मी नाहीं आहें. खरें बोलणें ऐकण्याची जर तुमची इच्छा नव्हती, तर तुह्मी ह्या तोफेविषयीं मुळींच कांहीं बोलावयाचें नव्हतें.” निस्पृहस्य तृणं जगत्.

दोस्त महंमदांच्या वेळेपासून अफगाणिस्थानांतल्या सैन्यास थोडथोडी शिस्त लागूं लागली होती. आणखी शेरअल्लींची आणि लार्ड मेयोंची मुलाखत अंबाला येथें झाली, तेव्हां इंग्लिश सैन्याची व्यवस्था पाहून तीप्रमाणें आपल्या सैन्याची व्यवस्था ठेवण्याचा क्रम शेरअल्लींनीं धरिला. त्याच्या योगानें पुष्कळ सुधारणा झाली. ती अमीर अबदुल रहिमान ह्यांच्या वेळीं चांगलीच वाढली. परंतु, ह्या प्रकरणीं लिहितांना त्यांनीं ह्मटलें आहे कीं, “सैन्याची खरी सुधारणा आमच्या तीर्थरूपांच्या वेळीं झाली.” सुपुत्रांचें लक्षण असेंच असतें. अमीरसाहेबांनीं आपल्या लष्कराचें वर्णन केलें आहे:—
“ माझ्या सैन्याची सुधारणा युरोपियन पद्धतिप्रमाणें झाली आहे. त्यांना नियमित वेळीं पगार मिळत आहे. प्रत्येक पलटणीबरोबर रस्ता करणारे एंजिनियर, तंबू, तंबूवाले, वैद्य, हकीम, शस्त्रवैद्य, धर्मोपदेशक, सामान पुरविण्याचें

खातें, खजीना, इत्यादि सर्व साहित्यें जय्यद तयार असत."
त्यांत कंपू, तुकड्या, आणि पलटणी वेगळ्या वेगळ्या करून, त्यांत, लहानांपासून, क्रमाक्रमानें चढत चढत, मोठमोठे अमलदार नेमिले आहेत. त्यांत जनरलाला पगार ६०० रुपये, ब्रिगेडियरला २५०, स्वारांच्या कर्नेलाला २००, मेझरला १२०, स्वारांच्या कप्तानाला ८०, पायदळाच्या आणि तोफखान्याच्या कप्तानाला ३०, आणि साधारण शिपायाला १०, असा क्रम आहे. लोकांस पगार कांहीं रोकडीनें देतात आणि कांहीं ऐनजिनसी देतात. स्वाराला १६ रुपये रोख, आणि चार रुपयांचें धान्य, शिपायाला ५ रुपये रोख आणि पांच रुपयांचें धान्य, असें देतात. प्रत्येक पलटणीस एक धर्मोपदेशक, एक डाक्टर, एक शस्त्रवैद्य, हे असावयाचेच. सैन्यांतल्या मोठ्या हुद्यांवर नेमणुका बहुतकरून पिढीजाद थोर कुळांतल्या पुरुषांच्या होतात; शिपायांतला माणूस सहसा अमलदारीवर नेमीत नाहींत. ह्या नियमित कवाइती-सैन्याशिवाय खासदार ह्मणून कांहीं लष्कर असतें. त्यांस कवाईत वगैरे फारशी येत नसते. त्यांतल्या लोकांस पगार पांच पांच साहा साहा रुपये असतो. इ० स० १८८२ ह्या वर्षी अमीर साहेबांचें सैन्य काबूल, कंदाहार, आणि हिरात येथें होतें, तें येणप्रमाणें:– १६०० तोफखान्यावरचे लोक; ९७५० स्वार; ३०८९० पायदल, ७५००० कवाईत न शिकलेले स्वार, ९००० खासदार; आणि १८२ तोफा.

अभ्यास दृढ होण्याकरितां अमीरसाहेब आपल्या लष्करांत लटक्या लढाया करवीत. केव्हां कसें वागावें, हें प्रत्यक्ष

शिकवीत. बंदुका, तोफा, इत्यादि हत्यारें निखळून त्यांचे अवयव वेगळे वेगळे करावे कसे, आणि ते पुनः जडवावे कसे, हें त्यांच्या शिपायांस आणि अमलदारांस शिकविलेलें आहे.

शिवाय, युद्धविद्याशिक्षण त्यांच्या शिपायांस नियमित रीतीनें पद्धतवार मिळत असतें. त्यांविषयींचे ग्रंथ आहेत, ते त्यांस पढावे लागतात. त्यांत त्यांची परीक्षा होते. आणि त्यांत ज्यांची जशी प्रवीणता दिसून येते, तसे अधिकार त्यांस देतात.

देशांमध्यें इकडून तिकडे सैन्य नेण्यास आगगाडी आवश्यक आहे, असें आतां सर्वांस कळलें आहे. परंतु, त्याविषयीं अमीर साहेबांचें मत कांहीं वेगळें होतें. त्याविषयीं त्यांनीं लिहिलें आहे कीं, "ह्या संबंधानें, माझ्यामागें माझ्या गादीवर बसणाऱ्या माझ्या मुलांस आणि इतरांस असें आग्रहपूर्वक सांगतों कीं, अनेक राष्ट्रांचे जे व्यवहार सध्या चालले आहेत, त्यांत बळी तो कान पिळी हें तत्व मुख्य आहे. न्याय कोणी पहात नाहीं. ह्मणून, ज्या पक्षीं अफगाणिस्थानावर कोणीं हल्ला केला असतां त्याशीं सामना करण्यास असावीं तशीं शस्त्रास्त्रें आपापल्याशीं नाहींत, त्या पक्षीं अफगाणिस्थानांत आगगाडीचा रस्ता बांधणें हें अगदीं वेडेपण आहे."

ह्या संबंधानें अमीर साहेबांनीं आणखी असें लिहिलें आहे कीं, "दारूगोळा आणि शस्त्रास्त्रें ३०००० शिपायांस २ वर्षे पुरतील, अशी आमची तयारी आहे. इतके लोक एका पंधरा दिवसांत जमवितां येतील. परंतु, मोठी अडचण काय ती इकडून तिकडे लष्कर नेण्याची, त्यांस अन्नसामुग्री,

पुरविण्याची आणि त्यांस पगार देण्याची आहे. तरी त्यांत एक सुख आहे. देशांत हत्यारें पुष्कळ आहेत. सर्व पुरुष-बायकांपाशीं बंदुका तरवारी आहेत. बायका स्त्रीधन घेतात, तें देखील शस्त्रास्त्रांच्या रूपानें घेतात. आणि देशांत हत्ती, घोड, गाढवें, उंटें, खेंचरें हीं पाहिजेत तितकीं आहेत, तीं सामान वाहून नेण्यास उपयोगीं पडतील." हें जरी खरें होतें, तरी अमीरसाहेबांनीं सावधगिरीकरितां २४००० घोडा तयार ठेविला होता. आणि तोफखाना ओढून नेण्यास कितीएक हत्ती तयार ठेविले होते. हत्तीघोड्यांच्या औषधपाण्याकरितां क्लेमेंट ह्या नांवाचे कोणीएक इंग्लिश वैद्य ठेविले होते, त्यांनीं ती विद्या कितीएक काबुली लोकांस शिकविली. ते लोक आतां तें काम उत्तम प्रकारें करितात.

आपलें लष्कर नेहमीं लढाईस तयार ठेवण्याविषयीं अमीर साहेब फार दक्ष असत. असें ठेवण्याचें कारण त्यांनीं असें सांगितलें आहे:—" अफगाणिस्तान आणि इंग्लंड ह्यांचें अत्यंत सख्य झालें आहे, दोन्ही पक्षांचें हिताहित एक झालें आहे, ह्याविषयीं कांहीं शंका नाहीं. परंतु, कोणत्या वेळीं कोणत्या कारणांनीं काय होईल, ह्याचा कांहीं नेम सांगवत नाहीं. ह्मणून, माझ्या गादीवर बसणारांनीं ह्या कामांत कधीं ढिलाई करूं नये. नेहमीं दक्ष राहावें. आपल्या धर्मांत सांगितलें आहे कीं, 'संकट सोसण्यास सिद्ध व्हा, आणि मग देवावर भरंवसा ठेवा.' इंग्लंडानें अफगाणिस्थानाशीं जे करार केले आहेत, ते मोडणें कठिण आहे. इंग्लंड ते कधीं मोडणार नाहीं. अफगाणिस्थान स्वतंत्र असणें हें इंग्लंडास फार हितावह आहे. तें रशिया

आणि हिंदुस्थान ह्यांच्यामध्यें बळकट भिंतीसारखें असावें. "

आपणांस कोणत्या प्रसंगीं कोणाशीं लढावें लागेल ह्याचा नेम नाहीं, असें समजून अमीरसाहेब आपलें सैन्य नेहमीं तयार ठेवीत असत. तें प्रसंगानुसार वाढवीतही असत. ह्मणून त्याची संख्या नेहमीं सारखी नसे. कमजास्त होई. तरी, इ० स० १८८२ ह्या वर्षी काबूल, कंदाहार, हिरात आणि हिंदुकुशपर्वताच्या पलीकडचा प्रदेश ह्या सर्वांत मिळून एकंदर ३०८९० पायदळ, ९७५० स्वार, आणि १६०० गोलंदाज इतकें सैन्य होतें. १८२ तोफा होत्या. ह्यांशिवाय ९००० पोलीस होतें तें वेगळेंच. ह्या सगळ्यांस हत्यारें दिलीं होतीं, त्यांत कांहीं विलायती होतीं, आणि बाकीचीं काबुलांत केलेलीं होतीं. त्यांत होतां होईतों त्यांस देशी हत्यारें द्यावयाचीं, हा त्यांचा मोठा कटाक्ष असे.

मुलकी खात्यांत खजीना ही मोठी बाब आहे. अफगाणिस्थानचें सगळ्या प्रकारचें उत्पन्न काबूलच्या खजीन्यांत जमा होतें, आणि सगळे सरकारी खर्च तेथून होतात. हा खजीना किल्ल्यांत असतो. त्याच्या बाहेरच्या आंगास कचेऱ्या आहेत, व त्या सगळ्या इमारतींच्याभोंवती एक मोठा बाग आहे. प्रांतांनीं आपल्या जमेंतून आपले खर्च भागवावे असें आहे. परंतु, एकाद्या प्रांतास तोटा आला, तर पैसा काबलच्या खजीन्यांतून पाठवितात. दररोज सायंकाळीं, जमा, खर्च आणि शिल्लक ह्यांचे ठोकळ आंकडे अमीरसाहेबांकडे जात. स्वतः अमीरसाहेबांची किंवा हबिबुल्लाखानांची सही असल्यावांचून खजीन्यांतून पैसा मिळत नसे. उत्पन्नाच्या बाबी ह्मटल्या ह्मणजे जमीनीचा महसूल, आयात जकात,

निर्यात जकात, दस्तुऱ्या, पोष्टहपीस, तिकिटांची आणि छापी कागदांची विकरी, सरकारी व्यापार, दंड, जप्त्या, खाणींचें उत्पन्न, आणि अठरा लाख रुपये हिंदुस्थान सरकाराकडून दरसाल यावयाचे ते, ह्या होत्या. ही अठरा लाखांची रकम विलायतेहून लढाऊ सामान आणण्याच्या कामीं खरचीत असत.

कोणीं कशाबद्दल किती पैसा द्यावयाचा ह्याचे आंकडे आधीं लोकांस कळवायाचे. आणि त्या रकमा त्यांनीं अमक्या वेळीं अमक्या अधिकाऱ्यास द्याव्या, अशी जाहिरात द्यावयाची. त्याप्रमाणें त्यांनीं रकमा दिल्यावर त्यांस पावत्या मिळत. त्या पावत्या त्यांनीं, मूळ हुकूम सुटलेल्या कचेरीच्या अधिकाऱ्यांस दाखवाव्या, आणि त्यांनीं त्या नोंदाव्या. ह्मणजे किती रक्कम जमा झाली हें त्यास कळे. अशी जमाबंदीची रीति होती.

जागोजाग सैन्य ठेविलें होतें. तेथें घोडे, हत्ती, आणि खेंचरें होतीं. त्यांस दाणा, गवत, लांकूड, भाजीपाला, दूध इत्यादि जें काय लागेल, तें त्या गांवच्या किंवा जवळपासच्या रयत लोकांनीं आपापल्या सवडीप्रमाणें पुरवावें, आणि त्याची पावती घ्यावी. आणि त्यांपासून वसूल घेते वेळीं बाजार दरानें त्या पदार्थांची किंमत त्यांस वजा द्यावी, अशी वहिवाट होती. ही फार चांगली होती. गरीबगुरीबांस ही फार सोईची पडे.

न्यायाची पद्धति अमीरसाहेबांनीं बरीच बदलली पूर्वीं, ३०० रुपये दंड दिला ह्मणजे खून करणारा सुटत असे. तो कायदा रद्द करून असें केलें कीं, खून करणाऱ्या-

ला, ज्याचा खून झाला आहे, त्याच्या इष्टमित्रांच्या स्वाधीन करावें, आणि त्यांनीं त्यास पाहिजे ती शिक्षा करावी, किंवा क्षमा करावी. तरी, ती क्षमा मंजूर करण्याचा अधिकार सरकाराकडे ठेविला. त्याला सरकार आणि इष्टमित्र ह्यांतून कोणींच क्षमा केली नाहीं, तर त्यानें ७००० रुपये दंड द्यावा, असें होतें.

मालमत्तेच्या अभिलाषास शिक्षा फार सक्त होती. वाटेंत कोणाची कांहीं वस्तु पडली, तर तिला दुसऱ्या कोणीं, ती मालकास परत देण्याकरितांदेखील, हात लावितां कामास नये. हात लाविल्यास त्याचा हात तोडीत. काबु-लांत अमीरसाहेबांचे हेर जिकडे तिकडे फिरत असत. त्यांच्या द्वारें त्यांना शहरांतल्या सगळ्या लहानमोठ्या गोष्टी कळत. तसेंच पोलीस सर्वव्यापक होतें. जरा कोणी अपशब्द बोलला कीं त्याला शिक्षा करीत. शिवी दिली कीं दाहा फटके आणि दाहा रुपये दंड. एकाद्या धर्माध्यक्षास शिवीगाळ झाली कीं वीस फटके आणि पन्नास रुपये दंड. मशीदींत कोणी असभ्य रीतीनें वागला कीं, त्याला शिक्षा असे. परस्त्रीचें चुंबन घेतलें कीं तीस फटके मारून तुरुंगांत ठेवून, आणखी चौकशी करावयाची. निमाज पढावयास कोणी चुकवूं लागला, तर त्याला प्रथम गोडीगुलाबीनें सांगून पाहावें; त्याचा उपयोग झाला नाहीं तर चौदावें रत्न दाखवावें, आणि शेवटीं अमीरसाहेबांकडे न्यावें. ते त्याला चांगली शिक्षा करीत. अशा प्रकारचे कायदे इतर लोकांस फार विचित्र आणि भयंकर वाटतात. परंतु, अफगाण लोकांस ते फार चांगले वाटतात. ह्याचें एक

उदाहरण असें सांगतात कीं, सुलतान अलप्तगीन ह्यांची स्वारी गिझनीस असतां, त्यांच्या चाकरांपैकीं दोघां चाकरांनीं जवळच्या खेडयांतल्या गरीब माणसांच्या कोंबड्या चोरिल्या. त्याबद्दल सुलतानांनीं त्यांच्या कानांस भोंकें पाडवून आणि त्यांत त्या कोंबड्या लोंबत लावून त्यांची धिंड सगळ्या गांवभर काढिली. तें लोकांस कळलें. तेव्हां त्यांचे असे उद्‌गार निघाले कीं, "इतका न्यायी जो मनुष्य आहे, तोच राजा होण्यास योग्य आहे."

पूर्वीं असें असे कीं, कुटुंबांत एक भाऊ मयत झाला, तर त्याच्या बायकोनें त्याच्या भावाशीं लग्न लाविलेंच पाहिजे. तो कायदा मोडून ह्यांनीं असें ठरविलें कीं, नवरा मरतांच बायको स्वतंत्र व्हावी. तिच्यावर कोणाची सत्ता नसावी. तिनें आपल्या खुषीप्रमाणें पाहिजे तर कोणाशीं लग्न करावें किंवा न करावें.

त्याप्रमाणेंच, लहान मुलीचें लग्न तिच्या आईबापांनीं कोणाशीं लावून दिलें, पण ती वयांत आल्यावर तो नवरा जर तिला न आवडेल, तर तिनें तो सोडावा. अथवा, त्या नवऱ्याजवळ कांहीं वेळ राहिल्यावर जर तिला तो गांजूं लागला, अथवा तिचा प्रतिपाळ बरोबर करीनासा झाला, तर तिनें अन्नवस्त्र मिळण्याकरितां त्यावर फिर्याद करावी, किंवा त्याला काडी मोडून द्यावी. असा कायदा त्यांनीं केला.

कांहीं सासरे आपल्या जांवयांपासून पुष्कळ स्त्रीधन बायकोला देण्याविषयीं करार लिहून घेत. पुष्कळ ह्मणजे किती? जांवयाला पगार असावा दाहा रुपये दरमहा, आणि त्यानें स्त्रीधन लिहून द्यावें पन्नास हजार रुपये! ती रक्कम त्याला

देतां आली नाहीं ह्मणजे तो गुलाम व्हावयाचा. असें मोठें बंड होतें. तें सगळें अमीरसाहेबांनीं मोडून राजकुलांतल्या जांवयांनीं स्त्रीधन तीन हजारांपासून नऊ हजारपर्यंत द्यावें, आणि बाकीच्या लोकांनीं ३०० पासून ९०० पर्यंत द्यावें, असें ठरविलें. ह्या नियमांनीं लोकांस फार सुख झालें. त्याप्रमाणेंच लग्नें नोंदलीं पाहिजेत, असा कायदा केला. त्याच्या योगानें, लग्न खरें झालें का त्यांत कांहीं लबाडी झाली, ह्याचा संशय घेण्यास जागा राहिली नाहीं.

ह्या अमीरसाहेबांच्या कारकीर्दीच्या आधीं सार्वजनिक उपयुक्त कामांकडे कोणीं लक्षच दिलें नाहीं. त्यांजकडे ह्यांचें लक्ष फार असे. मोठमोठ्या शहरांत चांगल्या इमारती बांधल्या आहेत. कितीएक मोठ्या सडका झाल्या आहेत, आणि कितीएक होत आहेत. काबुलापासून बल्कपर्यंत सडक झाली आहे, ती पुढें रशियापर्यंत गेली आहे. शिवाय काबुलापासून हिरातेपर्यंत, हिरातेपासून कंदाहारापर्यंत, कंदाहारापासून गिझनीपर्यंत, आणि गिझनीपासून काबुलपर्यंत अशा अनेक सडका झाल्या आहेत. काबुलापासून पेशावरापर्यंत जी सडक झाली आहे, तिचा उपयोग तर फारच होत आहे. कांकीं, तिच्या योगानें लोकांस घांट ओलांडण्यास नकोतसे झाले आहेत. तसे जागोजाग पूल बांधिले आहेत ह्या सडकांची आणि पुलांची पाहाणी दरसाल नियमीत रीतीनें होऊन त्याची दुरुस्ती होत असते. सडकांच्या बाजूस दुतर्फा झाडें लाविलीं आहेत, आणि असें ठरवून ठेविलें आहे कीं, ज्या लोकांच्या जमिनींतून ह्या सडका गेल्या आहेत, त्या लोकांनीं ह्या सडका आणि त्यांच्या आजू-

बाजूचीं झाडें हीं संभाळिलीं पाहिजेत.

त्याप्रमाणेंच, ज्या गांवांतून आणि खेड्यांतून प्रवासी जात असतात, त्या गांवांतल्या आणि खेड्यांतल्या लोकांनीं त्या प्रवाशांच्या संरक्षणाची तजवीज ठेविली पाहिजे. वाटसरांच्या संबंधाची सर्व जोखीम त्यांवर ठेविली आहे. ह्मणजे असें समजा एकादा वाटसरू एकाद्या खेड्यांत मारला गेला, किंवा लुटला गेला, तर त्या खेड्यांतल्या लोकांनीं तो अपराधी दाखवून द्यावा एक, किंवा त्या वाटसराचें नुकसान भरून द्यावें एक; एरव्ही त्यांची सुटका व्हावयाची नाहीं. त्यामुळें सगळे लोक फार सावध असतात, आणि आपल्या गांवांत असें कांहीं घडूं नये ह्याविषयीं जपतात. ह्या व्यवस्थेनें सगळ्या मुलखांत आपोआप चांगला बंदोबस्त राहिला आहे. तरी, व्यापाऱ्यांच्या तांड्यांवर नजर ठेवण्यास वेगळे शिपाई ठेविलेले आहेत.

देशांत कांहीं नवे किल्ले बांधिले आहेत. ते शहरांच्या संरक्षणास उपयोगीं पडतात. बल्क शहराजवळ देहदली किल्ला बांधिला आहे. त्यावरून बल्क आणि रशिया ह्यांच्या मधल्या रस्त्याचा मारा साधितां येतो. हा किल्ला सगळ्या अफगाणिस्थानांत मोठा आहे.

अमीरसाहेबांनीं दुसरी एक मोठी सोय आपल्या प्रजेची केली, ती औषधपाण्याची होय. त्यांनीं मिस हामिल्टन् ह्या विद्वान वैदीण बाईस आपल्या दरबारांत औषध देण्यास ठेविलें. त्या बाई इंग्रजी पद्धतीचीं औषधें देत. आणि दुसरे एक हकीम ठेविले होते, ते देशी पद्धतीचीं औषधें देत. ज्यांस जीं आवडत, ते तीं घेत असत. पुढें अमीर साहे-

बांच्या आज्ञेवरून ह्या मडमसाहेबांनीं काबुलास एक सरकारी दवाखाना स्थापित केला, आणि आपल्या मदतीस डाली ह्मणून एक दुसऱ्या मडम साहेब त्यांनींच विलायतेहून बरोबर आणिल्या होत्या. ह्या दोन्ही मडमा लोकांस औषधें देऊं लागल्या, त्यांचा त्यांस गुण येऊं लागला. नंतर ह्या मडमांनीं गाईपासून लस घेण्याची आणि गोस्तन देवी काढण्याची सुरवात केली. तिच्या योगानें, देवी येऊन शेंकडों मुलें मरत असत तीं बचावूं लागलीं. हें पाहून लोकांस फार संतोष झाला. आणखी, अमीरसाहेबांच्या नित्याच्या परिपाठाप्रमाणें, ह्यांच्या हाताखालीं वैद्यकी शिकण्यास कांहीं लोक दिले होते, तेही तयार होऊन लोकांस औषधपाणी करूं लागले. असें होतां होतां, अनेक मोठमोठ्या शहरांत दवाखाने स्थापित झाले. त्यांच्या योगानें लोकांतलीं दुखणीं आणि मृत्यूंची संख्या हीं कमी झालीं. हें लोकांच्या दृष्टोत्पत्तीस आलें, तेव्हां इंग्लिश वैद्यकावर त्यांचा विश्वास फार बसला.

अफगाणिस्थानच्या भूमींत सगळ्या प्रकारचे धातु आणि सगळ्या प्रकारचीं रत्नें भरलीं आहेत, अशी समजूत अमीरसाहेबांची होती. ह्या संबंधानें त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, "अफगाणिस्थानांतले राजे आणि लोक हे अज्ञान असल्यामुळें, एवढा हा धनवान देश, अडाण्यांच्या हातांत किंवा आंधळ्यांच्या हातांत हिरा पडावा, तसा झाला आहे." हें किती खरें आहे, हें सांगवत नाहीं. परंतु हे अमीरसाहेब गादीवर होते तेव्हां माणकें, वैडूर्य, सोनें, रुपें, लोखंड,

मीठ, तांबें, कोळसा, इत्यादिकांच्या खाणींचा शोध लागला आहे. परंतु त्या चालण्यास यंत्रें पाहिजेत तशीं अद्याप मिळालीं नाहींत, ह्मणून त्यांचें काम चालावें तसें चालत नाहीं. मिडलटनसाहेब ह्या इंग्लिश एंजिनियरास आपले चाकरास ठेवून त्यांकडून खाणींचें पुष्कळ काम अमीरसाहेबांनीं करून घेतलें आहे. परंतु, तें फार थोडें आहे. ह्या संबंधानें अमीरसाहेबांनीं आपल्या पश्चात् गादीवर बसणाऱ्यांस असा उपदेश केला आहे कीं, "ह्या खाणींचें मक्ते परकीय लोकांस कदापि देऊं नका. परकीयांच्या मंडळ्यांस ह्यांत काम करूं देऊं नका. नाहींतर, तुह्मी फार भानगडींत पडाल, आणि त्यांवरून तुमच्या देशाच्या राज्यकरभारांत हात घालण्यास त्यांस आईत्या सबबी सांपडतील, आणि सध्या जी द्रव्यतृष्णा चोंहींकडे एकसारखी मोठ्या झपाट्यानें वाढत चालली आहे, तिच्या नादानें ते ह्या खटपटींत पडण्याची संधी कधींही फुकट जाऊं देणार नाहींत. ह्याकारितां ह्याविषयीं फार जपा." हा उपदेश किती कळकळीचा आणि किती दूरदृष्टीचा आहे, ह्याचें वर्णन आह्मांस करितां येत नाहीं.

लोकशिक्षणाकडे अमीरसाहेबांचें लक्ष फार होतें. आपल्या राष्ट्रास जर कधीं मोठेपण यावयाचें असेल, तर तें लोकशिक्षणाच्या प्रसारानें येईल, अशी त्यांची खातरी होती. त्यांनीं आपल्या जवळच्या नौकरलोकांच्या मुलांकरितां, सरदारांच्या मुलांकरितां, आणि साधारण लोकांच्या मुलांकरितां जागोजाग शाळा घातल्या. पलटणींत शाळा घातल्या. आणि प्रत्येक खात्यांतल्या वेगळ्यावेगळ्या परीक्षा काढिल्या. त्या उतरल्याशिवाय त्या खात्यांत कोणाला

जागा मिळत नाहीं. धर्मोपदेशक, ह्मणजे आपणांस पैगंबराच्या बरोबरीचे समजतात, त्यांस देखील परीक्षा उतरल्याशिवाय अमीरसाहेब धर्मोपदेशकाचें काम करूं देत नसत. स्वतः आपल्या चिरंजीवांस अमीरसाहेबांनीं इंग्लिश, इतिहास, भूगोलविद्या, खगोलविद्या, गणित, चित्रविद्या, जमीनमोजणी, इत्यादि विषय शिकविले आहेत.

व्यापार हाच काय तो धनसंपादनाचा एक उत्तम मार्ग राष्ट्रास आहे, ही गोष्ट अमीरसाहेबांच्या मनांत फार भरली होती. त्याच्या योगानें त्याविषयींचे विचार त्यांच्या मनांत घोळत असत, आणि त्या संबंधाचे त्यांचे उद्योग नित्य चालले असत. हे गादीवर येण्याच्या अगोदर परदेशांतले लोक लहान लहान धंदे करून पैसे मिळवीत असत. ते धंदे ह्यांनीं आपल्या काबुली लोकांस शिकविले, आणि त्यांस उत्तेजन दिलें. तेव्हां बाहेरचे लोक अर्थात् फिके पडले. परक्या देशांतला माल अफगाणिस्थानांत फार येऊन खपत असे. तो ह्यांच्या डोळ्यांत खुपे. ह्मणून ह्यांनीं [illegible] माल आपल्या देशांत तयार करण्याची सुरवात करून, बाहेरचा माल खपूं नये असें केलें. मीठ बाहेरच्या देशांतून फार येत असे. तसें मीठ आपल्या देशांतल्या खाणींतून काढून, त्यांनीं तें आपल्या लोकांस घ्यावयास लाविलें, आणि बाहेरचें मीठ आफगाणिस्थानांत येऊं नये, अशी बंदी केली. त्याप्रमाणेंच कातडीं, माणकें, सोनें, वैडूर्य, नानाप्रकारचीं फळें, लोंकर, घोडे, इमारतींचें लांकूड, अफू, आणि कितीएक औषधी पदार्थ हीं सगळीं अफगाणिस्थानांतून बाहेर जातात, आणि त्यांच्या योगानें पुष्कळ पैसा अफगाणिस्थानांत येतो, असें चालले आहे.

गरीब व्यापाऱ्यांस सरकारी खजीन्यांतून भांडवलास पैसा कर्जाऊ देण्याचा क्रम अमीरसाहेबांनीं ठेविला होता. त्यावर ते व्याज घेत नसत. तरी, त्या भांडवलानें जो माल तयार होई, त्यावर शेंकडा अर्डाच रुपये प्रमाणें जकात घेत. ह्यांच्या योगानें त्या कर्जावर चांगलें व्याज सुटे, आणखीं, तो पैसा नेहमीं फिरत्या भांडवलाच्या रूपानें लोकांत खेळत असे. त्यापासून सरकारचें कोणत्याही प्रकारचें नुकसान न होतां, व्यापारास उत्तेजन मिळे.

व्यापार झपाट्यानें वाढण्यास आगगाडी आवश्यक आहे, असें पुष्कळ लोकांस वाटत असल्याकारणानें त्याविषयीं ते अमीरसोहबांस पुष्कळ आग्रह करीत. परंतु त्या संबंधानें त्यांच्या मनाचा जो एक ग्रह झाला होता, तो तिळमात्रही हालला नाहीं. त्या संबंधीं त्यांनीं लिहिलें आहे—" ते ह्मणतात तें अगदीं खरें आहे. त्याविषयीं मला काडीमात्रही संशय नाहीं. परंतु, त्यांना हें समजत नाहीं कीं, आंत येण्याचा मार्ग सोपा केल्यावर परकीय लोक भरा भग भरा देशांत येतील, आणि सगळें व्यापून टाकितील. अफगाणिस्थानाच्या भोंवतीं अभेद्य आणि अगम्य अशा मर्यादा आहेत, ह्यांनींच त्याचें संरक्षण झालें आहे. परमेश्वरानें, आपल्या पर्वतांचीं शिखरें हे सगळे आपणांस किल्ले करून ठेविले आहेत. आणखी सगळ्या दुनयेस ठाऊक आहे कीं, अफगाण लोक हे उपजत योद्धे आहेत, आणि जावत्कालपर्यंत त्यांस लपायास हे किल्ले विद्यमान आहेत, आणि शत्रूशीं उघड मैदानांत लढण्याचें कारण नाहीं, तोंपर्यंत हे कधीं कोणास दाद

देणार नाहींत. आगगाड्या आणि तारायंत्रें लाभदायक होतील, असाही दिवस अफगाणिस्थानास यावयाचा आहे. परंतु, तो केव्हां? सैन्य चांगलें तयार आहे, आणि त्याच्या पुढें शेजाऱ्यांचें किंवा परकीयांचें कांहीं चालावयाचें नाहीं, अशी स्थिति प्राप्त होईल तेव्हां. पण, असें होईपर्यंत, आपण आपल्या हातानें आपले हे किल्ले पाडून आपणास अशक्तपण आणून घेऊं नये. सोन्याचें अंडें दररोज घालणारी हंसी ज्या माणसाजवळ होती, त्या माणसानें जी चूक केली, ती आह्मीं करूं नये."

पोष्टाचीही सोय अमीरसाहबांनीं चांगली केली आहे. मोठमोठ्या शहरांत आणि गांवांत पोष्टहपिसें घातलीं आहेत. त्यांच्या द्वारें पत्रव्यवहार त्वरित आणि सुरक्षितपणें चालला आहे. हिंदुस्थानांतलें पत्र काबुलास पोंचण्यास अवघे छत्तीस तास लागतात. आणखी इराण, रशिया, इत्यादि देशांतही अशींच लवकर पत्रें जातात. पत्रें रजिस्टर करायाचीही पद्धति चालू केली आहे. ह्मणजे ज्या सोई इंग्लिश राज्यामध्यें केलेल्या आहेत, त्या सगळ्या अफगाणिस्थानांत केल्या आहेत. त्यांपासून अफगाण सरकाराला उत्पन्नही चांगलें होत आहे.

तैमुरलंगानें स्वचरित्रांत राज्यव्यवस्थेविषयीं असें ह्मटलें आहे कीं, "मीं असें ऐकिलें आहे कीं, धर्म आणि राज्य हीं जुळीं भावंडें आहेत, आणि ज्या राज्यांत धर्माच्या आज्ञा पाळीत नाहींत, तें राज्य नष्ट होतें." हेंच मत अमीर अबदुल रहिमान ह्यांचें होतें. हे स्वतः मोठे धर्मनिष्ठ होते. आणखी स्वतः आपल्या लोकांच्या मनांत धर्मतत्वें चांगलीं ठसविण्याविषयीं हे नेहमीं प्रयत्न करीत असत

त्यांच्या बोलण्यांत नेहमीं बोध पुष्कळ असे. ते मर्तिकाच्या वगैरे संबंधाचे खर्च बेतानें करण्याविषयीं आपल्या मंडळीस सांगत असत. त्यांनीं ह्या संबंधानें एक जाहीरनामा काढिला होता. त्यांत, कुराणांतलें एकवचन घेतलें आहे; तें हें:– " आपला पैसा उगाच खरचूं नका; कांकीं, उधळीं माणसें हीं सैतानाचीं भावंडें आहेत." आणखी त्यांतच त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, " ह्या धर्मबोधावर जो कोणी विश्वास ठेवणार नाहीं, त्याला देवापासून दूर घालवून देतील, आणि त्याला नरककुंडांत पडावें लागेल. त्यापासून देव आमचें रक्षण करो."

थोड्या दिवसांपूर्वी कांहीं ख्रिस्ती धर्मोपदेशकांनीं अमीर-साहेबांस असा अर्ज केला होता कीं, आह्मांस इतर मुसलमानी राज्यांत धर्मबोध करण्याची मोकळीक आहे, तशी आपल्या राज्यांतही मिळावी. आह्मी आपल्या प्रजाजनांस चांगली नीति शिकवूं, ज्ञान देऊं, त्यांस रीतिभाती चांगल्या लावूं, त्यांस कलाकौशल्यांत निपुण करूं, आणि त्यांना सर्व प्रकारीं सुधारूं, ह्मणजे ते, आपले धंदे स्वस्थपणें करून आनंदांत राहातील, आणि आपल्या देशांत दंगाधोपा होण्याचें भय राहणार नाहीं.

ह्या अर्जावर अमीरसाहेबांनीं त्यांस उत्तर दिलें कीं, अफगाण लोकांस मुसलमानी धर्माच्या तत्त्वांची माहिती फार चांगली आहे. ते मोठे धार्मिक आहेत. त्यांस धर्म शिकवण्यास दुसरे लोक नकोत आहेत. आणखी ते ख्रिस्ती धर्मोपदेशक आणि युरोपियन व्यापारी ह्यांच्या वाऱ्यास देखील उभे राहात नाहींत. कांकीं, हे लोक जेथें जेथें जातात, तेथल्या तेथल्या

लोकांत कज्जे उत्पन्न करितात, आपसांत भांडणें लावितात, त्यांच्या स्वातंत्र्याचा नाश करितात, त्यांस सर्व प्रकारीं लुटतात, त्यांच्या डोक्यावर बसतात, आणि त्यांवर आपला अमल चालवितात, असा त्यांचा समज आहे. ह्याचें प्रमाण पाहायाचें असल्यास जवळ आहे. युरोपियन लोक हे इतर खंडांतल्या पुष्कळ राष्ट्रांचे धनी होऊन बसले आहेत. आतां ज्ञान आणि व्यापार ह्यांविषयीं ह्मणाल, तर तें सगळें थोतांड आहे. तें परक्या लोकांस गुंतवून घेण्याचें जाळें आहे, दुसरें कांहीं नाहीं. कितीएक मुसलमान राजांनीं तुह्मांला आपल्या राज्यांत येण्याची आणि उद्योग करण्याची परवानगी दिली आहे, हें आह्मांस ठाऊक आहे. परंतु, त्यांचे उतराई होण्याकरितां तुह्मी त्यांचें कांहीं एखादें काम केलें आहे, असें माझ्यानें ह्मणवत नाहीं. पण, ह्याच्या उलट मात्र उदाहरणें आहेत. आर्मिनीयांतले दंगे, क्रीट येथील बंड, ईजिप्तचा घोंटाळा, आणि सध्यांची चिनांतली लढाई हीं सगळीं त्याचींच उदाहरणें आहेत. त्यांवरून तुह्मां ख्रिस्ती धर्मोपदेशकांविषयीं चांगलें मत व्हावें असें कांहीं नाहीं. आतां, आमच्या लोकांमध्यें ज्ञानाचा, व्यापाराचा आणि सुधारणेचा प्रसार करण्याविषयीं ह्मणाल, तर तुह्मी आमची मसलत ऐका. तुमच्या मनांत खरोखर जर अफगाण लोकांस शास्त्रें आणि कलाकौशल्य शिकवायाचें असेल, आणि त्यांस सुधारावयाचें असेल, तर, त्याकरितां तुह्मांस एवढे श्रम करण्याची, एवढी मेहनत घेण्याची, आणि आपले जीव संकटांत घालण्याची मुळींच गरज नाहीं. आपले देश सोडा, मुलें-माणसें मागें टाका, गलबतांत बसून इतके दूर या आणि

येथें रखडत बसा, हें तुह्मीं कशाला करावें? पैसा तुह्मीं आमच्या मौलवींच्या स्वाधीन करा, ह्मणजे ते अफगाण लोकांस धर्मशास्त्र पढवितील, नीति शिकवितील, शास्त्रें शिकवितील, व्यापारधंदे शिकवितील, चांगल्या रीतिभाती शिकवितील, त्यांना सन्मार्गास लावितील, आणि मोक्षप्राप्तीची जवळची वाट दाखवितील. आणि हें सगळें ते तुमच्यापेक्षां चांगलें करतील, आणि तें लोकांत विशेष चांगलें वाणेल. ह्या उत्तरांत अर्थ किती खोल आहे हें सहज लक्षांत येईल.

हिंदुस्थानचे वायव्येकडच्या सरहद्दीवरचे आफ्रिडी नांवाचे रानटी लोक उठले होते, त्यांवर आमच्या सरकारानें सैन्य पाठविलें होतें, त्या सुमारास फ्रांक मार्टिन ह्या नांवाचे कोणी गृहस्थ अफगाणिस्थानांत होते. त्यांनीं इ० स० १८९७ च्या सप्तंबरच्या २० व्या तारखेचें पत्र पायोनियर पत्रकर्त्यास पाठविलें आहे. त्यांत असें लिहिलें आहे:—“ असे अमीर आजपर्यंत अफगाणिस्थानांत पूर्वी कधीं झाले नाहींत. ह्या देशांतील लोक एककल्ली आणि तामसी आहेत. ते बंडें करते भले, आणि अमीरसाहेब तीं मोडते भले! मी त्यांच्या दर्शनास गेलों होतों तेव्हां ते ह्मणाले, ‘ सध्या जो हद्दामुल्ला उठला आहे, तो शेरअल्लींच्या वेळीं फार शेफरलेला होता, तो आपले लोक बरोबर घेऊन पाहिजे तें करी. त्याला कोणी ब्र बोलत नसे. परंतु, आह्मी गादीवर बसल्यावर त्याला पकडून, कैदेंत टाकिलें होतें. पण तो तेथून निसटून गेला आहे. त्यानेंच शिनवारी लोकांस उठवून आह्मांला फार त्रास दिला. त्यांतले चार हजार लोक पडले, तेव्हां तो दंगा शमला. असें असतां, सध्याच्या दंग्यांत आमचें अंग आहे, असें हिंदु-

स्थांनांतले लोक ह्मणतात, ह्याचा अर्थ आह्मांस कांहीं कळत नाहीं........हे बंडखोर लोक लबाड आहेत. विनाकारण आमचें नांव पुढें करितात! अशा गाढवांशीं लागण्यापेक्षां, आमच्या लोकांस चांगल्या गोष्टी शिकविणें, त्यांस सुधारणें, त्यांजवर शांतपणें राज्य करणें हीं कामें आह्मांला करावयास फार चांगलीं आहेत.' हे अमीरसाहेब गादीवर बसले, तेव्हां देशांतले सरहद्दीवरचे रस्ते अतिशयित वाईट असून ते चोरांनीं भरलेले असत. एकद्यादुकद्यास जाण्याची सोय नव्हती. परंतु, आतां चोहींकडे सडका उत्तम प्रकारच्या होऊन, कोणाही एकाद्या माणसानें देशांत खुशाल पाहिजे तिकडे जावें, असें झालें आहे. आणखी, ते ह्मणाले कीं 'माझ्या लोकांत स्वस्थता स्थापित करणें, त्यांना सुधारणें, माझ्या देशाच्या ठायीं सुखोत्पादक असें सामर्थ्य अद्याप गर्भित राहिलें आहे तें उदयास आणणें, आणि तद्द्वारा माझ्या देशास जगांतल्या उत्तम विद्याचारसंपन्न राष्ट्रांच्या पंक्तीला बसविणें हें काम मला करावयाचें आहे.' ह्या भाषणावरून असें दिसतें कीं, स्वजनकाम त्यांस फार आवडतें."

ह्याच आफ्रिडी लोकांकडून कांहीं मोठमोठीं माणसें अमीरसाहेबांचा आश्रय मागण्याकरितां जलालाबादेस आलीं होतीं. त्यांस अमीरसाहेबांनीं काबुलास न येऊं देतां, त्यांच्या विनंतीपत्रांस उत्तर दिलें. त्यांत असें आहे:—"इंग्लिश सरकार आमचे दोस्त आहेत. त्यांचे पाहुणे ह्मणून आह्मी त्यांस भेटण्यास रावळपिंडीस गेलों, तेव्हां तुमच्या खैबर घाटांतून गेलों. तेव्हां तुह्मी इंग्लिश सरकाराविषयीं जर कांहीं आह्मांपाशीं बोललां असतां तर त्या संबंधानें आह्मीं हिंदुस्थानच्या व्हाइसरायसाहेबांजवळ

कांहीं गोष्ट काढिली असती. तसेंच सर मार्टिमर डूरंड हेही त्याच घांटानें सरहद्द ठरविण्याकरितां इकडे आले, त्यांपाशीं ही तुह्मीं कांहीं सांगितलें नाहीं. इंग्लिश सरकाराशीं आह्मी तह केला आहे. त्या तहनाम्याबाहेर आजपर्यंत ते कधीं वागले नाहींत. आह्मी त्यांस वचनें दिलीं आहेत, तीं आह्मांस मोडतां कामास नयेत. आपल्या कुराणांत सांगितलें आहे, ‘ बोलल्या प्रमाणें वाग; बोलल्याप्रमाणें वागणें हें मुसलमानांचें अत्यंत पवित्र आणि अगदीं पहिलें कर्तव्य आहे.’ ह्यावरून पहा कीं, वचन पाळणें हें फार मोठें व्रत आहे. आह्मी आपलें वचन कदापि मोडणार नाहीं. इंग्लिश सरकारानें जर आपलीं सगळीं वचनें बरोबर पाळिलीं आहेत, तर मीं आपलीं वचनें काय ह्मणून मोडावीं? तुह्मीं काय केलें आहे, तें तुह्मी निस्तरा. ह्या कामांत तुमचा आमचा कांहीं संबंध नाहीं. तुह्मी पाहिजे तें करा. तुह्मांवर आमचा विश्वास नाहीं. आह्मी, शेर अल्लीप्रमाणें, तुमच्याक- रितां, दुसऱ्यांस दुखवूं असें मनांत देखील आणूं नका. आह्मी इंग्लिश सरकाराशीं लढायास उभें राहावें, आणि तुह्मीं मजा पाहावी असें तुमच्या मनांत आहे, पण, लक्षांत ठेवा, आह्मी तें कधीं करणार नाहीं. ”

---

# भाग नववा.

## व्यापारधंद्यास उत्तेजन.

राजा हा पिता आहे, आणि प्रजाजन पुत्र आहेत. हा

संबंध फार प्राचीन आहे. ह्याचें वर्णन पुराणांतरीं पुष्कळ आढळतें. तें राजांच्या बोधास फार उपयोगीं पडण्यासारखें असतें. किंबहुना तें राजांकरितां लिहिलेलें असतें, असें ह्मटलें तरी चालेल. परंतु, त्यांत दुःखाची गोष्ट ही आहे कीं, त्या बोधाचा उपयोग मनापासून करणारे असे भूपति फारच थोडे आढळतात. पण तसे आढळले ह्मणजे उदारबुद्धि जनांस फार आनंद होतो. तसे भूपति अमीर अबदुल रहिमान हे होते. हें त्यांच्या कृतीवरून, आणि विशेषेंकरून त्यांच्या भाषणावरून दिसून येतें. अमीरसाहेबांनीं एका ठिकाणीं ह्मटलें आहे:—"धडाशिवाय शिराचें चालूं नये, शिराशिवाय धडाचें चालूं नये, हातांशिवाय बोटांचें चालूं नये, बोटांशिवाय हातांचें चालूं नये, पोटाशिवाय अवयवांचें चालूं नये, अवयवांशिवाय पोटाचें चालूं नये, अशी देहाची रचना परमेश्वरानें केली आहे, हिच्या अवलोकनानें असा बोध होतो कीं, जगांतल्या व्यवहारांत, माणसांचेंही परस्परावलंबन असेंच असून, त्याशिवाय माणसांचें चालूं नये, असा ईश्वरी संकेत आहे. मोठा सार्वभौम राजा असला, तरी, त्याला सुख होण्यास गौंडी, सुतार, कोष्टी, चाह्मार, आचारी, पाणक्ये, ह्या सर्व प्रकारच्या लहानमोठ्या दरजाच्या माणसांचें साह्य आवश्यक आहे. त्याप्रमाणेंच हें जग उत्पन्न करण्यास देवास सात दिवस लागले असें बैबलांत सांगितलें आहे, त्यावरून असा बोध घ्यावयाचा कीं, ह्या मोठ्या गोष्टी उतावळीनें कधीं व्हावयाच्या नाहींत. त्या सावकाश केल्या पाहिजेत. त्यांविषयीं फार घाई करितां कामास नये, तसें त्यांत कांहीं कमी वाटल्यास धैर्य सोडतां

कामास नये." अगदीं शब्दशः खरें आहे.

आणखी अमीर साहेबांची अशी खातरी होती कीं, कोणत्याही राष्ट्राचें महत्त्व जें आहे, तें केवळ त्यांतल्या माणसांच्या योग्यतेच्या मोठेपणावर अवलंबून आहे. त्याविषयीं त्यांनीं ह्मटलें आहे:—" राज्यामध्यें जितकीं जितकीं विद्वान, अनुभव घेतलेलीं, बुद्धिवान, आणि उपयोगी माणसें असतात, तितकें तितकें तें राज्य अधिकआधिक अभिवृद्धिपात्र आणि कल्याणमय होतें. ह्या करितांच चांगल्या कर्त्या माणसांची चाहा राजद्वारीं असते."

राजे हे परमेश्वराचे हस्तक आहेत, ह्मणून, परमेश्वर जसा, रूपरंग जातधर्म न ओळखितां, माणसांस, त्यांच्या आंगाच्या गुणांकडे लक्ष देऊन वागवितो, तसें राजांनीं सर्व लोकांस केवळ त्यांच्या गुणांप्रमाणें वागविलें पाहिजे, रूपरंगजातिधर्माकडे लक्ष देतां कामास नये, असा आग्रह अमीरसाहेब वारंवार करीत. आणखी असें सांगत कीं, जे कोणी राजांच्या चाकरीस राहतात, त्यांस राजांनीं अगदीं निष्पक्षपातानें वागविलें पाहिजे, सर्वांस सारखे हक्क दिले पाहिजेत, आणि सर्वांस आपल्या घरांतल्या मुलांप्रमाणें वागविलें पाहिजे.

तसेंच लोकव्यवहाराविषयीं त्यांनीं वारंवार ह्मणावें:— "दुसऱ्यांचे दोष आणि स्वतःचे गुण पाहाण्यांत आपली सर्वांची दृष्टि फार तीक्ष्ण असते, हा मोठा चमत्कार आहे. परंतु दुसऱ्यांचे गुण आणि आपले दोष पाहाण्याच्या कामांत आपली दृष्टि लागलीच मंद होते. राज्यांतल्या जागा देण्याच्या व्यवस्थेंत हा प्रकार पुष्कळ आढळतो. ह्या कामांत मोठमोठीं शाहाणीं ह्मणविणारीं राष्ट्रें चुकतात. पण, माझेकडे

तसें होत नाहीं. मी तसें होऊं देत नाहीं, ह्याचा मला अभिमान आहे. जे कोणी परके लोक माझ्या राज्यांत चाकरीस राहिले आहेत, त्यांतले कितीएक लोक माझ्या आप्तांपेक्षांही मोठमोठ्या कामावर नेमलेले आहेत. आमचे मुख्य चिटणीस, लष्कराच्या खर्चाचा हिशेब ठेवणारे, राज्याचे मुख्य फडणीस, मुख्य खजीनदार, जमीनबाबीचे सरसुभे, आमचे स्वतःचे आणि आमच्या कुटुंबाचे वैद्य हे सगळे परक्या पंथाचे आहेत, माझ्या पंथाचे नाहींत." आणखी, आपल्या पश्चात् आपल्या गादीवर जे कोणी बसतील, त्यांनीं, देशाच्या कल्याणाकरितां ह्याच पद्धतीनें वागावें, असें त्यांनीं ह्मटलें आहे.

उद्योगाच्या फलावर ह्यांची निष्ठा फार मोठी होती. जगांत जें काय सुख होत आहे, तें सगळें उद्योगाचें फल आहे, असें त्यांस वाटे. त्यांच्यांत सादी ह्मणून एक मोठा नामांकित कवि होऊन गेला, त्याचें एक पद्य ह्यांच्या तोंडीं असे. त्याचें तात्पर्य असें:—

### अभंग.

अरे बाबा नाहीं सुख सोशिलीयाविणें दुःख
दुःख सोशीतो जो नर सुख शोधी त्याचें घर.

ह्मणून ते नेहमीं स्वतः उद्योग करीत असत, दुःख सोशीत असत, आणि दुसऱ्यांस उद्योग करायास आणि दुःख सोसायास उपदेश करीत असत.

आपल्या प्रजाजनांस उद्योगी करावें, आणि त्यांस सर्व प्रकारचे कामधंदे शिकवावे अशी अमीर साहेबांची फार इच्छा होती. त्याकरितां, गादीवर बसल्यापासून त्यांचे उद्योग एक

सारखे चालले होते. त्यांचे लोक अगदीं अज्ञानी आणि रानटी होते, त्यांस कांहींएक ज्ञान नव्हतें, त्यांचे ठायीं कलाकौशल्य कसें तें मुळींच नव्हतें, तें त्यांस शिकविण्यास अमीरसाहेबांनीं परदेशांतले चागले हुशार आणि कलाकौशल्यांत प्रवीण असे लोक मोठमोठे पगार देऊन आणिले, आणि त्यांजकडून अफगाण लोकांस नानाप्रकारच्या कला शिकविल्या. तेणेंकरून अफगाणिस्थानाचा फार फायदा झाला आहे. पुष्कळ लोकांस असें वाटतें कीं, परकीय लोकांस आपल्या देशांत आणणें बरें नाहीं. ह्या कल्पनेचें खंडण करण्याकरितां, परके लोक अफगाणिस्थानांत बोलावून आणण्याचीं कारणें त्यांनीं सांगितलीं आहेत. तीं विचार करण्यासारखीं आहेत.

पहिलें कारण असें आहे कीं, कलाकौशल्य शिकण्यास आपले लोक परदेशांत पाठविण्यास खर्च मनस्वी लागतो. तो करण्यास आईबापांस सामर्थ्य नाहीं, तसें अफगाण सरकारालाही सामर्थ्य नाहीं.

दुसरें कारण, आपल्या मुलांस विद्या शिकण्याकरितां हजारों कोसांवरच्या परमुलखांत पाठविण्यास आईबापें तयार नाहींत.

तिसरें कारण, अफगाण लोकांना दुसरी कोणतीही भाषा येत नाहीं. आणि ती आधीं शिकावयाची ह्मटलें ह्मणजे त्यांत फार वर्षें जाणार. आणखी, इतकीं वर्षें जाऊनही तिच्या द्वारें विषय बरोबर कळावयाचा नाहीं, अर्धवट कळावयाचा. ह्मणून, अमीरसाहेबांनीं मीरमुनशी सुलतान महंमदखान ह्यांच्या द्वारें इंग्लंडादि परदेशांतल्या कलाकौशल्यभिज्ञ लोकांस, चांगले पगार

देऊं करून अफगाणिस्थानांत बोलाविलें. तसेच तिकडच्या मोठमोठ्या कारखान्यांचे रिपोर्ट मागविले. आणि तिकडच्या तद्विषयक कितीएक ग्रंथांचीं भाषांतरें फारशी भाषेत करविलीं. त्यांतलीं कितीएक छापून काढिलीं आहेत.

चौथें कारण, अमीरसाहेबांस असें वाटत होतें कीं, विद्या किंवा कलाकौशल्य संपादण्याकरितां ह्मणून आशिया खंडांतले जे तरुण लोक युरोपांत जातात, ते तिकडे मद्यपानादि दुर्व्यसनें शिकून इकडे येतात. पुष्कळांची धर्मावरची श्रद्धा नाहींशी होते.

पांचवें कारण असें कीं, कोणत्याही शास्त्रीय विषयाचें शिक्षण स्वभाषेंत झाल्यावांचून तें शास्त्र लोकांस यावयाचें नाहीं.

हीं कारणें अगदीं यथार्थ आहेत असें वाटतें. हीं नेहमीं आपल्या दृष्टीपुढें ठेवून अमीरसाहेब आपल्या लोकांस असा आग्रह करीत असत कीं, शिकवेल तितकें लवकर शिका, आणि पक्कें शिका; त्यांत कच्चेपणा राहूं देऊं नका, ह्मणजे प्रसंगीं तुमचे शिक्षक एकदम सोडून गेल्यास तुह्मांस भिण्याचें कारण नाहीं. आणखी, परदेशांतले शिक्षक चाकरीस ठेवतांना त्यांजपासून जो करारनामा अमीरसाहेब लिहून घेत, त्यांत एक मुख्य कलम असें असे कीं, आमच्या साह्यावांचून आणि देखरेखीवांचून आमच्या विद्यार्थ्यांस आपलें काम उत्तम प्रकारें करितां येऊं लागेपर्यंत आह्मी नोंकरी सोडणार नाहीं. अशा प्रकारच्या कलमाचा उपयोग फार होतो. कारण, ह्याच्या भयानें ते शिक्षक आपल्या हाताखालच्या लोकांस आपली विद्या लवकर लवकर शिकवितात, आणि ती

चांगली पक्की शिकावितात; ह्मणजे त्यांस स्वस्थपणें आपल्या घरीं जातां येतें. ह्या पद्धतीनें अफगाणिस्थानाला पुष्कळ लाभ झाले आहेत. पूर्वी जे कारखाने अगदीं परकीय लोकांच्या स्वाधीन करावे लागले होते, ते कारखाने, अगदीं स्वतंत्रपणें, उत्तम रीतीनें अफगाण लोक चालवूं लागले आहेत.

आपल्या देशांत कारखाने चालू करावयाचें एवढेंच नुसतें राजाच्या मनांत येऊन बस होत नाहीं. त्याला योजना लागते. अमीरसाहेब ह्या संबंधानें ह्मणतः—"हत्ती खरीद करण्याच्या विचाराच्या आधीं, त्याच्या खाण्यापिण्याचा आणि त्याला बांधण्यास तबेला लागेल त्याचा विचार केला पाहिजे. त्याप्रमाणेंच, मोठमोठीं यंत्रें विकत घेण्याच्या अगोदर, तीं यंत्रें चालू ठेवण्यास काय काय साहित्य पाहिजे, ह्याचा विचार करणें आवश्यक आहे. आह्मांस दोन प्रकारच्या यंत्रांची फार आवश्यकता वाटत होती; १—लढाईचीं हत्यारें आणि लढाईचें साहित्य तयार करावयाचीं यंत्रें; आणि २-खाणींतून धातु, कोळसा, मीठ, इत्यादि खानिजें बाहेर काढण्याचीं यंत्रें. परंतु, हीं दोन्ही प्रकारचीं यंत्रें एकदम विकत घेण्यास रकम फार लागूं लागली. तितकी आमच्या खजीन्यांत नव्हती. परंतु, आमच्या देशांत लढाया चालल्या होत्या व आणखी चालू होतील असें वाटत होतें, आणि त्यांच्या साहित्याची फार आवश्यकता वाटली, ह्मणून, लढाईचीं हत्यारें आणि काडतुसें वगैरे तयार करण्याचीं यंत्रें आधीं घेतलीं. आणि दुसऱ्या प्रकारच्या यंत्रांस चालू ठेवण्यास कापूस लोखंड वगैरे साहित्य पाहिजे होतें, तें तयार नव्हतें, ह्मणून त्यांचा विचार त्या वेळीं तसाच रहित केला."

अमीरसाहेबांस लहानपणापासून कारखान्यांचा नाद असे. ते बालपणीं आपल्या वडिलांच्या हत्यारांच्या कारखान्यांत काम करीत असत, हें मागें सांगितलेंच आहे. आणि त्याच प्रकारच्या उद्योगाची आवश्यकता त्यांस पडली. तेव्हां त्यांस आनंद व्हावा हें साहाजिक आहे. आणखी त्यांत हे रशियाच्या आश्रयास होते, तेव्हां तिकडे, सोनारकाम, मिन्याचेंकाम, मुलाम्याचेंकाम, कातडीं रंगविण्याचें काम, इत्यादि कामें ते शिकले होते. त्या मुळें ह्या उद्योगधंद्यांच्या व्यवसायांत त्यांची विशेष गति झाली. आणि त्यांस पुष्कळ कठिण गोष्टी सोप्या वाटूं लागल्या.

तरी, देशांतल्या धामधुमीमुळें कितीएक दिवसपर्यंत अमीरसाहेबांस ह्या विषयाकडे चांगलेंसें लक्ष पुरविण्यास झालें नाहीं. थोडेंथोडें काम त्यांनीं चालू केलें होतें. परंतु, कोणी चांगला शिकविणारा मिळाला नव्हता, त्यामुळें तें रेंगाळत चाललें होतें. इतक्यांत, ह्मणजे, इ० स० १८८९ त ते लार्ड डफरिन ह्यांच्या मुलाखतीकरितां रावळपिंडीस आले. तेव्हां तेथें, त्यांच्या आगतस्वागताकरितां विजचे दिवे लाविले होते, त्या कामावर जीरोम ह्मणून कोणीएक फ्रेंच एंजीनियर होते, त्यांकडे अमीरसाहेबांची नजर गेली. त्यांनीं त्यांस आपल्याबरोबर काबुलास नेऊन त्यांस आपले सगळे विचार सांगितले. आणि त्यांजकडून, विलायती यंत्रांच्या यादी मागवून, त्यांच्या सल्ल्यानें, तेथें, भोकें पाडण्याचें यंत्र, कापण्याचें यंत्र, ओतकाम करण्याचें यंत्र इत्यादि कांहीं यंत्रें वाफेच्या जोरानें चालणारीं अशीं मागविलीं, आणि त्यांच्या खरेदी-करितां १,५१,००० रुपये बरोबर देऊन, त्यांस कलकत्त्यास

पाठविलें. त्यांनीं तीं खरेदी बरोबर करून काबुलास पाठवून दिलीं, आणि अमीर साहेबांच्या सांगण्याप्रमाणें त्या यंत्रांबरोबर इकडचे दोन माहीतगार कारागीरही पाठविले. पण जीरोम हे स्वतःच परत काबुलास गेले नाहींत, आणि त्यांचें पुढें काय झालें, ह्याचा मागमोसही त्यांस लागला नाहीं. ह्याचें अमीरसाहेबांस आश्चर्य वाटलें. आणि ते गृहस्थ फ्रेंच होते, तेव्हां त्यांत कांहीं राजकारणाची तर छाया नसेलना, असाही थोडा संशय त्यांस आल्याशिवाय राहिला नाहीं.

यंत्रें जाऊन काबुलास पडलीं. परंतु तीं चालविण्यास एंजिनियर नसल्यामुळें ती एक रिकामी अडचण झाली. त्या कामांत इतका पैसा गुंतल्याचें अमीरसाहेबांस फारसें वाईट वाटलें नाहीं. कां कीं, त्यांत कांहीं नासून कुजून फुकट जात नव्हतें. परंतु, " हा एवढासा लहान कारखाना देखील आह्मांला चालू करतां येईना, ह्मणून लोक आह्मांला हंसूं लागले, ह्याचें आह्मांस फार अवघड वाटलें, " असें अमीर साहेबांनीं ह्मटलें. तरी, त्यांनीं तेथेंच पुढें कुराणांतलें वचन असें दिलें आहे कीं, " धीर सोडीत नाहींत त्यांच्या सन्निध परमे- असतो. " ह्यावर त्यांचा पूर्ण विश्वास होता.

जीरोम खचीत येत नाहींत असें झाल्यावर अमीरसाहे- बांनीं हिंदुस्थान सरकारच्या दरबारांतले आपले वकील अमीर अहमदखान ह्यांस लिहून पाठवून साल्टर पैन ह्या एंजिनियरांस काबुलास आणिलें. ते इ० स० १८८७ त दाखल झाले. ह्या एंजिनियरांस काबुल शहराजवळच अलम- गंज ही जागा दिली, आणि तेथें कारखाने घालण्याकरितां इमारती बांधल्या. तेथें यंत्रें चालू झालीं. पैनसाहेबांखेरीज

आणखीही कितीएक इंग्लिश लोक यंत्रें चालविणारे एंजिनियर अमीरसाहेबांनीं ठेविले, आणि कारखाने मोठ्या झपाट्यानें चालविले. तें पाहून त्यांस फार संतोष झाला. पैनसाहेबांचें काम त्यांनीं पाहून एकदां ह्मटलें, " माझ्या जन्मांत आजचा हा दिवस फार सुखाचा आहे. ज्या संस्थेच्या योगानें अफगाणिस्थानास मोठें वैभव प्राप्त व्हावयाचें आहे, त्या संस्थेचा पाया माझ्या दृष्टीस पडला आहे. ह्या संस्थेच्या पूर्णतेस तीन गोष्टी पाहिजेत आहेत; देवाची कृपा, माझें द्रव्य आणि तुमचें चातुर्य. तुमचें चातुर्य आणि देवाची कृपा ह्यांचा कांहींएक उपयोग माझ्या द्रव्यावांचून व्हावयाचा नाहीं; देवाची कृपा आणि माझें द्रव्य ह्यांचा उपयोग तुमच्या चातुर्याशिवाय व्हावयाचा नाहीं; आणि तुमचें चातुर्य आणि माझें द्रव्य ह्यांचा उपयोग देवाच्या कृपेशिवाय व्हावयाचा नाहीं " हे उद्गार लक्षांत ठेवावयासारखे आहेत. पैन साहेबांनीं तोफा व बंदुका ओतण्याचें काम, आणि काडतुसें करण्याचें काम काबुली लोकांस शिकविलें. १८९३ त त्यांनीं पन्नास मोठ्या तोफा ओतविल्या, कारखान्याजवळ एक लहानशी आगगाडी चालू केली, आणि विद्युत्प्रकाशही प्रचारांत आणिला. हें सगळें पाहून अमीर साहेब त्यांवर फार खूष झाले. हे इंग्लिश लोक चाकरीस ठेवण्याच्यासंबंधानें अमीरसाहेबांनीं ह्मटलें आहे कीं, "हे इंग्लिश लोक कामावर घेण्यांत आमचे दोन उद्देश होते. पहिला उद्देश हा कीं, आपल्या लोकांस त्यांजकडून चांगली विद्या मिळावी. आणि दुसरा उद्देश हा कीं, अफगाण लोक आणि इंग्लिश लोक ह्यांच्यामध्यें बहुत दिवसांपासून फार द्वेष आहे तो, नित्याच्या सहवासानें मनें मिळून, नाहींसा

व्हावा, आणि अफगाण सरकार व इंग्लिश सरकार ह्यांचें जसें सख्य आहे तसें, नित्याच्या सानिध्याच्या योगानें, अफगाण लोक आणि इंग्लिश लोक ह्यांचें सख्य व्हावें."

पैन साहेबाच्या मागून ओमिआरा साहेब काबुलास आले, हे दंतवैद्य होते. हे अमीरसाहेबांस नवे दांत बसविण्याकरितां बद्धया आणविले होते. त्यांनीं असें लिहिलें आहे कीं, "ही दांतांची कौळी, भरदरबारांत, अमीरसाहेब तोंडांतून बाहेर काढीत, चांगली घांसून साफ करवीत, आणि पुनः लागलीच तोंडांत बसवीत, तो सगळ्या लोकांस मोठा चमत्कार वाटत असे." हे साहेब बरेच दिवस काबुलांत राहिले होते. ह्यांच्या हाताखालीं अमीरसाहेबांनीं सुफी अबदुलाहक ह्या नांवाचा एक तरुण माणूस दिला, आणि त्यास दंतविद्या शिकवावयास त्यांस सांगितलें. आणखी त्या तरुण माणसास त्यांनीं अशी तंबी देऊन ठेविली कीं, तूं जर ती विद्या ते साहेब निघून जाण्याच्या आधीं चांगली शिकलास नाहीं, तर मी तुला शिक्षा करीन. त्या शिक्षेच्या धास्तीनें ह्मणा, किंवा त्या दंतवैद्यास अफगाणिस्थानांतून लवकर निघून जायाचें होतें ह्मणून ह्मणा, तो सुफी अबदुलाहक ती विद्या अगदीं लवकर शिकला, आणि दांत बसविणें, दुखरे दांत काढणें, इत्यादि सगळें काम तो अगदीं त्या साहेबांसारखें करूं लागला. तेव्हां त्या साहेबांस चांगलें बक्षीस दिलें. आणि ते साहेब गेल्यावर त्यानें ती विद्या आणखी दुसऱ्या लोकांस शिकविली. तिचा फार उपयोग झाला. दांत बसविण्यास आणि काढण्यास अफगाण लोकांस बाहेर देशीं जावें लागत असे, तें त्यांस आपल्या देशांत राहून करून घेतां येऊं लागलें

मध्यंतरीं पैन साहेब सत्रा महिन्यांच्या रजेवर विलायतेस गेले होते. तरी, त्यांच्या हाताखालच्या अफगाणी माणसांनीं ते सगळे कारखाने अगदीं त्यांच्या प्रमाणें चालविले. दिवसें-दिवस यंत्रविद्येंत लोकांची मति केवळ नित्याभ्यासानें अधि-काधिक प्रवेश करूं लागली. त्यांस नवनव्या कल्पना सुचूं लागल्या. तसतसे अनेक पदार्थ तयार करण्याचे कारखाने अमीरांनीं हळू हळू वाढविले, आणि त्या संबंधाचीं यंत्रेंही आणवून तीं चालू केलीं. बंदुका, तोफा, काडतुसें, दारू, बूट, जोडे, साबण, मेणबत्या, इत्यादि पदार्थ तयार होऊं लागले. टिकिटें छापूं लागले. टांकसाळेंत नाणें पाडूं लागले. कातडीं रंगवूं लागले. शेतकीचीं औतें विलायतेच्या धर्तीचीं करूं लागले. लोहारकाम करूं लागले. तोफा ओतूं लागले. तरवारी तयार करूं लागले. बंदुकीच्या गोळ्या आणि तोफांचे गोळे ओतूं लागले. आणि हीं सगळीं कामें वाफेच्या यंत्रांच्या जोरानें होऊं लागलीं.

अफगाण लोक फार अडाणी होते. त्यांच्यांत आज्ञान फार होतें. आणि त्यांच्या मनांत विलक्षण समजुती भरल्या होत्या. त्यामुळें कामकाजामध्यें यंत्रांचा उपयोग चालू करण्यास, आरंभीं आरंभीं, अमीर अबदुलरहिमानांस अतिशयित अडचणी सोसाव्या लागल्या. कां कीं, त्यांचा संतोष राखून राज्याचें काम चालवावयाचें होतें. ह्याचा एक हास्यास्पद प्रकार त्यांनीं कोठें सांगितला आहे. तो असा:—"आह्मी रावळपिंडीस जावयास निघण्याच्या सुमारास, आमची तसबीर काढण्याकरितां, एका फोटोग्राफ-रानें, आह्मी बसलों होतों तेथें समोर, क्यामरा आणून

लाविला. तें पाहून आमच्या दरबारांतले एक मोठे वृद्ध कामदार पटकर पुढें आले आणि चटकर त्या क्यामराच्या तोंडावर हात ठेवून ह्मणाले, ‘ महाराज, आपणांस कळत नाहीं. ही एक नवीन प्रकारची तोफ आहे. ती आपणांवर लाविली आहे ! ’ हें ऐकून आह्मांस मनस्वी हंसूं आलें, आणि क्यामरा ह्मणजे काय हें त्यांस समजून देण्यास जरी आह्मीं आपली पराकाष्ठा केली, तरी त्यांच्या मनांत तें भरेना. आमचे सगळे श्रम फुकट गेले. ”

त्याप्रमाणेंच कारखाने चालू करून यंत्रांच्या योगानें पदार्थ तयार करूं लागले, तेव्हां लोक असेंच बोलूं लागले. त्यांनीं अमीरसाहेबांस असें सांगितलें कीं, यंत्रांपेक्षां हातानें वस्तु फार चांगल्या तयार होतात. कारखान्यांत काम करीत होते, त्यांविषयीं त्यांनीं असें पिकविलें कीं, हे सरकारचे शत्रु आहेत, आणि यंत्रांच्या किमतीच्या रूपानें ह्यांनीं पैशाचा मोठा प्रवाह देशाबाहेर चालविला आहे. ह्यांसारख्या मूर्खपणाच्या कंडयांनीं अमीर साहेबांचें डोकें उठून गेलें. तरी, त्यांनीं आपला निश्चय तिळभरही ढळूं दिला नाहीं. कांकीं, त्यांस बंदुका, काडतुसें इत्यादि लढाऊ सामानाची गरज फार होती हें एक, आणि त्यांस ठाऊक होतें कीं, ह्या व्यवहाराची संवय लोकांस लागल्यावांचून त्यांच्या डोक्यांतलें अज्ञान नाहींसें व्हावयाचें नाहीं, हें दुसरें.

ह्या कारखान्यांतल्या बहुतेक सगळ्या कामांची माहिती अमीर साहेबांनीं स्वतः करून घेतली होती. ह्मणून, त्यांस कांहींएक अडत नसे. जरा कोणाला कांहीं कळेनासें झालें, ह्मणजे ते स्वतः तेथें जाऊन तें काम कसें करावयाचें तें

त्याला करून दाखवीत. हें अगदीं पीटर धि ग्रेट ह्यांसारखें होतें.

इ० स० १८९३ त लार्ड ल्यांडस्डौन ह्यांनीं जेव्हां अमीरांच्या तोफा हिंदुस्थानांत अडकवून ठेविल्या, तेव्हां कारखान्यांतल्या लोकांनीं अशी तक्रार काढिली कीं, आमच्या-पुढें नमुना असल्याशिवाय आह्मांस त्या नवीन तऱ्हेच्या तोफा ओतितां यावयाच्या नाहींत. तेव्हां, त्या तोफा ओत-ण्याची रीति इंग्रजींत सांगितली होती, तिचें भाषांतर त्यांनीं फारशी भाषेंत अगदीं सहज कळे असें करविलें, आपण स्वतःच्या कल्पनेनें त्यांचें मोजमाप दिलें, आणि त्यांची समजूत बरोबर घालण्याकरितां, त्या तोफेचे अवयव वे-गळे वेगळे लांकडाचे करविले, ते जुळून दाखविले, आणि तींतून लांकडाचा गोळा उडवून दाखविला, तेव्हां त्यांची चांगली समजूत पडली, आणि त्यांनीं तशा तोफा ओतिल्या. त्या इतक्या उत्तम झाल्या कीं, पुढें सरहद्दीच्या कमिशनाचे अध्यक्ष डुरांड साहेब आणि त्यांच्या बरोबरचे दुसरे साहेब लोक जेव्हां काबुलास येऊन त्या तोफा पाहूं लागले, तेव्हां, विलायती कोणत्या आणि काबुली कोणत्या, ह्या त्यांस ओळखूं येईनात, असें अमीरसाहेबांनीं लिहिलें आहे. ह्या सगळ्या कामांत इंग्रजींचें फारशी ज्यांनीं केलें, त्यांचें चातुर्य अमीरसाहेबांस विशेष दिसून आलें. त्यावरून त्यांनीं त्या मुनशींस १२००० रुपये रोख बक्षीस देऊन एक उत्तम बहुमोल पोषाकही बक्षीस दिला.

हे जे अगदीं नवे कारखाने अमीरसाहेबांनीं काढले, त्यांत सुमारें एक लक्ष माणसें काम करीत आहेत. ह्यावरून,

थोडक्या अवकाशांत अफगाणिस्थानाची गति यंत्रविद्येंत किती झाली, हें सहज लक्षांत येण्यासारखें आहे. ही सुधारणा तर झालीच. परंतु, ह्याशिवाय दुसरा एक फार मोठा लाभ झाला. तो असा कीं, लोकांच्या आंगांत एक नवी विद्या येऊन, त्यांस यंत्रांची योग्यता कळूं लागली. आणखी, ह्याही-पेक्षां एक विशेष हें झालें कीं, हीं जीं माणसें, कामधंदा नसल्यामुळें, पूर्वीं चोऱ्या, मारामाऱ्या, लुटालुटी करून कांहीं तरी मिळवून तें खाऊन, देशास उपद्रव देत असत, तीं माणसें, शांतपणें कारखान्यांत कामें करून इमानें इतबारें आपल्या पोटास मिळवूं लागलीं. ह्याविषयीं अमीरसाहेबांस फार संतोष झाला. त्या संबंधानें त्यांनीं लिहिलें आहे:— "आळशाला काम सांगण्यास सैतान उभें असतें. जो कोणी सदुद्योग करितो, त्याला देव प्रसन्न होतो." खरें आहे.

टांकसाळ काबुलांत पूर्वीपासून आहे. परंतु, तींत नाणें हातांनीं करीत असत, यंत्रांनीं पाडीत नसत. तीं नाणीं पाडण्याचीं यंत्रें ह्या अमीर साहेबांनीं आणवून, चालू केलीं. आणि तें काम माकडमॉट ह्या साहेबांकडून त्यांनीं काबुली लोकांस शिकविलें. हे साहेब कलकत्याच्या टांकसाळेंत पुष्कळ दिवस नौकर होते. त्यांनीं आपल्या सगळ्या युक्ति काबुली विद्यार्थ्यांस शिकविल्या. त्यांत ते फार लवकर तयार झाले. ते इतके कीं, नाणें पाडणेंच नव्हे, तर, नवीन छाप तयार करणें हें कठिण काम देखील त्यांस चांगलें येऊं लागलें. आणि सध्या सगळें काम तेच करीत आहेत. अफगाणिस्थानच्या सध्याच्या नाण्याच्या एका बाजूवर अमीरसाहेबांचें नांव आणि पदवी हीं छापलेलीं असतात. पदवीचा अर्थ

"राष्ट्राचा आणि धर्माचा प्रकाश" असा आहे. ही पदवी, त्यांस त्यांच्या प्रजाजनांनीं मोठ्या संतोषानें इ० स० १८९६ त समर्पिलेली होती. आणि दुसऱ्या बाजूवर अमीरसाहेबांचें राजचिन्ह खोदिलेलें आहे. ही टांकसाळ वाफेच्या यंत्रानें चालते. तींत दररोज ऐशीं हजारांपासून एक लाख पर्यंत नाणें पडतात.

हेनरी मार्टिनी काडतुसें तयार करण्याचा कारखाना अमीरसाहेबांनीं स्थापित करून, त्यावर मिडलटन साहेबांची नेमणूक केली. त्यांनीं तीं काडतुसें करण्याचें काम काबुली लोकांस उत्तम प्रकारें शिकविलें. आणि तो कारखाना आतां केवळ काबुली लोक स्वतंत्रपणें चालवीत आहेत. त्यांस दुसऱ्यांचें साह्य लागत नाहीं. एका दिवसांत दाहा हजार काडतुसें तयार होतात, आणि तितकी गरज लागल्यास ह्यांत दुप्पट काडतुसें ते तयार करितील, एवढी कारागिरी त्याचे आंगीं आली आहे.

आणखी कितीएक प्रकारच्या बंदुका, तोफा, गोळ्या, गोळे, काडतुसें, केपें इत्यादि युद्धोपयोगी साहित्य तयार करण्याचे कारखाने, त्या त्या विषयांतले प्रवीण युरोपियन लोक मिळवून आणून, त्यांच्याकडून काबुलांत अमीर साहेबांनीं चालू केले, आणि त्यांतलीं सगळीं लहान मोठीं कामें काबुली लोकांस शिकविलीं. ह्या संबंधी अमीर साहेबांनीं आपल्या चरित्रांत जी तपशीलवार हकीकत लिहिली आहे, तीवरून असें स्पष्ट दिसतें कीं, ह्या विषयाची माहिती त्यांस विलक्षण होती. एकाद्या मोठ्या युरोपियन योध्याचा लेख जसा असावा, तसा त्यांचा हा लेख वाटतो. ही इतकी माहिती

त्यांनीं केव्हां कोणा पासून मिळविली ह्याचें मोठें नवल वाटतें. ह्या संबंधाचे जितके इंग्रजी ग्रंथ ह्यांस युरोपांतल्या दुकानांत मिळाले, तितके तर त्यांनीं आणविलेच, पण जे दुकानांत मिळाले नाहींत, ते, इंग्लिश सरकारांत लिहून, त्यांच्या दप्तरांतून मागून नेले, आणि त्यांतल्या आवश्यक भागांचीं भाषांतरें फारशी भाषेंत करविलीं. केवढा उद्योग!

मद्यें तयार करण्याच्या भट्ट्या अफगाणिस्थनांत पूर्वीं ख्रिस्ती लोकांनीं घातलेल्या होत्या. पण त्यांत चांगलें मद्य तयार होत नसे. आणि तें पिण्याच्या योगानें लोकांस नानाप्रकारच्या व्याधि जडत असत. तरी, कांहीं लोक तें तसेंच पीत. ह्मणून, शुद्ध चांगलें मद्य तयार व्हावें अशा भट्ट्या ह्या अमीरांनीं चालू केल्या. त्यांत द्राक्षासव आणि ब्रांडी हीं मद्यें उत्पन्न करितात. तीं अगदीं युरोपियन मद्यांसारखीं होतात. आठ तासांत १५०० बाटल्या भराव्या, असें काम त्यांत चालतें. ह्या दारूविषयीं अमीर साहेबांनीं असें ह्मटलें होतें कीं, “ हीं मद्यें देशाच्या बाहेर पाठविण्याकरितां आणि मुसलमान नाहींत असे जे लोक अफगाणिस्थानांत आहेत त्यांस पिण्याकरितां तयार होतात.” ह्मणजे अफगाण लोक मद्यप्राशन करीत नाहींत अशी उक्ति ह्यांत गर्भित आहे. असा अभिमान असणें हें भूषण आहे.

यंत्रांचीं कामें चालण्यास कच्च्या मालाची फार अवश्यकता आहे, कच्चा माल जवळ नसला तर यंत्रें स्वस्थ पडून निरुपयोगी होऊन राहावयाचीं, हा विचार अमीर साहेबांच्या मनांत नेहमीं घोळत असे. आणि त्यांस असें वाटे कीं, कच्चया मालाकरितां परदेशांच्या तोंडाकडे पा-

हात राहणें हें बरें नाहीं. हें टाळिलें पाहिजे. ह्मणून कच्चा माल अफगाणिस्थानांत पुष्कळ तयार व्हावा, अशी योजना ते करीत असत. ह्याविषयीं त्यांचा लेख असा आहे:— "कच्चा माल परदेशांपासून विकत घेण्यांत जो पैसा खरचतो, तो देशाच्या बाहेर जातो. हाच माल जर अफगाणिस्थानांत पिकला तर तितका पैसा अफगाणिस्थानांत राहील, आणि तो अफगाण लोकांच्या उपयोगीं पडेल. ह्मणून, लोखंड, तांबें, कथील इत्यादि अशोधित धातु पृथ्वींतून खणून काढण्याची तजवीज योजिली आहे. आणि कालेंकरून हे पुष्कळ सांपडून आमच्या यंत्रांस चांगलें खाद्य मिळेल, अशी आशा आहे."

रंगीत कातडें शिपायांचे बूट, घोड्यांचीं खोगरें, यंत्रांचे पट्टे, इत्यादि कामांस फार लागतें, आणि तें बाहेरच्या देशांतून आणावें लागतें, असें अमीर साहेबांच्या लक्षांत येऊन, कातडें रंगविण्याचीं यंत्रें, हत्यारें आणि पदार्थ हीं बाहेरच्या देशांतून अफगाणिस्थानांत आणविलीं, आणि रंगविण्याचा कारखाना टास्कर नामक साहेबांकडून चालू करविला. त्यांनीं अझीम ह्या अफगाणास त्या कामांत उत्तम तरबेज केलें. तो आतां सगळें तें काम अगदीं इंग्लंडांतल्या कामाप्रमाणें करीत आहे.

इराणामध्यें हामाडन ह्मणून एक गांव आहे. तेथें कातडीं उत्तम रीतीनें रंगवितात, अशी आख्या आहे. तेथले तसले दोन कारागीर अमीरसाहेबांनीं काबुलास बोलावून आणिले, आणि त्यांजकडून तें काम त्यांनीं काबुली लोकांस शिकविलें. त्यांना तें चांगलें येऊं लागलें. लाहोरी कातड्यांविषयीं

त्यांनीं तसेच केलें. शिवाय ह्या कामाची बरीच माहिती त्यांना स्वत: रशियांत असतां झाली होती, तिचा उपयोग पुष्कळ झाला. अशा प्रकारें कातडीं कमावण्याचें आणि रंगविण्याचें काम काबुलांत चांगलें होऊं लागलें.

कातडीं कमावून रंगवून तयार झालीं. त्यांचे बूट आणि पट्टे रशियन तऱ्हेचे तयार करण्यास काबुली लोकांस शिकविण्यास अहमद ह्या नांवाचा उजबेग जातीचा माणूस ठेविला. तो मक्केच्या यात्रेस चालला होता. त्या विषयीं अमीरसाहेबांनीं असें लिहिलें आहे कीं, "तो आमच्या येथें राहाण्यास तयार नव्हता. त्याच्या मनांत लवकर एकदा यात्रा करावयाची होती. परंतु, मीं त्याला धर्मशास्त्रांतलीं वचनें वगैरे ह्मणून दाखवून असें समजाविलें कीं, मक्केस जाण्यापेक्षां मनुष्याच्या उपयोगीं पडण्यांत फार मोठें पुण्य आहे. आणखी, वारंवार प्रार्थना तोंडानें ह्मणत बसणें हा आळस आणि उद्योग चुकविणें आहे, उपवास करणें नुसतें अन्न वांचविणें आहे, परंतु परस्परांस साह्य करणें हीच खरी ईश्वरभक्ति आहे, असें एक साधुमत मीं त्याच्या मनांत भरविलें, तेव्हां तो राहण्यास कबूल झाला. आणि त्यानें आमच्या लोकांस तो धंदा शिकविला."

अमीर साहेबांच्या कुळांतलेच सरदार अमीरखान ह्मणून एक गृहस्थ हिंदुस्थानांत कांहीं दिवस ठेविले होते, ते परत काबुलांत आले होते. त्यांस बूट चांगले शिवतां येत होते. त्यांस हा धंदा करण्यास प्रथम फार संकोच वाटत होता. त्यांस अमीर साहेब ह्मणाले, "अजाण अफगाण लोकांस कांहीं वाटो, परंतु, राजकुळांतल्या पुरुषांस उद्योगाची लाज

कधींही वाटूं नये. त्यांत कांहीं हलकेपणा नाहीं. माणसास कोणतेंही काम करतां न येणें ही मोठी शरम आहे." हें बोलणें त्यांच्या मनांत ठसलें. आणि ते तो उद्योग करूं लागले. त्यांच्या मदतीस आणखी कांहीं माणसें अमीर साहेबांनीं दिलीं. तेव्हां तीं त्यांत तयार झालीं. आणि अफगाणिस्थानांत पुष्कळ चांगले बूट तयार होऊं लागले, आणि खोगरें, पट्टे, हेंही पाहिजेत तसे होऊं लागले. त्यांचा उपयोग लष्करांत आणि लोकांत होऊं लागून, पूर्वी, हें सामान खरीद करण्याकरितां लक्षावधि रुपये जे बाहेरच्या देशांत जात होते, ते काबूलचे काबुलांत राहूं लागले. अशा प्रकारचें सामान बाहेरच्या देशांतून अफगाणिस्थानांत येऊं देऊं नये, अशी बंदी अमीर साहेब करणार होते. त्या प्रमाणेंच, कच्चें कातडें, अफगाणिस्थानांतून बाहेर जाऊं देऊं नये, असाही ते हुकूम सोडणार होते. परंतु, अफगाणिस्थानाच्या सगळ्या गरजा अफगाणिस्थानास भागवितां येतात, उणें पडत नाहीं, असें होण्याची वाट ते पाहात होते. ह्या संबंधानें त्यांनीं ह्मटलें आहे:—"आमच्या देशाचें कातडें बाहेरच्या देशास जावें, आणि तें कमावून आणि रंगवून, त्यांनीं आमच्या देशास चौपट किंमतीस घ्यायास लावावें, ही मोठी शरमेची गोष्ट आहे."

साबण आणि मेणबत्या करण्याचे कारखाने लहान मोठ्या गांवांत थोडेथोडे चालू केले आहेत. ते सगळे हातानें चालवितात. त्यांस अद्याप यंत्रें लाविलीं नाहींत. अफगाणिस्थानांतले बहुतेक लोक मांसभक्षक असल्यामुळें तेथें जनावरांच्या चरबीस मुळींच तोटा नाहीं. आणि देशांत थंडी फार असल्यामुळें ती चरबी लवकर बिघडत नाहीं. ती

हे दोन्ही प्रकारचे पदार्थ करण्यास उपयोगीं पडते. हे पदार्थ तयार होऊं लागल्याच्या योगानेंही बाहेरच्या देशांत जायाचा पैसा बराच कमी झाला आहे.

अफगाण लोकांत पूर्वी फार मोठ्या आणि फार पोकळ विजारी घालीत असत. त्यांस उगाच पुष्कळ कापड लागे, त्या अवजड होत, आणि जलद चालण्यास त्यांची अडचण होत असे. हें सगळें नीट करण्यास अमीरसाहेबांनीं प्रथमतः हिंदुस्थानांतले शिंपी ठेविले, आणि मग इंग्लिश शिंपी ठेविले. आणि त्यांजकडून अगदीं बेताच्या विजारी करविल्या. त्या आपल्या लष्करांतल्या लोकांस दिल्या, आणि इतर कामदारांसही वापरायास सांगितल्या. आणखी, त्यांविषयींचीं पुस्तकें तयार करविलीं. त्यांत कपडे बेतावे कसे, कापावे कसे, शिवावे कसे, हें सगळें फार चांगल्या रीतीनें सांगितलें आहे. त्याची माहिती करून घेतली ह्मणजे शिंप्यास कापड चोरण्यास मुळींच सांपडत नाहीं.

अमीरसाहेब गादीवर बसले, तेव्हां सगळें अफगाणिस्थान अगदीं अडाणी लोकांनीं भरलेलें होतें. शिक्षण कसें तें मुळींच ठाऊक नव्हतें. अमीरसाहेबांस तीस कारकून पाहिजेत होते, त्यांस नुसतें लिहितां वाचतां येणें बस होतें. परंतु, सगळ्या मुलखांत तसे अवघे तीन मिळाले. ह्याविषयीं पुढें अमीरसाहेब ह्मणाले, “ देवाची कृपा आहे. आतां माझ्या प्रजेंतल्या हजारों लोकांस लिहितां वाचतां येत आहे, आणि नाना प्रकारच्या विषयांचीं हजारों पुस्तकें लोक वाचीत आहेत. चोहींकडे शाळा

स्थापित होत आहेत. प्रत्येक पलटणींत शाळा आहे. आणखी, परमेश्वर कृपा करील तर, युरोपियन पद्धतीनें शास्त्रीय विषय शिकविण्याकरितां लवकरच एक मोठी पाठशाळा काबुलांत स्थापित करायाची आहे. आणखी एक वर्तमानपत्र काढण्यासही आह्मीं परवानगी दिली आहे. काबूलांत अगदीं आरंभीं छापखाना दिल्लीच्या मुनशी अबदुल रजाक ह्या नांवाच्या गृहस्थांनीं घातला. ते ज्वरानें मरण पावले. परंतु, त्यांचा छापखाना आमच्या काबुली लोकांनीं चांगला चालविला आहे. आणखी, अबदुल रजाक हे आमचे पहिले छापखानेवाले ह्मणून, आह्मीं त्यांच्या बायकामुलांस त्यांचा पगार चालू ठेविला आहे."

पूर्वीं जे कारखाने सांगितले आहेत, त्यांशिवाय आणखी पुष्कळ कारखाने अमीर साहेबांनीं लहान मोठ्या प्रमाणानें काढून अनेक प्रकारच्या वस्तु तयार करविण्याची तजवीज केली आहे. त्या सगळ्या वस्तु सांगायाच्या ह्मणजे एक मोठी थोरली याद होईल. ती नको. पण त्यांतल्या कांहीं मुख्य मुख्य सांगतों. लहान मोठ्या टोप्या, दुर्बिणी, जरतार, चटया, सतरंजा, पडदे, खुरचा, पागोटीं, तंबू, मुलामे, भाले, कागद, बिस्कुटें, सुया, मुशी, तासण्या, विंधणीं, छिन्न्या, हातोडे, घण, घाणे, गोणपाट, इत्यादि.

पाडाव केलेल्या कैद्यांत ज्या कोणास असें कांहीं कला-कौशल्य थोडें बहुत येत असे, त्यांस अमीर साहेब त्या त्या कारखान्यांत कामावर पाठवीत. आणि त्या कामांत ते चांगले तयार झाले, ह्मणजे, त्यांस मोकळे सोडून त्यांस इतर लोकांप्रमाणें कारखान्यांतले कामदार करून इतरांप्रमाणें

पगार देत. त्याच्या योगानें, वाईट लोक चांगले होऊन कारखान्यांत नौकरांची कमताई पडत नसे.

ग्रे नांवाच्या चांगल्या अनुभविक ग्रंथकारानें ह्मटलें आहे कीं, "अफगाणिस्थानच्या रानटी लोकांस सुधारण्याच्या कामीं अबदुल रहिमानांनीं सक्तीचे आणि कडक उपाय योजिले, ते आवश्यक होते. सौम्य उपायांविषयीं लोकांचा ग्रह कांहीं भलताच झाला असता, आणि ते कोणी मानलेही नसते. अमीर साहेबांच्या कारखान्यांच्या शिक्षणाचा उपयोग लोकांत पसरत चालला आहे. युरोपियन कारागिरांच्या हाताखालीं कलाकौशल्य शिकून, हजारों लोक देशामध्यें शहरोशहरीं खेड्यापाड्यांनीं तीं कामें करूं लागले आहेत. आणि तीं आवडूं लागलीं आहेत. अफगाणिस्थान युरोप बनत आहे."

खरोखर राष्ट्रहितासाठीं हे अमीर कायावाचामनेकरून इतके झटत होते, तरी, त्यांच्यातले कांहीं लोक त्यांस नांवें ठेवण्यास तयार होतेच. ते असें ह्मणत कीं, ह्या सगळ्या खटपटी पैसा उत्पन्न करण्याकरितां हे करीत आहेत. हें त्यांच्या कानीं जाई तेव्हां तिळभरही खंती न करितां ते असें उत्तर देत कीं, "हिरात येथील ख्वाजा अहरार ह्या साधु पुरुषांनीं काय सांगितलें आहे तें ऐका. परमेश्वरभक्त असतो तो संपत्तिभक्त नसतो, हें खरें आहे; परंतु, परमेश्वराच्या कामाकरितां जो संपत्तिभक्त होतो, तो परमेश्वरभक्त असतो."

---

# भाग दाहावा.

## इंग्लिश सरकाराशीं संबंध.

पुनरावृत्ति कधीं कधीं कंटाळवाणी होते, परंतु, तो कांहीं दोष नव्हे. एकादी गोष्ट स्पष्ट कळण्यास आणि मनांत ठसण्यास पुनरावृत्ति अत्यंत आवश्यक आहे-किंबहुना पुनरावृत्ति हेंच मुख्य साधन आहे, असें इतिहासाचा अभ्यास करणाऱ्या बुद्धिमंतांचें मत आहे. ह्मणून, पूर्वींच्या भागांत दुसऱ्या पर्यायानें अमीर साहेब आणि इंग्लिश सरकार ह्यांच्या मधल्या संबंधाचें कथन जरी आलें असलें, तरी, त्याची सुसंगत कथा समजणें हें आवश्यक आहे. त्यास प्रथम थोडेंसें पूर्वींचें कथानक घेतलें पाहिजे.

इ० स० १८५५ च्या मे महिन्याच्या पहिल्या तारखेस लार्ड डालहौसी आणि अमीर दोस्तमहंमद ह्यांचा तह पेशावर येथें झाला. त्यांत असें ठरलें कीं, इंग्लिश सरकारानें अमीरांशीं स्नेहभावानें वागावें, आणि अफगाणिस्थानाच्या अंतर्गत राज्य-कारभारांत कधीं पडूं नये. आणि इंग्लिश सरकाराविषयीं अमीरांनीं असा करार केला कीं, आह्मीं सभ्यपणानें वागूं आणि इंग्रज सरकाराचे जे कोणी शत्रुमित्र, ते आमचे शत्रुमित्र, असें आह्मी समजूं. इ० स० १८६३ त, अॅक्टिंग गव्हरनर जनरल सर विलियम डेनिसन ह्यांनीं, दोस्त महंमदांच्या मागें शेरअल्ली ह्यांस अफगाणिस्थानचे अमीर कबूल केलें. त्यानंतर तीन वर्षांनीं गव्हरनर जनरल सर जान लॉरेन्स

ह्यांनीं अफज़ुलखानांस अफगाणिस्थानाचे अमीर कबूल केलें. पुढें शेरअल्ली काबूलच्या गादीवर आले. त्यांची आणि लार्ड मयो ह्यांची मुलाखत इ० स० १८६९ त अंबाला येथें झाली, तेव्हां अमीरांनीं अशी गोष्ट काढिली कीं, अफगाणिस्थानचे अमीर हे जसे इंग्लिश सरकाराच्या शत्रुमित्रांचे शत्रुमित्र आहेत, असें ठरलें आहे, तसें, इंग्लिश सरकार हें अमीरांच्या शत्रुमित्रांचे शत्रुमित्र आहे, असें ठरलेलें असावें हें अवश्यक आहे. त्याप्रमाणें तह तर कांहीं झाला नाहींच. परंतु, तुह्मांस तुमचे शत्रु त्रास देऊं लागले तर आह्मी तुह्मांस साह्य करूं असें त्यांस अभिवचन गव्हरनर जनरल साहेबांनीं दिलें.

इ० स० १८५५ च्या तहनाम्याप्रमाणें इ० स० १८७३ पर्यंत सरासरी बरेंच चाललें. परंतु, त्यापुढें शेरअल्लींच्या वर्तनांत धरसोड फार झाली. तेव्हां, अर्थात इंग्लिश सरकारावर अमक्या एका पद्धतीनें वागण्याविषयीं बंधन राहिलें नाहीं. त्यांत शेरअल्लींनीं राशियाच्या वकीलास आपल्या दरबारांत येऊं दिलें, आणि इंग्लिशांच्या वकीलास नको ह्मटलें. तेव्हां तर उभय पक्षांचें स्नेहाचें नातें नाहींसें झालें. आणि इंग्लिश सरकारास कालदेशवर्तमानानुसार वागण्यास मोकळीक झाली. त्याप्रमाणें लार्ड लिटन ह्यांनीं इ० स० १८७८ च्या नोवेंबरच्या दुसऱ्या तारखेस शेरअल्लींस लिहून पाठविलें कीं, "आमच्याकडून आपणांकडे जी मंडळी जावयाची होती, ती दोस्तसरकाराकडची ह्मणून जावयाची होती, आणि तिजवर सोंपलेलें काम फार जरूरीचें होतें, हें आपणांस स्पष्टपणें कळविलें असतां, त्या मंडळीस आंत न येऊं देण्याविषयीं

आपण आपल्या सरहद्दीवरच्या अधिकाऱ्यांस हुकूम दिले आहेत. ह्यांत इंग्लिश सरकारचा अपमान झालेला आहे, ह्याविषयींचा खुलासा आपल्या पत्रांत मुळींच नाहीं, आणि उभयतां सरकारचा स्नेह असावा, अशी जी आमची सूचना होती, ती विषयीं एकही अक्षर नाहीं. ह्या आपल्या उघड विपरीत वर्तनावरून, मी महाराणी सरकारचें सैन्य सरहद्दीवर जमविलें आहे. तरी, लढाईचें अरिष्ट टाळण्याचीं शेवटची संधि आपणांस यावी अशी माझी फार इच्छा आहे. तर, ह्या सगळ्या कृत्यांबद्दल इंग्लिश सरकाराची क्षमा मागून, त्या आशयाचें पत्र आपणांकडच्या चांगल्या वजनदार अधिकाऱ्यांबरोबर आपण इकडे पाठवावें. शिवाय, इंग्लिश सरकारचा वकील निरंतर अफगाणिस्थानांत राहिल्याशिवाय उभयतां सरकारांचें सख्य राहणें अशक्य आहे, ह्यास्तव तसा वकील ठेवण्याविषयीं आपलें अनुमत असावें. शिवाय, आमच्या मंडळीस जे लोक वाट दाखवितील, त्यांस आपल्या लोकांकडून कोणत्याही प्रकारची इजा होऊं नये, आणि जर कोणी इजा दिली तर, तिच्याबद्दलची नुकसानी भरून देण्याविषयीं आपली कबुली पाहिजे....ह्या सगळ्या गोष्टी आपण बऱ्या प्रकारें कबूल कराल आणि त्याप्रमाणें विसाव्या तारखेच्या आंत इकडे कळवाल तर बरें. नाहीं तर आपण इंग्लिश सरकाराचे शत्रु आहांत, असें समजून आह्मांला तजविजी योजाव्या लागतील" ह्यावरून तेव्हांच्या स्थितीचें बरेंच अनुमान करितां येईल.

पुढें इ० स० १८७९ च्या मे महिन्यांत इंग्लिश सरकारानें याकूबखानांस काबूलचे अमीर समजून त्यांशीं

नवा तह गंडामक येथें केला. तेव्हां इंग्लिश सरकारतर्फे अधिकारी सर लुई कावाग्नरी हे होते. त्यांत ठरलें कीं, मिकनी आणि खैबर ह्या घांटांवर अमल इंग्लिश सरकारचा असावा; पिशिन, सिबी आणि कुरम हे प्रांत इंग्लिश सरकाराचे स्वाधीन करावे; आणि त्या प्रांतांचें उत्पन्न होईल त्यांतून त्या प्रांतांचा खर्च वजा करून, बाकीचें उत्पन्न त्यांनीं अमीरांस द्यावें. आणि अमीरसाहेबांनीं दुसऱ्या कोणत्याही सरकाराशीं कोणत्याही प्रकारचा संबंध ठेवूं नये, परकीय संबंध असा काय तो इंग्लिश सरकाराशीं ठेवावा, आणि इंग्लिश सरकारानें परचक्रापासून अफगाणिस्थानाचें संरक्षण करावें. आणखी इंग्लिश सरकाराचा वकील अफगाण दरबारांत असावा. त्यानें राज्याच्या कामांत बिलकूल हात घालूं नये, आणि इंग्लिश सरकारानें अफगाण राज्य अगदीं स्वतंत्र समजावें. आणखी, परचक्रास हांकून देण्याकरितां जर इंग्लिशांचें सैन्य अफगाणिस्थानांत गेलें, तर, तें काम आटोपल्याबरोबर एकदम तेथून निघून जावें, अफगाणिस्थानाच्या सरहद्दीच्या आंत राहूं नये. त्याप्रमाणें सर लुई कावाग्नरी तेथें जाऊन राहिले. त्यांचा परिवार अगदीं बेताचा ह्मणजे एक चिटणीस, एक डाक्टर, एक लष्करी अमलदार, त्याच्या हाताखालीं निवडक पंचवीस स्वार, आणि पन्नास पायदळ, एवढा कायतो होता. त्यांचा खून काबूल येथें तारीख ३ सप्तंबर रोजीं बंडावलेल्या लष्करी लोकांच्या हातून झाला. त्यांविषयीं तेव्हांचे महाराणीसाहेबांचे मुख्य प्रधान लार्ड बीकान्सफील्ड ह्यांनीं ह्मटलें आहे:—“ ह्यांचें दुःख मी जन्मभर विसरणार नाहीं. हिंदुस्थानांतले एक मोठे कामगार गेले,

त्यांच्या खुनाचा सूड घेणें हें ह्या देशाचें अवश्य कर्तव्य आहे. " ह्यानंतर जनरल राबर्टस ह्यांस इंग्लिश सरकारानें तिकडे पाठवून त्याचा बंदोबस्त केला. जनरल राबर्टस् ह्यांनीं काबूल घेतलें, आणि मग कंदाहारही घेतलें, आणि अबदुल रहिमान रशियांतून अफगाणिस्थानांत आल्यावर त्यांस अमीर ह्मणून कबूल करून, आणि राज्य त्यांच्या हवालीं करून, ते परत हिंदुस्थानांत आले. ह्या स्वारी बरोबर राजकारणी मुख्य कामदार सर लिपेल ग्रिफिन हे होते. जनरल राबर्टस् ह्यांनीं जसा लष्करी पराक्रम मोठा केला, तसा ह्यावेळीं, सर लिपेल ग्रिफिन ह्यांनीं राजकारणाची बाजू फार उत्तम रीतीनें राखिली. ह्मणजे त्यांनीं आपल्या सरकारचा हात कोणत्याहि प्रकारें गुंतवूं न देतां, अमीर साहेबांस संतुष्ट ठेविलें. तें इतकें कीं, ह्या प्रकरणाचें विवेचन करितांना, अमीर साहेबांनीं असे उद्गार काढिले आहेत कीं, " जनरल राबर्टस् ह्यांस सरकारानें जसें लार्ड राबर्टस् अफ कंदाहार केलें, तसें, सर लिपेल ग्रिफिन ह्यांस लार्ड अफ काबूल करावयास पाहिजे होतें. " ह्यावरून अमीरसाहेबांस कामाची पारख उत्तम होती, हें स्पष्ट होतें.

मागच्या भागांतल्या वर्णनावरून लक्षांत आलें असेलच कीं, रशियाकडे अबदुल रहिमान जाऊन राहिले होते, ते, अफगाणिस्थानची गादी रिकामी झालेली पाहून आणि इंग्लिश सरकाराची अनुकूलता पाहून, ते इकडे आले. त्यांस इंग्लिश सरकारानें एक मोठें काम सांगितलें कीं, हिंदुस्थान आणि अफगाणिस्थान ह्यांच्या सरहद्दीवर रानटी लोक राहातात, ते

फार बेबंद आहेत, त्यांपासून हिंदुस्थानास उपद्रव होऊं नये अशी तजवीज व्हावी. तें काम त्यांनीं कबूल केलें. परंतु, तें करावयास त्यां पाशीं पैशाचें बळ नव्हतें. ह्मणून, इंग्लिश सरकारानें त्यांस पैशाचा पुरवठा करण्याचें पतकरिलें. तो पैसा बराच द्यावा लागला. त्याची थोडीशी तरी कल्पना यावी ह्मणून त्यांतल्या वर्षा दीड वर्षांतल्या रकमा येथें दाखल करितों:—

| | |
|---|---|
| काबूल येथें, आगष्ट, १८८० | ६६५००० रुपये. |
| लुंडिकोटल येथें, सप्तंबर, १८८० | ५००००० रुपये. |
| पेशावर येथें, आक्टोबर, १८८० | ७००००० रुपये. |
| पेशावर येथें, जानेवारी, १८८१ | १००००० रुपये. |
| पेशावर येथें, फेब्रुवारी, १८८१ | ५००००० रुपये. |
| कंदाहार येथें, एप्रिल, १८८१ | ५००००० रुपये. |
| कंदाहार येथें जून, १८८१ | १५०००० रुपये. |
| | एकूण ३११५००० रुपये. |

त्या प्रमाणें ठीक चाललें. परंतु, रशियानें इ० स० १८८३ त मर्व्ह प्रांतांत आपला अमल बसविला, आणि तेथल्या आसपासच्या लोकांशीं तह करून अक्सस नदीकडे आपल्या स्वारीचा मोर्चा फिरविला, तेव्हां, अफगाणिस्थानास भय वाटलें, आणि हिंदुस्थानालाही काळजी उत्पन्न झाली. त्या वेळीं गव्हरनर जनरलच्या जागेवर लार्ड रिपन हे महात्मे होते. त्यांनीं लागलेंच अमीरसाहेबांस असें लिहून कळविलें कीं, "आपणांस भिण्यास कांहींएक कारण नाहीं. आपण अशी खचीत ख़ातरी ठेवा कीं, इंग्लिश सरकारानें आपणांपाशीं जें काय कबूल केलें आहे, त्याप्रमाणें तंतोतंत वागण्याची

त्यांची इच्छा आहे, आणि त्यांस सामर्थ्यही आहे. आपण बेफिकीर असावें." आणखी अमीरसाहेबांकडून त्याविषयींच्या मान्यतेचें आणि इंग्लेश सरकाराशीं एकनिष्टपणें स्नेहभावानें वागण्याच्या वचनाचें उत्तर आल्यावर, दुसरें एक पत्र लार्ड रिपन ह्यांनीं अमीरसाहेबांस इ० स० १८८३ च्या जून महिन्याच्या १६ व्या तारखेस लिहिलें. त्याच्या शेवटीं असें आहे:—" आपल्या पत्राचा आशय पूर्णपणें समजून, आपणांस दरसाल बारालाख रुपये देण्याविषयीं आह्मीं निश्चय केला आहे. ही रक्कम सरहद्दीवरच्या सैन्यास पगार वांटण्यास आणि तेथल्या दुसऱ्या बंदोबस्तास उपयोगीं पडेल. आपल्या वचनावर आमचा पूर्ण भरंवसा आहे, आणि आह्मी सांगितलेल्या कार्यास आपल्याच्यानें करवतील तितके श्रम आपण करायास कधीं कमी करणार नाहीं, अशी आमची खातरी आहे."

ह्याचें उत्तर अमीरसाहेबांकडून इ० स० १८८३ च्या जुलै महिन्याच्या १३ व्या तारखेचें आलें. त्यांत त्यांनीं लार्ड रिपन ह्यांस लिहिलें कीं, " आपला सर्व मनोदय आह्मीं आमच्या सर्व लोकांस कळविला. त्यावरून त्यांना फार संतोष झाला आहे. कां कीं, आपण लिहिलेल्या व्यवस्थेनें इंग्लिश सरकार, अफगाणिस्थानचे लोक आणि अफगाणिस्थानांतील राज्य ह्या सर्वांस फार लाभ होण्याची खातरी आहे. ते लोक मोठ्या हर्षानें असें ह्मणत आहेत कीं, मोठ्या पराक्रमी राज्याशीं आपला स्नेह झाला आहे, हे आपणावर परमेश्वराचे मोठे उपकार झाले आहेत. परमेश्वर करो, आणि अफ़गाण लोक ह्या इंग्लिश सरकाराच्या मित्रभावापासून कधींही न चळोत. आणि जोंपर्यंत माझ्या जीवांत

जीव आहे, तोंपर्यंत मी इंग्लिश सरकाराशिवाय दुसऱ्या कोणत्याही सरकाराशीं सख्य करणार नाहीं. शक्तिमान इंग्लिश सरकाराचें वैभव वृद्धि पावत आहे, ह्याबद्दल मी परमेश्वराचे उपकार मानितों. ”

ह्यावरून लार्ड रिपन ह्यांच्या वेळीं अफगाणिस्थानचे अमीर अबदुल रहिमान ह्यांचा संबंध इंग्लिश सरकाराशीं कसा होता, हें सहज लक्षांत येईल. अमीरसाहेबांचें मन इंग्लिश सरकाराकडे फारच वळलें होतें, परंतु, तितकें त्यांना बाह्यात्कारीं दाखवितां येईना. त्याविषयीं त्यांनीं असें ह्मटलें आहे कीं, “ माझा इतका ओढा इंग्लिश सरकाराकडे आहे, हा मला माझ्या लोकांस दाखवितां येत नाहीं. कां कीं, ते अज्ञानी आणि माथेफिरू आहेत. मीं जर आपलें तें प्रेम प्रगट केलें, तर, माझे लोक लागलेंच ह्मणतील कीं, हा, नास्तिकांच्या नादीं लागून नास्तिक झाला आहे. आणि ते लागलेच माझ्यावर उठतील. असे लोक नाहींतसे झाल्यावांचून माझ्या मनाप्रमाणें मला वागतां यावयाचें नाहीं. आपल्या लोकांचें संमत घेण्याच्या आधीं आणि सगळा बंदोबस्त आपले हातीं येण्याच्या आधीं अमीर याकुबखान ह्यांनीं इंग्लिशांच्या वकीलाला आपल्या दरबारांत घेतलें, तसें करणारा मी नाहीं आहें. आणि त्यांनीं अशी गाफीलगिरी केली त्यामुळें सर लुई कावाग्नरींचा खून झाला. एरव्हीं झाला नसता, आणि त्यांना स्वतःला गादीस मुकावें लागलें नसतें.” अगदीं खरें आहे.

इंग्लिश सरकाराशीं उत्तम प्रकारचें सख्य व्हावें, अशी अमीर साहेबांस अतिशयित इच्छा होती. त्याप्रमाणेंच अमीर

साहेबांचा खरोखर मनोदय काय आहे तो कळावा, आणि त्या प्रमाणें एकदा व्यवस्था लावून टाकावी, असें लार्ड रिपन ह्यांच्याही मनांत फार होतें. परंतु, मध्यें पुष्कळ अडचणी होत्या. शिवाय, अमीर शेरअल्लीखानांच्या पक्षाची मंडळी हिंदुस्थानांत ठेवलेली होती, ती, अबदुल रहिमानांच्या कृतीविषयीं नाना प्रकारच्या खोट्यानाट्या गप्पा उठवून इंग्लिश अधिकाऱ्यांचे कान भ्रष्ट करीत होती. ती इंग्लिश अधिकाऱ्यांस सांगे कीं, जे कोणी अफगाणलोक इंग्लिश लोकांस साह्य करीत होते, त्यांस अबदुल रहिमानांनीं जीवें मारिलें आहे. अशा गोष्टी त्यांस खऱ्या वाटणें आणि त्यांवरून त्यांची मनें दूषित होणें हें अगदीं साहाजिक होतें. त्यामुळें त्यांच्या मनांत नानाप्रकारच्या कल्पना येत, आणि विश्वास कशावरच बसेना. तेव्हां लार्ड रिपन ह्यांच्या मनांत असें आलें कीं, अमीर साहेबांची आणि आपली एकदा समक्ष मुलाखत झाली ह्मणजे सगळ्या संशयांचें निरसन होऊन, उभय पक्षाचीं मनें शुद्ध होतील. आणि खरोखरीच, साधारण व्यवहारांत काय आणि राजकीय कामांत काय, सगळें दुरून दुरून चाललें ह्मणजे, मधल्या लुडबुड्यांच्या योगानें उगाच मनांत वैमनस्यें वाढतात, आणि विनाकारण कलह माजतात. त्याकरितां, शाहाणीं माणसें नेहमीं मध्यस्थांवर तिळभरही विश्वास न ठेवतां, होईल तितका निर्णय समक्ष बोलून करवितात. तसेंच लार्ड रिपनांच्या मनांत होतें. परंतु, तसा योग अमीरसाहेबांशीं येण्याच्या अगोदरच लार्ड रिपन ह्यांनीं गव्हरनर जनरलाचें काम सोडिलें, आणि

त्यांच्या जागेवर लार्ड डफरिन हे आले. हीं वर्तमानें इ० स० १८८४ त घडलीं.

लार्ड रिपन ह्यांच्या वेळीं घाटत होतें, त्याप्रमाणें अमीर अबदुल रहिमान आणि व्हाइसराय लार्ड डफरिन ह्यांची मुलाखत रावळपिंडी येथें इ० स० १८८५ च्या एप्रिल महिन्यांत झाली. पांचव्या तारखेस अमीरसाहेबांस आणि त्यांच्या बरोबरच्या सरदारांस एक मोठी मेजवानी झाली. त्या वेळीं अमीर साहेबानीं उभे राहून भाषण केलें. त्यामध्यें इंग्लड आणि अफगाणिस्थान ह्यांचा स्नेह झाला आहे, ह्याविषयीं आपलें अत्यंत समाधान त्यांनीं प्रगट केलें, आणि असें ह्मटलें कीं, हिंदुस्थान आणि अफगाणिस्थान ह्यांचा संबंध इतका निकट झाला आहे कीं, त्याचें हित तें ह्याचें हित आणि ह्याचें हित तें त्याचें हित असें होऊन गेलें आहे, त्या पक्षीं अफगाणिस्थानाची सुधारणा हिंदुस्थानाप्रमाणें लवकरच होईल, अशी आशा आहे. तें ऐकून सर्वांस मोठें आश्चर्य वाटलें. साहाव्या तारखेस इंग्लिश सैन्याची कवाईत अमीरसाहेबांस दाखविली. ती पाहून ते चकित झाले. त्याविषयीं त्यांनीं उघडपणें ह्मटलें कीं, "असें पराक्रमी सैन्य ज्या राष्ट्राजवळ आहे, त्यास कोणाचेंच भय नाहीं" आठव्या तारखेस मोठा दरबार झाला. त्यास लार्ड डफरिन, अमीर अबदुल रहिमान, ड्यूक आफ कनाट, सर फ्रेडरिक राबर्टस्, पंजाबचे लेफटनेंट गव्हरनर, वायव्य प्रांताचे लेफरनेंट गव्हरनर, पंजाबांतले सात आठ राजे, अशी मोठमोठी मंडळी आली होती. त्यांत रीतीप्रमाणें नजरनजराणे झाल्यानंतर, अमीर साहेब उभे राहून ह्मणाले, "नामदार व्हाइसराय साहेबांनीं जो लोभ मजवर केला आहे,

त्याबद्दल आणि महाराणीसाहेब बादशाहिणी ह्यांनीं जी कृपा मजवर केली आहे, तीबद्दल मी त्यांचे फारफार उपकार मानितों. ह्या लोभाबदल आणि ह्या कृपेबद्दल, इंग्लिशसरकारास जेव्हां गरज लागेल तेव्हां पाहिजे तें साह्य करण्यास मी स्वतः, माझें सगळें सैन्य, आणि अफगाणिस्थानचे लोक हीं एका पायावर तयार आहों. परचक्र आलें असतां त्यास हांकून देण्याच्या कामीं आह्मी अफगाणिस्थानाला साह्य करूं, असें वचन इंग्लंडानें ज्या पक्षीं दिलें आहे, त्या पक्षीं अफगाणिस्थानानें इंग्लंडाशीं अत्यंत स्नेह ठेवून त्यास साह्य करण्यास नेहमीं तयार असावें, हें आवश्यक आहे."

हें भाषण चाललें असतां मध्येंच एक चमत्कार झाला. अमीरसाहेबांस जे नजराणे तेथें दिले होते, त्यांत एक कृत्रिम गाणारा पक्षी होता, तो एकाएकी गाऊं लागला त्याच्या योगानें अमीरसाहेबांच्या बोलण्यांत कांहीं व्यत्यय आला नाहीं, परंतु, कांहीं लोकांचें लक्ष त्याजकडे गेलें, आणि मोठें नवल वाटलें.

ह्या दरबारास जे राजे पंजाबांतून वगैरे आले होते, त्यांजविषयीं अमीर साहेबांनीं ह्मटलें--"त्या सगळ्यांचे पेहेराव बायकांसारखे होते. ते, बायकांप्रमाणें, नखशिखांत जडावाच्या दागिन्यांनीं मढवलेले होते. त्यांच्या विजारींस देखील घागऱ्या लाविलेल्या होत्या. ते अतिशयित अज्ञानी, आळशी आणि विलासी होते. जगांत काय चाललें आहे आणि जगांत काय आहे हें त्यांना ठाऊक नव्हतें. त्यांना धड चालतां देखील येत नव्हतें. कां कीं, चालणें हें राजांस लघुत्व आहे असें त्यांस वाटून ते कधीं चालत नाहींत.

आपला सगळा वेळ ते खाण्यापिण्यांत आणि अमलांत घालवितात. त्यांजकडे पाहून मला अतिशयित वाईट वाटलें, आणि त्यांची फार कींव आली. आणि असें मनांत आलें कीं, अशा माणसांच्या हातून राष्ट्राचें रक्षण व्हावें कसें, आणि लोकांस न्याय मिळावा कसा ? ”

दाहा दिवसपर्यंत रावळपिंडीस अमीरसाहेबांचा मुक्काम होता. दररोज त्यांची आणि लार्ड डफरिन ह्यांची गांठ पडे, आणि दोन दोन तीन तीन तास त्यांची बोलणीं चालत. त्यांत आरंभीं आरंभीं अमीरसाहेब अबोल होते, आणि व्हाइसरायसाहेब काय बोलत तें नुसतें ऐकून घेत असत. त्यामुळें, त्यांच्या मनांत काय होतें तें व्हाइसराय साहेबांस कळेना, आणि वारंवार शंका उत्पन्न होई. परंतु, त्या संधीसच पेंजदे हें ठिकाण रशियन लोकांनीं घेतल्याचें वर्तमान तेथें आलें त्यावरून, इंग्लंड, रशिया आणि हिंदुस्थान ह्यांविषयीं पुष्कळ बोलणें निघून, अमीरसाहेब आपलीं मनोगतें स्पष्ट रीतीनें सांगूं लागले. त्यांवरून, व्हाइसराय साहेबांच्या मनांतला सगळा किंतु नाहींसा होऊन, अमीरसाहेब हे इंग्लिश राज्याचे मोठे मित्र आणि हितचिंतक आहेत, आणि ते, बोलल्याप्रमाणें, प्रसंगीं साह्य करण्यास चुकावयाचे नाहींत, अशी लार्ड डफरिन ह्यांची खातरी झाली. आणि अमीरसाहेबांसही खचीत कळून आलें कीं, अफगाणिस्थान जरी हिंदुस्थानचें मित्र झालें, तरी, अफगाणिस्थानाच्या स्वातंत्र्यास तिळभरही उणेपण यावयाची भीति नाहीं.

झालें. मुलाखतींचें सगळें काम आटोपलें. अमीरसाहेबांची निघण्याची तयारी चालली. इतक्यांत त्यांनीं व्हाइसराय

साहेबांस असें सुचविलें कीं, राणीसरकाराकडून जर एकादी बहुमानाची पदवी मला मिळेल, तर मला फार संतोष होईल. हें व्हाइसराय साहेबांच्या कानीं पडण्याचा उशीर होता. तारायंत्रद्वारें सगळा व्यवहार चालून राणीसरकाराकडून जी. सी. एस्. आय्. ही बहुमानाची पदवी अमीर अबदुल रहिमानांस आली आणि तिचा स्वीकार त्यांनीं मोठ्या आनंदानें केला. मग त्यांची स्वारी अफगाणिस्थानाकडे निघून गेली.

रावळपिंडीच्या भेटीवरून अमीरसाहेबांस आणखी असें वाटलें कीं, आपण स्वतः आपले मुलगे, आणि आपले अमलदार ह्यांनीं, इंग्लंडास जाऊन, इंग्लिश लोकांविषयीं माहिती करून घ्यावी, आणि त्यांची ओळख करावी, हें फार हितावह आहे. अशा प्रत्यक्ष भेटीच्या योगानें परस्परांच्या मनांतले संशय नाहींतसे होतात, प्रेम वाढतें, आणि एकमेकांच्या उपयोगीं पडण्याविषयींची वृत्ति वृद्धि पावते. शिवाय, राजकारणांतल्या कितीएक क्षुल्लक बाबींचा निकाल तोंडच्या तोंडीं होतो.

ह्या मुलाखतीच्या संबंधानें विवेचन करतांना अमीरसाहेबांनीं रशियन लोकांविषयीं ह्मटलें कीं, “आपलें राज्य अधिकाधिक पसरण्याची रशियन लोकांची रीति अगदीं एकसारखी आणि अचल आहे. त्यांच्या मनांत एकादी गोष्ट करावयाची आली, ह्मणजे ती केल्याशिवाय ते कधीं सोडावयाचे नाहींत. दरबारामध्यें, एका पक्षानें केलेल्या गोष्टी दुसऱ्या पक्षानें मोडून टाकाव्या, हें त्यांच्यांत नाहीं. रशियाला हत्तीसारखी सवय लागलेली आहे. आधीं जागा पाहायाची, आणि मग तिजवर पाऊल टाकायाचें, आणि

तें चांगलें पक्कें बसलें, ह्मणजे मग, सावधगिरीनें सावकाश दुसरें पाऊल उचलावयाचें; ह्मणजे पुढें टाकलेलें पाऊल मागें घ्यावयाचें नाहीं, अशी त्याची रीति असते. तसें रशियन लोकांचे आहे. गेल्या साठ वर्षांत हिंदुस्थानाच्या जवळ जवळ हळूहळू येण्याचा क्रम रशियानें धरिला आहे. ठिकाण एकदा त्यांनीं घेतलें कीं, माशानें माणिक गिळिलें. पुनः परत मिळावयाचें नाहीं. आणखी, तें ठिकाण व्यापतांना ते तह करतील, ठराव करितील, आणाशपथा वाहतील, आणि असें म्हणतील कीं, आतां ह्यापुढें ह्याच्यापुढें आम्हांस यावयाचें नाहीं. पण तें कोठपर्यंत! तर त्या ठिकाणीं चांगला पक्का अंमल बसेपर्यंत! तो बसला कीं ते सगळे तह, ठराव, वचनें, आणि आणाशपथा विसरतात, आणि त्याच्या पुढचें ठिकाण घेण्याच्या विचारास लागतात. ह्यांत सगळी दांडगाईच करितात, असें मी म्हणत नाहीं. ते जें कांहीं करितात त्यास ते कांहीं तरी कारण दाखवितात. पण, तें कारण कसें असतें? लांडग्यानें करडाला कारण सांगितलें आहे तसें!!" आणखी आपल्या स्वतःच्या संबंधानें रशियाविषयीं त्यांनीं ह्मटलें आहे कीं, "अफगाणिस्थानची गादी रिकामी होतांच त्यांनीं मला साह्य करून इकडे येऊं दिलें, हे त्यांचे मजवर मोठे उपकार आहेत. शिवाय, बारा वर्षेंपर्यंत मी त्यांचें अन्न खाल्लें आहे, तेव्हां मी त्यांच्याशीं कधींही कृतघ्नपणानें वागणार नाहीं. कांकीं, कृतघ्नपणासारखें दुसरें मोठें पाप नाहीं. असें जरी आहे, तरी, माझ्या एकट्याच्या सोईकरितां आणि सुखाकरितां माझा देश आणि माझे लोक ह्यांस मी रशियन लोकांस विकणार नाहीं. हा देश आणि हे लोक हे देवानें, संरक्षणार्थ

आणि परिपालनार्थ, माझ्या स्वाधीन केले आहेत, आणि मला त्यानें आपला हस्तक नेमिलें आहे, गुमास्ता नेमिलें आहे. पाहारेकऱ्यानें आपल्या ताब्यांतला माल आपल्या मित्राच्या हवालीं करावा हें मोठें पाप आहे—मोठी शरम आहे. तें मी कदापि करणार नाहीं. असें कांहीं झालें ह्मणजे रशियनांस माझा राग यावा, हें साहाजिक आहे. ”

लार्ड डफरिन ह्यांच्यामागून लार्ड लांन्सडौन हे व्हइसराय होऊन आले. त्यांच्या वेळीं अफगाणिस्थान आणि इंग्लंड ह्यांच्या संबंधांत कांहीं गडबड झाली होती. अमीरसाहेबांचें कांहीं लढाऊ सामान विलायतेहून आलें होतें, तें इकडे अडकाविलें होतें. आणि त्या प्रकारच्या व्यापारी मालाच्या निर्यातीसही कांहीं अडथळा झाला होता. त्यावरून अमीरसाहेबांस बरेंच वाईट वाटलें होतें. तरी, अशा कामांत ते फार शांतता धरीत. वेळेस अपमानही सोशीत. उतावळी करीत नसत. तसेंच त्यांनीं ह्या वेळीं केलें आणि शांतपणें शोध करून, आणि बरीच पड खाऊन, स्नेहाचा जवा पूर्ववत बसविला. तरी त्या वेळीं त्यांनीं असा विचार केला कीं, आपण स्वतः इंग्लंडास जाऊन, महाराणी सरकारास भेटून, आणि तेथल्या दरबारांत आपला वकील ठेवून, आपल्या ह्मणण्याचा विचार तेथें मुख्य ठिकाणीं व्हावा असें करावें. परंतु, त्यांस इकडची कांहीं गडबड मोडावयाची होती, आणि त्यांची प्रकृति बरी नव्हती, ह्मणून, त्यांनीं आपले द्वितीय चिरंजीव नासरुल्लाखान ह्यांस त्या कामाकरितां इ० स० १८९५ त इंग्लंडास पाठावेलें.

हे नासरुल्लाखान एप्रिल महिन्यांत काबुलाहून निघाले, आणि मे महिन्यांत लंडनास पोंचले. त्यांजबरोबर अमीर साहेबांनीं महाराणीसाहेब व्हिक्टोरिआ, त्यांच्या राजकुलांतलीं आणखी कांहीं मोठीं माणसें, पार्लमेंटाचे कांहीं मोठमोठे सभासद, आणि कांहीं सरकारी वरिष्ट कामदार ह्यांस पत्रें दिलीं होतीं. आणि शिवाय, विशेष गोष्ट ही कीं, विलायतेस नासरुल्लाखानांनीं कोणांशीं कोणत्या रीतीनें वागावें, आणि कोणांशीं काय बोलावें, ह्याविषयीं नियम लिहून देऊन, त्यांवर त्यांनीं, समजल्याबद्दल, नासरुल्लाखानांच्या सह्या घेतल्या होत्या. ते नियम पस्तीस आहेत. त्यांतल्या अगदी मुख्य मुख्य गोष्टी थोड्यांत येथें सांगतों:—

"हिंदुस्थानांत पोंचल्यावर व्हाइसरायांची तुमची मुलाखत होईलच. त्यांस आमचे आणि हबिबुल्लाखानांचे बहुत बहुत सलाम प्रविष्ट करून आह्मीं उभयतानीं तबियत बरी आहेना ह्मणून विचारिलें आहे, ह्मणून कळवावें. आणखी, तुमच्या तैनातीस त्यांच्याकडचा जो कोणी अधिकारी विलायतेस यावयाचा असेल, त्याची ओळख करून घेण्याच्या पलीकडे त्यांपाशीं कांहीं मागूं नये. तुमची आणि व्हाइसरायांची गांठ नच पडली, तर, त्यांचें पत्र घेऊन अधिकारी तुम्हांला येऊन भेटेल. त्या पत्राचें उत्तर तुम्हीं त्यांस मित्र ह्या नात्यानें लिहून पाठवावें."

"विलायतेस पोंचल्यावर महाराणी व्हिक्टोरिआ ह्यांस अगदीं आमच्या इतका मान द्यावा, आणि आमच्याशीं वागतां तसें त्यांशीं मोठ्या प्रतिष्ठित आणि संभावित रीतीनें वागावें. ह्यापेक्षां अधिक मान देणें हें निरर्थक तोंडपुजेपण होईल, आणि

ह्यापेक्षां कमी मान देणें हें उद्धटपण होईल. हें कसें वागायाचें तें तुम्हांस नित्याभ्यासावरून ठाऊकच आहे. "

"महाराणी साहेब, प्रिन्स आफ् वेल्स, आणि ड्यूक ऑफ कॉनाट ह्यांच्या मुलाखती झाल्यावर, त्यांच्याकारितां जे नजराणे दिले आहेत, ते त्यांस प्रविष्ट करावे."

"तुम्हांला त्यांनीं आपलें लष्कर पाहण्यास नेलें, तर त्यांच्या शिपायांस बक्षिसें वगैरे कांहीं देऊं नका; परंतु, लष्कराची तारीफ करून, तें पाहून मला आनंद झाला असें म्हणा. "

"ज्या घरांत, किंवा भोजनगृहांत तुम्ही उतराल, त्या घरातून किंवा भोजनगृहांतून निघून जातांना, तेथल्या नौकर माणसांस, त्यांच्या त्यांच्या योग्यतेप्रमाणें चेरीमेरी द्या. "

"महाराणी सरकाराकडच्या मोठ्या बायका, बडे लोकांच्या बायका, इत्यादि ज्या संभावित स्त्रिया तुमच्या परिचयाच्या होतील, त्या सर्वांस, त्यांच्या योग्यतेप्रमाणें, आंगठ्या, बांगड्या, कंठ्या, इत्यादि वस्तु नजर द्या. त्या पाठवाल, त्यांबरोबर एक एक चिठी असावी, आणि तिजवर अमक्याकडून अमक्यास एवढें मात्र लिहिलेलें असावें. दुसरें कांहीं नसावें. "

"नाट्यशाला, गायनवादनालयें, कारखाने आणि शाळा ह्यांस कांहीं एक देण्याचें कारण नाहीं."

"धर्मांतरानें झालेल्या मुसलमानांच्या लिव्हर्पूलच्या मशीदीस दाहा हजार रुपये द्या. तसेच मुसलमान झालेले लोक जर आपल्या राज्यांत नौकरी मागतील, तर, ते भूदरशास्त्रवेत्ते अथवा खाणींचें शास्त्र जाणणारे असल्यास त्यांस नौकरीवर ठेवा. "

" लंडन शहराजवळ वोकिंग येथें डा. लीट्न ह्यांनीं एक मशीद बांधून संस्था स्थापिली आहे. तिला सर लिपेलसारख्यांचा आश्रय आहे. ती पाहण्यास त्यांनीं तुह्मांला नेलें तर त्यांस त्या मशीदीच्या खर्चास दाहा हजार रुपये द्या."

" तुम्हांला अफगाणिस्थानांत आगगाड्या आणि तारायत्रें चालू करण्याविषयीं जर कोणी कांहीं विचारूं लागले, तर, त्यांस एकच उत्तर द्या कीं, त्या प्रकरणीं बोलण्यास मला अधिकार नाहीं."

" अफगाणिस्थानांतला व्यापारधंदा कमतावला आहे, असें जर तुम्हांला कोणीं म्हटलें, तर त्यांस सांगा कीं, आजपर्यंत तो सगळा परकीयांच्या हातीं होता, तो आलीकडे अफगाण लोकांनीं आपल्या स्वाधीन करून घेतला आहे, त्याची आतां चांगली वृद्धि होईल अशी आशा आहे."

" रशियाचें आणि अफगाणिस्थानाचें कसें आहे असें जर तुम्हांला कोणीं विचारिलें, तर थोडक्यांत फार सावधगिरीनें उत्तर द्या कीं, जर रशिया अफगाणिस्थानाच्या वाटेस जाणार नाहीं, तर अफगाणिस्थानही रशियाच्या वाटेस जाणार नाहीं."

"अफगाणिस्थानच्या लोकांस तेथलें राज्य आवडत नाहीं कीं काय, असें जर तुम्हांला कोणीं विचारिलें, तर त्यांस सांगा कीं, त्यांस तें आवडत नाहीं, असें आमच्या तर कानीं कधीं आलेलें नाहीं; पण, तुम्हांला देखील जर तसें कांहीं कळलेलें नाहीं, तर त्याविषयीं तुम्ही मला विचारूं नका."

"लंडनच्या दरबारीं जर्मनी, आस्त्रिया, इटाली, फ्रान्स, चीन, तुर्कस्थान इत्यादि परकीय राज्यांचे वकील आहेत, त्यांची तुमची जर प्रसंगोपात्त गांठ पडली, तर त्यांपाशीं राज-

कारणाविषयीं कांहींएक बोलूं नका. त्यांचें क्षेमकुशल त्यांस पुसा, ह्मणजे बस्स आहे."

"रशियाचे झार महाराज किंवा त्यांचे वकील ह्यांची जर गांठ पडली, तर त्यांपाशीं एवढेंच बोला कीं, आपल्या राज्याच्या सरहद्दीच्या जवळ आमचे जे अधिकारी आहेत, त्यांस आपणांकडचे अधिकारी फार चांगल्या रीतीनें वागवितात, त्यानें आह्मांस फार संतोष होतो, आणि आपणांस देवानें पुष्कळ आयुष्य देऊन असेंच वागवावें, असें आह्मी इच्छितों."

"तुर्कस्थानचे सुलतान, अथवा त्यांचे चिरंजीव, अथवा इजिप्तचे खेदीव, अथवा झांझीबारचे सुलतान, अथवा मोरोकांचे सुलतान, अथवा इटलीचे राजे जर जाता येतां वाटेंत भेटले, तर, तुह्मी आपली आदबी बरोबर राखून, त्यांपाशीं, साधारण सलामालकीच्या आणि क्षेमकुशलाच्या गोष्टी मात्र मोठ्या प्रेमानें आणि मित्रपणानें त्यांचा मानपान राखून बोला. पण त्यांतल्या त्यांत तुर्कस्थानच्या सुलतानांच्या चिरंजीवांशीं, आपल्या [illegible] भावाप्रमाणें, विशेष प्रेमानें आणि विशेष अगत्यानें बोला, त्यांचें क्षेमकुशल विचारा, त्यांच्या वडिलांचें क्षेमकुशल मीं विचारलें आहे ह्मणून सांगा, आणि आपली गांठ पडली ही देवाची मोठी कृपा झाली, असें त्यांस ह्मणा."

"इंग्रज सरकार तुह्मांला किंवा तुमच्या बरोबरच्या कोणा माणसाला कांहीं पदवी देऊं लागेल, तर, ती नको ह्मणून त्यांस असें सांगा कीं, अमीरमहाराजांची परवानगी घेतल्या-वांचून अशा पदव्या पतकरणें आमच्या राष्ट्राच्या कायद्यास अगदीं विरुद्ध आहे."

" आमची राजवैद्यीण मिस् हॅमिल्टन, तिची बहीण, तिचे दुसरे कोणी आप्त, मि. वालटर, मि. मार्टिन इत्यादि मंडळी जीं पत्रें मजकडे पाठविण्यास तुह्मांजवळ देतील, तीं, तुह्मी न वाचितां, आणि तुह्मीं त्यांचें भाषांतर न करवितां, जशाचीं तशीं आह्मांकडे पाठवावीं. त्यांचीं भाषांतरें येथें आमच्या समक्ष झालीं पाहिजेत हीं पत्रें आणि तुमचें पत्र हीं सगळीं एका पाकिटांत घालून, तें चांगलें मोहोरबंद करून, तें तुह्मीं आपल्या विश्वासू नौकराकडून डांकेंत टाकवावें."

"ह्या आमच्या दरबारांतून पाकीट तुह्मांस जाईल, तें बरोबर मोहोरबंद आहे कीं नाहीं हें आधीं पाहून मग तुह्मीं फोडावें."

"वर सांगितलेल्या आमच्या नौकरांनीं तुह्मांला जर एकादी गोष्ट सांगितली तरी ती लक्षपूर्वक ऐका, आणि ती दुसऱ्या कोणाशीं बोलूं नका."

" जर साधेल तर मि. मार्टिन ह्यांच्या मार्फत आपल्या राज्याकरितां कोणी चांगला खनिजपदार्थविज्ञानी एंजिनियर, नीट करारमदार ठरवून बरोबर आणा. तसा जर तो न मिळाला, तर एक कामदार इंग्लिश सरकारापाशीं मागा. आणि त्यांना सांगा कीं, आमच्या देशांत खाणी पुष्कळ आहेत, ह्मणून आमच्या वडिलांनीं हें साह्य मागितलें आहे. त्यानें आमच्या राज्यास चांगली बळकटी यावयाची आहे."

"तुह्मी मि. मार्टिन ह्यांच्या मार्फत दोन हजारांपासून दाहा हजारांपर्यंत बंदुका आणि त्यांतल्या प्रत्येकाकरितां दोन दोन हजार काडतुसें विकत घ्यावीं."

"संभावित गृहस्थ जवळ असले, आणि विशेषेंकरून कुलस्त्रियां असल्या, ह्मणजे तुह्मी त्यांच्या समक्ष थुंकूं नये, आणि नाकांत बोटें घालूं नये. विड्या ओढायाच्या झाल्या तर कुलस्त्रियांची परवानगी घेऊन ओढाव्या."

"हातमोजे घातलेले असून कुलस्त्रिया शेकहांड करितात, परंतु पुरुषांस तसें करितां कामा नये. ह्मणून, गांठी पडण्याच्या वेळीं, पुरुष आपल्या उजव्या हातांतले मोजे काढून ठेवीत असतात. पण सायंकाळीं हातमोजे घालून शेकहांड करण्यास काहीं हरकत नाहीं."

"लंडनाहून निघून येण्याच्या वेळीं महाराणी व्हिक्टोरिया ह्यांस विनयपूर्वक असें ह्मणा कीं, मला माझ्या वडिलांनीं आपले दर्शनास येण्यास परवानगी दिली, हा मजवर त्यांचा मोठा प्रसाद झाला आहे. त्याप्रमाणेंच आपण कृपा करून मला दर्शन दिलें हाही मजवर फार मोठा उपकार झाला आहे. ह्याबद्दल मी आपले उपकार मानितों. आमच्या वडिलांची एक विनंती आपणांस आहे, ती जर आपण मान्य कराल तर मी मोठ्या आनंदानें आणि मोठ्या लौकिकानें स्वदेशीं परत जाईन. परवानगी असल्यास ती विनंती मी सांगतों. अशा भाषणानें परवानगी मिळाल्यानंतर मग असें बोला कीं, पार्लमेंटाचे सभासद बरोबर स्वारशिबंदी न घेतां, निर्भयपणें अफगाणिस्थानांत अमीरसाहेबांच्या दर्शनास जातात, अमीर साहेबांचा राजवाडा आपल्या घरासारखा समजतात, आणि अफगाणिस्थानच्या राजाचे पुत्र, जसे आपल्या अत्यंत प्रिय आणि पूज्य मातापितरांस भेटावयास मोठ्या प्रेमानें जातात, तसे महाराणी साहेबांच्या दर्शनास

येतात, एवढा स्नेहभाव इंग्लंड आणि अफगाणिस्तान ह्यांच्यामध्यें वृद्धि पावला आहे, हा असाच आणखी वाढो, असें आह्मी देवापाशीं मागतों. अमीरसाहेबांची विनंती एवढीच आहे कीं, अमीरसाहेबाच्या विश्वासू नौकरांपैकीं एक गृहस्थ अफगाणिस्थान दरबारचा वकील ह्मणून महराणीसाहेबांच्या लंडनच्या दरबारीं निरंतर असावा, ह्मणजे त्याच्या द्वारें महाराणी साहेबांचें आणि त्यांच्या कुटुंबाचें क्षेमकुशल अमीर-साहबांस वरचेवर कळण्यास ठीक पडेल, त्याप्रमाणेंच अमीर साहेबाचें जें काय ह्मणणें असेल तें ह्या दरबारास कळवून त्याचें उत्तर आल्यास पाठवून देण्यास सोईचें होईल. एवढीच कायती विनंती आहे ही करण्याकरितां त्यांनीं मला बुद्ध्या पाठविलें आहे. आणि महाराणीसाहेब माझ्या मातुश्रीसारख्या थोर आणि कृपाळू आहेत. एवढी महाराणीसरकारांनीं कृपा करून मान्य केली ह्मणजे, मी आल्याचें उत्तम सार्थक्य होईल, आणि मी मोठ्या आनंदानें मोठा लौकिक मिळवून परत स्वदेशी जाईन."

"बंदुका वगैरे जें सामान तुह्मांस विकत घ्यावयाचें आहे, तें तुह्मीं आपल्या स्वतःच्या नौकरांच्या द्वारें लंडनाहून निघण्याच्या आधीं दोनतीन दिवस विकत घ्या, त्याविषयीं तेथल्या कामदार लोकांस कांहीं एक कळविण्याचें कारण नाहीं. त्याची सगळी किंमत तुह्मी द्या. तेथल्या कामदारांस द्यावयास लावूं नका. इतकें करून त्या वस्तु जर ते आपण होऊन तुह्मांस नजर करतील, तर, त्या घ्या. नको ह्मणूं नका."

"इंग्लिश सरकार जर मला स्वतःला किंवा तुह्मांला कांहीं रोकड किंवा दुसऱ्या वस्तू नजराणे ह्मणून देऊं लागेल, तर

त्या नको ह्मणूं नका. पण, त्यांविषयीं तुह्मी कांहीं गोष्ट काढूं नका."

"तुह्मीं लंडनमध्यें तीन आठवडे राहावें. अधिक राहू नये. परंतु महाराणी सरकार जर आणखी राहून घेतील तर आणखी राहा. कां कीं, पाहुण्यांनीं यजमानाच्या मर्जीप्रमाणें चालावें असा शिष्टसंप्रदाय आहे."

"शोध करा, आणि मक्का आणि मदीना येथें प्लेग वगैरे कांहीं नसेल तर मात्र तेथें जा. असेल तर जाऊं नका. कां कीं, अशा दूषित जागीं आपण जाऊं नये, अशी पैगंबराची आज्ञा आपल्या शास्त्रांत आहे. तेथें गेलेत तर मजविषयीं प्रार्थना करा, आणि यथायोग्य दानधर्म करा."

हे सगळे नियम नासरुल्लाखानांनीं अक्षरशः पाळिले. आणि त्यांचें थोरपणाचें वर्तन पाहून महाराणीसाहेब आणि लंडनचे दरबारी लोक ह्यांस फार संतोष झाला. परंतु, लंडनच्या दरबारीं वकील ठेवण्याविषयीं जी परवानगी अमीरसाहेबांनीं मागितली होती, ती मात्र त्यांस मिळाली नाहीं. ह्याचें त्यांस अतिशयित वाईट वाटलें. त्याविषयीं ते ह्मणाले:— "सगळ्या जगांत फेरफार होऊन तें सुधारणामार्गांत पुढें पुढें जावें, त्याबरोबर ह्या दोन देशांच्या स्थितींतही अंतर पडावें, परंतु आमचीं मनोगतें इंग्लिश सरकारास कळविण्याच्या साधनांत कांहीं फरक पडूं नये, आणि तीं जशाचीं तशींच राहावीं, हें मोठें दुर्भाग्य होय."

डुरांड मिशनाच्यासंबंधानें अमीर साहेबांनीं आपल्या प्रजाजनांच्या माहितीकारितां एक लहानसें पुस्तक छापून प्रसिद्ध केलें. त्यांत एके ठिकाणीं म्हटलें आहे:—"महाराणी

साहेब व्हिक्टोरिया ह्यांच्या दरबाराकडून आणि अधिकाऱ्यांकडून मला तोंडीं आणि लेखी असें वचन मिळालें आहे कीं, आमच्या खजिन्यांत जर एक रुपया शिल्केस असला, तर, त्यांतला अर्धा रुपया तुम्हांस आणि तुमच्या मित्रांस साह्य करण्याच्या कामीं खरचिण्याची आमची तयारी आहे ह्यावरून त्यांच्या आणि आमच्या हिताचा एक जीव किती झाला आहे, आणि त्यांचा आमचा स्नेह किती जमला आहे, हे लक्षांत येईल. आणखी हा स्नेहभाव इतका वाढला आहे कीं, आमच्या उभयतांच्या शत्रूंशीं सामना करण्यास आमचीं हीं दोन्ही राष्ट्रें एक होतील. ह्याबद्दल आम्हांस आणि आमच्या मित्रांस जसा अत्यानंद होत आहे, तसा, ज्यांच्या मनांत आमच्या ह्या दोन राष्ट्रामध्यें वितुष्ट पाडून मौज पाहावयाची होती, त्या आमच्या शत्रूंच्या मनांस अतिशयित खेद होत आहे, आणि निराशा वाटत आहे. ह्या तहनाम्यावर कालच सह्या झाल्या आहेत. त्या संबंधानें तुह्मांला एवढेंच सांगावयाचें आहे कीं, इंग्लिश सरकार हें आमच्या राष्ट्राचें परममित्र झालें आहे, आणि तें तुह्मांस द्रव्य, सैन्यसामुग्री हीं पाहिजेत तितकीं अगदीं फुकट देऊन साह्य करण्यास तयार आहे. तुह्मीं इंग्रज सरकाराशीं तसाच एकनिष्टपणाचा बळकट स्नेहभाव ठेविला पाहिजे. त्या सरकाराची फार इच्छा आहे कीं, तुमचें राष्ट्र प्रबळ व्हावें. असें राष्ट्र तुह्मांस दोस्त मिळालें आहे, हें तुमचें मोठें भाग्य मी समजतों, आणि मी खचीत सांगतों कीं, ह्या स्नेहाचीं फळें तुमच्या राष्ट्राच्या कल्याणास फार फार उपयोगीं पडतील."

अमीर अबदुल रहिमानांस त्यांच्या शेजाऱ्यांचे नेंहमीं फार

भय वाटत असे, आणि त्याविषयीं ते आपल्या जवळच्या लोकांत चमत्कारिक दृष्टांत सांगत असत. एका भाषणांत एकदां ते ह्मणाले—" एक राजहंस एका सरोवरांत पोंहत होता. त्या सरोवराच्या एका बाजूस लांडग्यांची एक मोठी टोळी होती, आणि दुसऱ्या बाजूस एक वाघीण होती. अशा स्थितीमध्यें, तो राजहंस भिऊन ह्मणा कीं कसा ह्मणा, प्रथम वाघीण होती त्या बाजूस गेला. तिनें त्यावर पंजा मारून त्याचे पुष्कळ पंख उपटून टाकिले. नंतर तो दुसऱ्या कडेला लांडगे होते तिकडे गेला. तेव्हां ते सगळे एकदम त्यावर तुटून पडले तेव्हां, तो मोठ्या चपळाईनें त्यांच्या हातून निसटून, पाणी पुष्कळ होतें तिकडे सरोवराच्या मध्यभागीं येऊन स्वस्थ बसला. तेव्हां ते लांडगे एकमेकांच्या आंगावर गुरगुरत होते. आणि सरोवराच्या कडेला पाणी थोडें होतें त्यावरून त्याच्या मनांत आलें कीं, जर हें सरोवर आटलें, तर ती वाघीण कदाचित आपणावर उडी घालील, परंतु, लांडगे तर खचीतच झडप घालतील, आणि मला खाऊन टाकतील" ह्यांच्या दृष्टांताचा रोंख कोणाकडे होता, हें स्पष्ट समजत नाहीं.

असो. एकंदरींत, अमीर साहेबांच्या चित्तास कांहीं स्वस्थता नसे. नेहमीं काळजी वाहावी लागते. आणि सगळें गाडें नीट चालविण्याविषयीं निरंतर दक्ष राहाणें पडे. हेंच राजत्वांत एक फार कठिण व्रत आहे.

# भाग अकरावा.

## अफगाणिस्थानाच्या सरहद्दी.

माणसें करारी असतात, त्यांस डळमळीत असें कांहींएक आवडत नाहीं. प्रत्येक गोष्ट निश्चयात्मक लागते. त्या प्रकारचे राजे अमीरसाहेब होते. त्यांनीं अफगाणिस्थान स्वाधीन करून घेतलें, आंतले दंगे मोडले, लोकांत स्वस्थता स्थापित केली, राज्यव्यवस्था चांगली लाविली, परंत, आपल्या राज्याच्या सरहद्दी त्यांनीं बरोबर ठरवून टाकिल्या नव्हत्या. कां कीं, तें काम कांहीं एकट्याचें नव्हतें. त्यांत संबंध शेजाऱ्यांचा होता. आणखी शेजारी ज्या मानानें प्रबल, दुर्बल आणि सरळासरळ असतात, त्या मानानें त्या कामांत कमजास्त त्रास होतो. हें त्यांस ठाऊक होतें. तरी, हें केल्याशिवाय गत्यंतर नव्हतें, हें ते जाणून होते, ह्मणून त्या कामास ते लागले.

हें सरहद्दी ठरविण्याचें काम फार बिकट असतें, आणि त्यांतही प्रबलदुर्बलांची गांठ पडली ह्मणजे तें फारच कठिण होत असतें, हें त्यांस इतिहासावरून कळलेलें होतें. त्याविषयीं त्यांनी एके ठिकाणीं असें लिहिलें आहे:—“ मोठ्या राजांनीं लहान लहान राज्यें गट्ट करून टाकावीं, हा परिपाठ ह्या शतकांत फार पडला आहे, हें मला ठाऊक आहे. आणि हें साधण्याकरितां ते नानाप्रकारच्या युक्ति लढवीत असतात. आधीं पहिली युक्ति ही कीं, एकादें अशक्त राष्ट्र दोन प्रबल राजांच्या तावडींत सांपडलें ह्मणजे त्यांनीं तें खुशाल आपसांत वांटून घ्यावें. अशा अशक्त राष्ट्रानें त्यांजकडे दाद

मागितली ह्मणजे ते त्याचा न्याय कसा करितात, तें कळण्याकरितां मी एक गोष्ट सांगतों. एका गरीब माणसाचें घड्याळ एका चोरानें चोरिलें. त्या चोराचा नाईक आपणांस न्यायाधीश ह्मणवीत असे, त्याजकडे तो मनुष्य फिर्याद घेऊन गेला. त्यास तो न्यायाधीश ह्मणाला, तें घड्याळ त्याला मिळालें आहे खरें, पण मला तूं काय देतोस तें बोल. त्या गरीब माणसानें उत्तर दिलें, महाराज मी आपणांस कांहीं देण्याकरितां आलों नाहीं; तर माझें जें घड्याळ गेलें आहे, तें परत मिळावें ह्मणून आलों आहें. त्यावर ते चोरांचे राजे ह्मणाले " पण, तें तूं त्याला कां घेऊं दिलेंस ? मी त्याच्यापेक्षां मोठा आहें; तें मला द्यावयास पाहिजे होतें. आतां मला कांहींतरी दे " असें ह्मणून, त्यानें त्याच्याजवळ घड्याळाची सांखळी राहिली होती, ती घेतली. तेव्हां, न्याय मिळण्याच्या आशेनें बिचारा तो माणूस, त्याच्यापेक्षां वरच्या—वरिष्ट—न्यायाधीशाकडे गेला. तेव्हां, त्यानेंही तसाच कोटिक्रम लढवून, त्याच्या हातांतली आंगठी घेतली. तें पाहून त्या गरीबाला असें वाटलें कीं, आपण जर ह्याच्यापेक्षां वरिष्ट न्यायाधीशाकडे गेलों, तो तर आंगावरचे कपडे घेईल, आणि आपणांस उघडें नागवें घरीं जावें लागेल; तें नको. आणि तो बिचारा मनांत अतिशयित खजील होऊन, तडक आपल्या घरीं गेला. दुसरी युक्ति अशी कीं, मोठमोठे राजे एकमेकांशीं संगनमत करून असें ठरवितात कीं, तुम्ही अमका एक देश घ्या, आणि आह्मी अमका घेतो. तुह्मी आमचेकडे पाहूं नका, आणि आम्ही तुमचेकडे पाहात नाहीं. तिसरी युक्ति अशी कीं, मोठ्या राष्ट्रांच्या मर्यादा ठरवितांना, मधलीं लहान

लहान राज्यें तशींच राहूं द्यावयाचीं. त्या वेळीं त्यांस स्वतंत्र म्हणावयाचें. म्हणजे, त्यांस कोणींही हात लावूं नये, असें उभयपक्षीं समजावयाचें. कांहीं वेळानंतर, त्यांतल्या लहान राज्यांत मोठ्या राजानें हळूच प्रवेश करून, त्याला भूलथाप देऊन म्हणावयाचें कीं, तुमचा आमचा स्नेह असला म्हणजे तुम्हांस परचक्राचें भय बाळगिण्याचें कारण नाहीं. तें त्या लहान गरीब राजास प्रथम गोड वाटतें. आणि ह्याप्रमाणें त्यावर छाप बसल्यावर मोठा राजा त्या लहान राष्ट्रांतल्या लोकांत लावालावी करून, आणि राजाचा फार जुलूम आहे अशा तक्रारी उठवून, न्याय करावयाचा आणि शांतता करावयाची असा डौल घालून त्या राष्ट्रास गिळून टाकितो. झालें. बरें, हें पाहून शेजारच्या दुसऱ्या मोठ्या राजानें हें काय म्हणून त्याला विचारिलें. तर, त्यावर उत्तर असें द्यावयाचें कीं, सरहद्दी ठरविल्या त्या वेळीं हें राज्य स्वतंत्र होतें. परंतु नंतर त्यानें आम्हांशी जो तह केला होता, तो ह्यानें मोडिला, म्हणून आह्मांस असें करणें भाग आलें. ह्मणून, आतां तुह्मांला ह्या कामांत हात घालतां कामास नये. झालें. आटपलें." ह्याचीं कांहीं उदाहरणेंही अमीरसाहेबांनीं सांगितलीं आहेत.

आपल्या राज्याच्या मर्यादा ठरवण्याच्या कामांत अमीर साहेबांस चार मोठ्या राष्ट्रांशीं संबंध पडला. इराण, चीन, रशिया आणि इंग्लंड. ह्यापैकीं, इराण आणि चीन ह्यांच्या संबंधानें अमीरसाहेबांनीं आपणच लिहिलें आहे कीं, "ह्या दोन राष्ट्रांच्या आणि आमच्या राष्ट्राच्या सरहद्दी ठरविण्यास तिळभरही त्रास पडला नाहीं. कांकीं, हीं राष्ट्रें बिचारीं गरीब आणि दुर्बल आहेत. त्यांस दुसऱ्याचे मुलुख घेण्याची इच्छा

नाहीं आणि शक्तिही नाहीं. इराणाची आणि अफगाणिस्थानाची सरहद्द कोमलिकासियापासून झुलफिकारपर्यंत रेघ मारून ठरविली, आणि चीनची आणि अफगाणिस्थानाची सरहद्द वाखान आणि सेशन ह्यांवरून अफगाणिस्थानच्या कोंपऱ्या पर्यंत रेषा काढून ठरविली."

परंतु, मुख्य सरहद्दीचें काम तें पुढेंच व्हावयाचें होतें. तें मोठ्या दोन राष्ट्रांशीं होतें. तीं राष्ट्रें ह्मटलीं ह्मणजे रशिया आणि इंग्लंड—येथें इंग्लंड ह्मणजे हिंदुस्थान हें उघडच आहे. अमीरसाहेबांनीं प्रथमतः रशियाची आणि अफगाणिस्थानाची सरहद्द ठरविण्याचें काम हातीं घेतलें. त्यांत मध्यस्थ इंग्लिश सरकार होतें. त्याकरितां एक कमिशन नेमिलें. त्यांत इंग्लिश सरकारच्या वतीचे सर पीटर लम्सडन होते, आणि रशियन सरकारच्या वतीचे जनरल झेलिनाय हे होते. ही कमिशनाची तयारी इ० स० १८८४ च्या जुलै महिन्यांत झाली. त्या संबंधानें, अमीरसाहेबांनीं, सर पीटर लम्सडेन ह्यांस असें लिहिलें कीं, "मी रशियामध्यें असतां, त्या सरकारास मी कांहीं एक वचनें दिलीं नाहींत कीं त्यांशीं कोणत्याही प्रकारचा करार केला नाहीं, ह्मणून माझें वचन मला बाधक होण्याचें भय काडीभर देखील वाटत नाहीं. आणि होतां होईतों अफगाणिस्थानाची बोटभर देखील जमीन रशियास द्यावयाची नाहीं, असा माझा निश्चय आहे. ह्मणून माझा देश आणि रशिया ह्यांच्या मधली सरहद्द कायम करण्यामध्यें तुह्मांला मुळींच कचरण्याचें कारण नाहीं."

ही तयारी पाहून रशियन लोकांस फार राग आला. त्याचें आधीं पहिलें कारण हें कीं, अमीरसाहेबांनीं इंग्लिश

सरकारास मध्यस्थ केलें. तें त्यांना नको होतें. दुसरें कारण आपलें पाऊल पुढें पडण्यास अडथळा करण्यास अफगाणिस्थान भ्यालें नाहीं. आणि तिसरें कारण असें होतें कीं, अफगाणिस्थान आणि रशिया ह्यांच्या मधल्या संस्थानांची वांटणी आपण आपसांत करून घ्यावयाची, त्यांत इंग्लंडाच्या संमतीचें का ण नव्हतें, असें त्यांचें मत होतें. ह्मणून ते, कांहींएक न बोलतां, हळू हळू, रागानें एकएक पाऊल अफगाणिस्थानाकडे यत चालले. पेंजदे घेतलें तेव्हांच त्यांचा हेतु पुढें येण्याचा होता, हें अमीर साहेबांस कळलें होतें, आणि त्यावरून, त्यांस आड येण्यास सैन्य पाठविण्यास मला परवानगी द्या, असें इंग्लिश सरकारास त्यांनीं लिहिलें, आणि असें सुचविलें कीं, लढाई चालू नाहीं, तोंपर्यंत अफगाणिस्थानांत कोठेंही सैन्य ठेवण्यास कांहीं प्रत्यवाय नाहीं. परंतु, इंग्लिश सरकारानें तें ऐकिलें नाहीं. त्याचें अमीरसाहेबांस फार वाइट वाटलें.

सरहद्द ठरविण्याचें काम चालू झालें. आणि इ० स० १८८५ च्या मे महिन्यात व्हाइसरायसाहेबांनीं अमीरसाहेबांस लिहिलें कीं, रशियन लोक पेंजदे कांहीं सोडीत नाहींत, परंतु, त्याच्या मोबदला झुलपिकार हें सोडण्यास तयार आहेत, आणि आतां सरहद्दीची रेषा गुलरान आणि मरुचाक ह्यांच्या उत्तरेकडून जाईल. तें ह्मणणें अमीरसाहेबांनीं मान्य केलें.

कांहीं वेळानें जनरल लम्सडेन ह्यांच्या जागीं कर्नल सर वेस्ट रिजवे ह्यांची नेमणक झाली. ते अंमळ कडक होते असें प्रथम वाटलें. कांकीं, सरहद्दीजवळच्या लोकांजवळ जमिनी संबंधाच्या ज्या सनदा होत्या, त्यांविषयीं ते फार

खाराखीर करूं लागले. परंतु, तें एका प्रकारें फार चांगलें होतें; कां कीं, त्याच्या सनदांच्या विशेष खरेपणाच्या शाबिदीनें अमीरसाहेबांच्या स्वामित्वास अधिकाधिक बळकटी येत गेली. त्यांनीं, फार कटकट न होतां, लवकरच सरहद्द ठरविली, आणि हिंदुस्थानांत परत जाण्याकरितां, कमिशनची सगळी मंडळी इ० स० १८८६ च्या आक्टोबर महिन्यांत अमीरसाहेबांस भेटण्यास काबुलास आली. अमीरसाहेबांनीं त्यांचा फार चांगला आदरसत्कार केला, आणि त्या सर्वांस एक एक सुवर्णपदक सन्मानार्थ बक्षीस दिलें. कर्नल सर वेस्ट रिजवे ह्यांजविषयीं अमीरसाहेबांनीं आत्मचरित्रांत ह्मटलें आहे कीं, " हे फार हुषार राजकारस्थानी पुरुष आहेत, आणि ज्या ज्या कामांत हे पडतील, त्या त्या कामांत हे नांव मिळवितील, अशी माझी खात्री आहे. "

ह्या सरहद्दीच्या तहनाम्यावर रशियन सरकाराचा सहीशिक्का इ० स० १८८७ च्या जुलै महिन्याच्या बाविसाव्या तारखेस झाला, आणि त्याविषयींचें पत्र तारीख एक आगष्ट रोजीं लार्ड डफरिन, गव्हरनरजनरल, ह्यांनीं, अमीर साहेबांस लिहिलें. तेव्हां त्यांस फार संतोष झाला, आणि ह्या कामीं इंग्लिश सरकारानें साह्य पुष्कळ केल्याबद्दल त्यांनीं त्यांचे फार फार आभार मानिले.

पुनः इ० स० १८९३ ह्या वर्षी पाटबंधाऱ्याच्या पाण्यावरून, अफगाण प्रजा आणि रशियन प्रजा ह्यांच्यामध्यें वाद उत्पन्न झाला. त्याचा निर्णय करण्याकरितां हिंदुस्थान सरकारानें कर्नल येट ह्यांस नेमिलें त्यांनीं तें काम दोन्ही पक्षांस खूष ठेवून उत्तम प्रकारें केलें.

सर वेस्ट रिजवे ह्यांच्या कमिशनानें सरहद्द झुल्पिकारपासून क्वाजासालारपर्यंत ठरविली, ती तशीच वर पामीरपर्यंत एकदम ठरवून टाकावी, असें अमीर साहेबांचें ह्मणणें होतें. पण तें कोणीं ऐकिलें नाहीं. आणखी इ० स० १८७३ च्या तहनाम्याप्रमाणें बदकशान वगैरे प्रांत अफगाणिस्थानाच्या स्वाधीन असावे असें ठरलें होतें, तरी, रोशन आणि सिगनान हीं ठिकाणें जीं बदकशानांत आहेत, त्यांच्या माऱ्यांत, हिंदुस्थान आणि रशिया ह्यांच्या मधला रस्ता आहे' ह्मणून बदकशान हें आपले स्वाधीन ठेवण्याविषयीं रशियन सरकारचे बेत चालले होते. परंतु, ही खटपट अमीरसाहेबांस आधींच कळली होती, आणि त्या प्रांतावर त्यांनीं आपले सुभेदार पाठवून आपला अम्मल बसविला होता. त्यावरून रशियन लोकांची आणि अफगाण लोकांची एक लहानशी चकमक झडली. पण तें तेव्हां तितकेंच राहिलें. पुढें डुरांड मिशनाच्या द्वारें ह्या वादाचा निर्णय यथास्थितपणें लागून, त्या प्रांताच्या मोबदला अमीरसाहेबांनीं डार्वाझ हें ठिकाण ताब्यांत घेऊन, त्या प्रांतांतलें सैन्य परत बोलावून आणिलें. पुढें इ० स० १८९५ त थोडीशी आणखीं कांहीं व्यवस्था उभयतां सरकारांच्या सल्ल्यानें झाली. आणि तेव्हांपासून सरहद्दीच्या संबधानें अफगाणिस्थान आणि रशिया ह्यांचा वाद नाहींसा झाला आहे, आणि सगळें ठीक चाललें आहे. त्या विषयीं अमीरसाहेबांनीं आत्मचरित्रांत ह्मटलें आहे-"आमच्या राज्याच्या वायव्येकडच्या सरहद्दीविषयीं आह्मांस मोठी काळजी असे, आणि फार त्रास होत असे, त्यापासून आह्मीं आतां अगदीं मुक्त झालों आहोंत, ह्याबद्दल आह्मी

देवाचे फार फार आभार मानितों! आपल्या प्राण्यांच्या जीवांचें संरक्षण करण्यास परमेश्वर ही शांतता निरंतर अशीच राखो, अशी त्यास आमची प्रार्थना आहे ”

रशियाच्या संबधाची सरहद्द ठरली. तशी, इंग्लंडाच्या ह्मणजे हिंदुस्थानाच्या संबधाची सरहद्द ठरणें आवश्यक होतें. तिकडे अमीरसाहेबांचें लक्ष गेलें. त्यांनीं प्रथमतः लार्ड रिपन ह्यांस आणि मग लार्ड डफरिन ह्यांस असें लिहिलें कीं, आपणांकडील कोणी चांगले हुशार अशा कामदारांचें कमिशन नेमून इकडे पाठवून द्या, ह्मणजे त्यांच्या विद्यमानें तें काम एकदां उरकून टाकूं. तें ह्मणणें व्हाइसरायसाहेबांस पटलें, आणि त्याप्रमाणें तयारीस लागणार इतक्यांत अमीर साहेब आजारी पडले, आणि त्यांच्या राज्यांतल्या तुर्क प्रांतामध्यें ऐझाक ह्यानें बंड केलें, तिकडे त्यास जाणें भाग पडलें. तेव्हां, तें इ० स० १८९० त तितकेंच राहिलें.

नंतर कांहीं वेळानें लार्ड राबर्टस् ह्यांस त्या कामावर कमिशनर नेमल्याविषयीं लार्ड ल्यांडस्डौन, गव्हरनर जनरल, ह्यांचें पत्र अमीरसाहेबांस आलें. तेव्हां अमीरसाहेब हजारो लोकांचें बड मोडण्यांत गुंतले होते. लार्ड ल्यांडस्डौन ह्यांनीं लार्ड राबर्ट्स ह्यांची जी योजना मनात आणिली होती, ती अमीरसाहेबांस पसंत पडली नाहीं. ह्याचें कारण असें कीं, अफगाण लोकांच्या मनांत लार्ड राबर्ट्स ह्यांचें नांव, मागच्या स्वारीच्या वेळेपासून, घोळत होतें, त्यांविषयीं त्यांच्या मनांत द्वेष उत्पन्न झालेला होता, आणि कंदाहार वगैरे ठिकाणीं त्यांचे कितीएक सोयरेधायरे त्यांच्या हातून प्राणास मुकले होते; व तेच लार्ड राबर्टस पुनः अफगाणिस्थानांत येत आहेत असें जर

लोकांस समजलें तर भयभीत व्हावे आणि खवळून जावे, हें साहाजिक होतें, हें अमीरसाहेबांच्या मनांत येऊन चुकलें होतें. शिवाय, स्वतः अमीरसाहेबांचें मत लार्ड राबर्टस ह्यांविषयीं कांहीं वेगळ्या प्रकारचें होतें. त्यांनीं ह्मटलें आहे, "लार्ड राबर्टस हे मोठे योद्धे आहेत, ह्यांत कांहीं संशय नाहीं. परंतु, परराज्यसंबंधाच्या सरहद्दीचा विचार करण्यास आणि त्याविषयीं वाटाघाट करण्यास योद्धा नको आहे, राजकारस्थानी पुरुष पाहिजे आहे. आणखी राज्याची सरहद्द कशी तरी पुढें पुढें सरकावीत न्यावयाची हें ज्यांचें ब्रीद आहे त्या लार्ड राबर्टस् ह्यांसारखे पुरुष तर अशा कामावर कदापि योजूं नयेत. शिपायांच्या बाह्या लढाईकरितां फुरफुराव्या, आणि राजकारस्थानी पुरुषांनीं, लढाया टाळून, युक्तीच्या पोटीं, तोडजोड काढून, शांतता ठेवण्याचा प्रयत्न करावा, हे व्यापार स्वभावानुरूपच आहेत."

ह्या सरहद्दीच्या निर्णयाच्या संबंधानें व्हाइसरायांकडून अमीरसाहेबांस वारंवार निकडीचीं पत्रें जात असत. त्यांतल्या एका पत्रांत तर असें ह्मटलें होतें कीं, "अमीरसाहेबांच्या वचनांच्या संबंधाचा काळ अनियमित आहे, त्याची वाट हिंदुस्थान सरकार ह्यापुढें पाहाणार नाहीं. कांहीं वेळानंतर त्यांस योग्य दिसेल तशी व्यवस्था ते करतील." हें पत्र पोंचलें तेव्हां अमीरसाहेब फार आजारी होते. ह्मणून त्यांनीं सरदार अबदुल्लाखान तोखी आणि मिरमुनशी सुलतान महंमदखान ह्यांस असें सांगितलें कीं, आपल्या राज्यांत जे इंग्लिश जातीचे कामदार आहेत, त्यांतला कोणी; चांगला हुशार असा गृहस्थ नामदार व्हाइसराय साहेबांकडे पत्र घेऊन जाण्यास निवडून

काढा, ह्मणजे हें प्रकरण विकोपास जाणार नाहीं. त्याप्रमाणें त्यांनीं एंजिनियर पैनसाहेबांची योजना त्या कामावर केली. आणि त्यांबरोबर अमीरसाहेबांनीं व्हाइसराय साहेबांस पत्र दिलें कीं, "पैनसाहेब हें पत्र घेऊन आपणांकडे जात आहेत, हे कमिशनाच्यासंबंधानें आमचे विचार आपणांस कळवितील." हें पत्र केवळ हिंदुस्थानच्या इंग्लिश अधिकाऱ्यांची कोणीकडून तरी मर्जी राखण्याकरितां लिहिलें होतें. हें पत्र घेऊन पैनसाहेब काबुलाहून निघाले, त्यांस अमीरसाहेबांची मुळीं सांगीच अशी होती कीं, जाण्यासवरण्यांत जितका उशीर करवेल तितका करून हें कमिशनाचें काम लोटवेल तितकें दिवसगतीवर लोटावें. हा एवढा क्रतु रचण्याचा मुख्य हेतु एवढाच होता कीं, लार्ड राबर्टस् ह्यांची हिंदुस्थानांतून निघून जाण्याची वेळ जवळ आली होती, त्या वेळीं ते तिकडे निघून जावे, आणि अफगाणिस्थानांतल्या कमिशनाच्या कामावर दुसऱ्या कोणाची तरी योजना व्हावी. तें साधलें. वेळ होतांच लार्ड राबर्टस विलायतेस निघून गेले, आणि जातांना अमीरसाहेबांस त्यांनीं पत्र लिहिलें कीं, मला अफगाणिस्थानांत यावयास सापडलें नाहीं ह्याचें मला फार वाईट वाटतें. हें वाचून अमीरसाहेब मनांत काय ह्मणाले असतील बरें! व्यवहारनीति आहे!

सरहद्द ठरविण्याचा जो नकाशा व्हाइसराय साहेबांनीं अमीरसाहेबांकडे अवलोकनार्थ पाठविला, त्यांत हिंदुस्थान आणि अफगाणिस्थान ह्यांच्यामधील संस्थानें—ह्मणजे वजीरी, न्यूचामण, चेघे, बुलदखेल, महंमदआस्मार, आणि चित्रळ

हीं हिंदुस्थान सरकारच्या ताब्यांतलीं अशीं दाखविलीं होतीं. त्याविषयीं अमीरसाहेबांनीं व्हाइसराय साहेबांस एक भलें लांबलचक पत्र लिहिलें. त्यांत असें होतें:—" हीं संस्थानें आहेत, त्या सगळ्यांस यागिस्थान ह्मणतात. हीं जर माझ्या स्वाधीन असलीं, तर प्रसंग पडल्यास, ह्यांतले लोक माझ्या शत्रूंशीं आणि इंग्लंडाच्या शत्रूंशीं लढतील, असें मी करीन. आणखी हे लोक मोठे शूर आणि जबरदस्त योद्धे आहेत, ते इंग्लिशांच्या राज्यावर अथवा अफगाणिस्थानांवर जे कोणी चढाई करून येतील, त्यांशीं मोठ्या निकरानें लढतील. मी त्यांस गोडीगुलाबीनें हळूहळू अगदीं गरीब प्रजा करीन, आणि इंग्लंडाचे मित्र करीन; पण तुह्मीं जर त्यांना माझ्यापासून तोडलेत, तर ते तुमच्या उपयोगीं पडावयाचे नाहींत, आणि माझ्याही उपयोगीं पडावयाचे नाहींत. तुह्मांला नेहमीं त्यांशीं लढावें, झगडावें लागेल, आणि ते लुटालूट करीत जातील. तुमच्या राज्यांत शांतता आणि सैन्य चांगलें प्रबळ आहे तोंपर्यंत, त्यांस मारूनमुटकून कसे तरी तुह्मी दाबांत ठेवाल. परंतु जर सरहद्दीवर एखादें परचक्र आलें, तर हे लोक लागलेच त्याला जाऊन मिळतील. " हा विचार व्हाइसराय साहेबांस पसंत पडला नाहीं. त्यांनीं तीं संस्थानें आपणांकडे घेतलीं. ह्यांत कांहीं विशेष नाहीं. राजकारण आहे. हीं संस्थानें आपणांकडे ठेवण्याविषयीं अमीरसाहेबांचीं जशीं कारणें होतीं, तशीं तीं आपलेकडे घेण्याविषयीं इंग्लिश सरकारचींही कारणें होतीं, तीं कारणें अमीरसाहेबांनीं स्पष्ट सांगितलीं, आणि इंग्लिश सरकारानें स्पष्ट सांगितलीं नाहींत, एवढेंच काय तें अंतर आहे. बाकी, राजकारणांत शाहाणीं माणसें आपलें

बलाबल पाहून कामाला हात घालीत असतात. त्यांत तीं इतरांचें ऐकत नाहींत, आणि प्रतिपक्षाचें तर नाहींच नाहीं.

ही सरहद्द ठरलेली नसल्यामुळें हिंदुस्थान आणि अफगाणिस्थान ह्यांच्या दरम्यानच्या लहानसाहान संस्थानांवरच्या चक्रवर्तित्वाविषयीं वारंवार वाद उत्पन्न होतात, ते होऊं नयेत, आणि कोणाचा अंमल कोठपर्यंत हें नक्की ठरलेलें असावें, ह्याकरितां अमीरसाहेबांनीं तें काम करण्यास कमिशन नेमण्याविषयीं इंग्लिश सरकारास विनंती केली. त्यावरून त्यांनीं सर मार्टिमर डुरांड साहेबांच्या हाताखालीं मंडळी देऊन त्यांचें कमिशन नेमिलें. हे सर मार्टिमर डुरांड साहेब फार धूर्त आणि अत्यंत कार्यदक्ष होते. ते राजकारणांत फार कुशल होते. ते सगळी तयारी करून बरोबरच्या लोकांसहवर्तमान, इ० स० १८९१ च्या सप्तंबरच्या १९ व्या तारखेस पेशावराहून निघाले. ते सुरक्षितपणें काबुलास येऊन पोंचले. त्या मिशनाच्या आदरातिथ्यास अमीर साहेबांनीं जनरल गुलाम हैदरखान ह्यांस नेमिलें. त्यांनीं त्या कमिशनास उतरण्यास हबिबुल्लाखानांचा वाडा दिला, आणि त्यांची बडदास्त उत्तम ठेविली. आगतस्वागताचा पहिला दरबार झाल्यावर कमिशनाच्या कामास सुरवात झाली. डुरांड साहेब जसे मोठे राजकारणी पुरुष होते, तसे ते फारशी भाषेंत अत्यंत प्रवीण होते. त्यांचें आणि अमीर साहेबांचें बोलणें चालू झालें. तें एका मोठ्या भव्य दिवाणखान्यांत होत असे. तें सगळें फारशी भाषेंत होत होतें, आणि केव्हांकेव्हां मध्यें इंग्लिशही बोलत असत. तें शब्दशः टिपून घेण्याकरितां, दुसऱ्या कोणासही अगदीं बिलकुल कळूं न

देतां, अमीरसाहेबांनीं, जवळच पडद्यांच्या आंत, मीर मुनशी सुलतान महंमदखान ह्यांस बसविलें होतें. शेवटीं मर्यादरेषा एकदांची ठरली. ती चित्रळावरून आणि बारोघिल घांटावरून पेशावरावर जाऊन, तेथून कोमलिकारल्याकडे गेली. तीवरून कखान, काफरिस्थान, आस्मार, लापुरा, आणि वजिरिस्थानाचा कांहीं भाग इतकीं अमीरसाहेबांच्या अमलांत आलीं, आणि अमीरसाहेबांनीं बाकीचें वाजिरिस्थान, बुलडखेल, कुराम, आफ्रिडी, बाजाअर, स्वात, बन्नर, दिर, चिलास आणि चित्रळ हीं इंग्लिश सरकाराकडे दिलीं.

ह्या सरहद्दनाम्याच्या दोन प्रती केल्या. त्यांवर अमीरसाहेबांची आणि कमिशनाचीं शिक्केमोर्तबें झालीं. आणखी शिवाय असें ठरलें कीं, अमीरसाहेबांनीं इतक्या संस्थानांवरचा आपला अधिकार सोडिला, त्याकरितां, त्यांस पूर्वीपासून जे बारा लाख रुपये इंग्रजसरकाराकडून मिळत होते, ते ह्यापुढें अठरा लाख द्यावे. आणखी असें ठरलें कीं, इंग्रज सरकारानें अमीरसाहेबांस दारूगोळा वगैरे युद्धसामुग्री द्यावी, आणि त्यांस शस्त्रास्त्रें विकत घेण्यास आणि आपल्या देशांत नेण्यास मोकळीक असावी.

कमिशन काबुलाहून निघून जाण्याच्या आधीं दोन दिवस कमिशनाचे सगळे सभासद, त्यांचे फारशी चिटणीस अब्दर रहिम, अफजलखान, काबुलांतले इंग्लिश सरकारचे एजंट आणि नवाब इब्राहिमखान ह्यांस हाबिबुल्लाखानांनीं आपणांकडे मेजवानीस बोलाविलें. तेथें त्यांचा आदरसत्कार करण्यास नासरुल्लाखान आणि मुख्य सेनापति गुलाम हैदरखान हेही होते.

नोव्हेंबरच्या १ ३ व्या तारखेस अमीरसाहेबांनीं, आपले सरदार, उमराव, मानकरी, आणि मोठमोठे मुलकी आणि लष्करी कामदार बोलावून मोठा दरबार भरविला. त्यास त्यांचे उभयतां चिरंजीवही आले होते. तेथें अमीरसाहेबांनीं मोठें भाषण करून, ह्या कमिशनांत जें काय ठरलें होतें, तें सर्व तपशीलवार सांगितलें. आणि कमिशनाचें काम इतकें चांगलें झाल्याबद्दल आपला आनंद प्रदर्शित करून ते शेवटीं ह्मणाले:—"ह्या दोन राष्ट्रांचा इतका चांगला स्नेह आतां जमला आहे, ही देवाची मोठी कृपा आहे. ती बद्दल त्याचे उपकार मानिले पाहिजेत. त्याप्रमाणेंच डुरांड साहेबांनीं आणि त्यांच्या मंडळींनीं आपलें काम उत्तम केलें, त्याबद्दल त्यांचेही आभार मानिले पाहिजेत." त्यांच्या मागून डुरांड साहेबांनीं भाषण केलें. त्यांत त्यांनीं असें सांगितलें कीं, "आपण केलेले ठराव व्हायसराय साहेबांस पसंत पडून त्यांना आनंद झाला आहे, अशी आह्मांस तार आली आहे. त्याप्रमाणें, ह्या सरहद्दनाम्याविषयींची आपली पसंती लार्ड किंबर्ले ह्यांनीं पार्लमेंटांतही बोलून दाखविली आहे."

कमिशनानें केलेल्या ठरावांच्या नकला सभेस आलेल्या सगळ्या मंडळीस वांटिल्या. त्या पाहून त्यांस मोठा संतोष झाला, आणि अफगाणिस्थान व इंग्लंड ह्यांचें सख्य झाल्याबद्दल त्यांनीं मोठा आनंद प्रदर्शित केला. ह्या कमिशनाच्या मंडळीवर अफगाण लोक फार खूष झाले, आणि त्यांचा सन्मान करणें हें मोठें भूषण आहे, असें त्यांस वाटलें. त्या मंडळीस कांहीं देणग्या द्यावयाच्या होत्या, त्या नेऊन देण्याविषयीं चांगले मोठमोठे कामदार उत्सुक झाले. शेवटीं तीं बक्षिसें त्यांनीं

मीर मुनशींच्या हातीं त्यांजकडे पावतीं केलीं. तीं त्यांनीं मोठ्या आदरानें स्वीकारिलीं, आणि त्यांबद्दल अमीरसाहेबांचे फार फार आभार मानिले. नंतर तें कमिशन हिंदुस्थानास येण्यास तारीख १४ नोव्हेंबर रोजीं काबुलाहून निघालें.

---

# भाग बारावा.

## इंग्लंड, रशिया आणि अफगाणिस्थान.

हा विषय अमीर साहेबांच्या चरित्रांत फार महत्वाचा आहे. कां कीं, त्यांच्या राज्याच्या आबादानीचा निकट संबंध ह्याशीं आहे. अमीर साहेबांचीं शेवटचीं पांच साहा वर्षें ह्याच्या विचारांत गेलीं, आणि त्यांनीं, वेळोवेळीं आपले अभिप्राय त्याविषयीं प्रगट केले आहेत. आणि त्यांत राजकारण अतिशयित आहे. त्या सगळ्याचें विवेचन करण्याची आमची इच्छा नाहीं. परंतु, ह्याविषयीं त्यांचे विचार प्रसंगोपात त्यांच्या भाषणांत बाहेर पडत, त्यांतलीं कांहीं कांहीं तुटक तुटक वचनें येथें सादर करितों.

लहानपणापासून इ० स० १८८० पर्यंत माझा सगळा वेळ रशियांत, रशियाच्या आसपासच्या चिनांत, आणि इराणच्या आसपासच्या प्रांतांत, भटकण्यांत गेला आहे, आणि इ० स० १८८० पासून आजपर्यंत राज्य करण्यांत गेला आहे. ह्या मुदतींत इंग्लंड आणि रशिया ह्या दोन राष्ट्रांची मला चांगली माहिती झाली आहे.

आशिया खंडांतलें रशियन सरकाराचें राजकारण पाहिलें ह्मणजे असें दिसतें कीं, आशिया खंडांतलीं मुसलमानी राज्यें अजिबात नाहींतशीं करून टाकावीं, असें राशियाच्या मनांत आहे. आणि तीं राज्यें ह्मटलीं ह्मणजे तुर्कस्थान, इराण आणि अफगाणिस्थान हीं होत.

हीं राज्यें गिळंकृत करण्यास जर रशियास सांपडलें नाहीं, तर, निदान, तीं इंग्लंडाच्या स्नेहांतून काढून आपणांकडे वळवून घेण्याचा प्रयत्न तो खचीत करील.

हीं आपणाकडे वळवून घेण्याचा त्याचा डाव फसला, तर त्या तिघांमध्यें आणि इंग्लंडामध्यें वैमनस्यें आणि कलह माजविण्याचा प्रयत्न रशिया करील.

तें जर त्याला साधलें नाहीं, तर शेवटची युक्ति ही करील कीं, त्या तिघांमध्यें मत्सर आणि कलह आणि द्वेष उत्पन्न करील तें एवढ्याच हेतूनें कीं, त्यापासून आपला आणि इंग्लंडचा डाव साधावा.

हे सगळे राशियाचे हेतु मला रशियांत असतां, त्या सरकारच्या मोठमोठ्या कामदारांशीं वादविवाद करतां करतां कळलें, तेव्हां, मी आफगाणिस्थानचा राजा होईन, आणि रशियन सरकारच्या विरुद्ध इतका होईन, हें त्या कामदारांच्या स्वप्नींही नव्हतें.

रशियाचा वकील लंडनच्या दरबारास असें सांगत होता कीं, रशियाच्या मनांत इंग्लंडाशीं मोठ्या सख्यानें राहावयाचें आहे. आणि इकडे शेरअल्लीशीं रशियन सरकारचे दुसरे कामदार नाना प्रकारचीं खलबतें करून शेरअल्लींचे कान इंग्लिश सरकाराविषयीं भ्रष्ट करीत

होते. ह्याविषयीं एक दृष्टांत आठवतो. एक माणूस आपणांस दलाल ह्मणवीत असे. तो घरवाल्या माणसांपासून आणि घरफोड्या चोरांपासूनही दलाली घेत असे. तो चोरांना ह्मणे " तुह्मी बेलाशक अमक्या तमक्या घरांत शिरून चोरी करा, त्यांत तुह्मांला इतक्या किंमतीचा माल सांपडेल, त्यावर मला कमिशन इतकें द्या, ह्मणजे झालें." आणि तिकडे घरधन्यास जाऊन सांगे कीं, " रात्रीं तुमचे घर फोडण्यास चोर यावयाचे आहेत. सावध राहा. पण, मी तुह्मांला कधीं इशारा केला ह्याबद्दल मला कायती दलाली द्या ह्मणजे झालें."

मुसलमानी राज्यें आशियांत आहेत, त्यांविषयीं इंग्लंडची बुद्धि अगदीं वेगळ्याच प्रकारची आहे. इंग्लंडाची अशी फार इच्छा आहे कीं, हीं मुसलमानी राज्यें चांगलीं बळकट आणि स्वतंत्र व्हावीं. परंतु, ह्या विचारांत, अधिकारारूढ माणसें असतात त्यांच्या बुद्धीप्रमाणें फरक पडत असतो. इंग्लिश सरकाराला असें वाटत असतें कीं, हीं आशिया खंडांतलीं मुसलमानीं राज्यें आपलें हिंदुस्थानांतलें राज्य आणि रशिया ह्यांच्यांमध्यें मोठ्या भक्कम भिंती आहेत. ह्या जितक्या चांगल्या राहातील तितक्या आपणांस इष्टच आहेत.

पृथ्वींतल्या सगळ्या मुसलमानांस रशियापेक्षां इंग्लंडाशीं सख्य करणें हें अधिक आवडतें, ह्यांत कांहीं संशय नाहीं. ह्यांतलें कारण असें आहे कीं, इंग्लंडाशीं सख्य ठेवल्यानें आपणांस कोणत्याही प्रकारचा त्रास व्हावयाचा नाहीं, अशी त्यांची खातरी आहे. म्हणून त्यांच्या कितीही जरी तक्रारी असल्या, तरी ते रशियाशीं सख्य कधींही करणार नाहींत.

धर्माच्या संबंधानें तुर्कस्थान, इराण आणि अफगाणिस्थान ह्यांचें बंधूचें नातें आहे. त्याविषयीं एक सूचना करावयाची आहे. ती जर त्यांनीं मान्य करून अमलांत आणिली, तर तिघांसही मोठे लाभ होतील. ती सूचना ही कीं, ह्या तिन्ही राज्यांच्यामध्यें परस्पर प्रेम आणि सख्य वाढण्यास, ह्यांच्या राजधान्या आगगाडीच्या रस्त्यानें जोडाव्या. म्हणजे, ह्या राजधान्यांत जाण्यायेण्यास आगगाड्या असाव्या. ह्या कामास इंग्लंडाचें साह्यतर अवश्य पाहिजे आहे. आणि त्याच्या सह्यानें हें काम लवकर होणार आहे. तें इंग्लंडानें होईल तितकें लवकर करावें.

अशिआखंडांतल्या मुसलमानी राज्यांचा एकजीव असणें हें इंग्लिश सरकारच्या हिताचें आहे. कसें तें पाहा. इ० स० १८७७ त अमीर शेरअल्ली हे इंग्लिशांशीं धर्मयुद्ध करण्याच्या विचारानें हिंदुस्थानाच्या सरहद्दीवर सैन्य जमा करीत असतां, एक मुसलमान, तुर्कस्थानकडचा वकील म्हणून त्यांकडे गेला, आणि इंग्लिशांशीं युद्ध करूं नका म्हणून त्यांस आग्रह करूं लागला. त्याप्रमाणें त्यांनीं सैन्य जमा करण्याचें तकूब केलें. तेव्हां इंग्लिश सरकारास वाटलें कीं, तुर्कस्थानच्या सुलतानांच्या निरोपाचा हा परिणाम असावा. परंतु अमीरसाहेबांस प्रत्यक्ष सुलतानांकडून कांहीं पत्र वगैरे आलें नाहीं, त्यावरून त्या वकीलाविषयीं त्यांस संशय आला, आणि त्यांत, रशियाच्या पक्षाचे जे लोक त्या दरबारांत होते, त्यांनीं अमीरांस असें सांगितलें कीं, सुलतान हे आपल्या दरबारी लोकांच्या हातानें पाणी पिणारे आहेत, आणि त्यांत स्वतः सुलतानांचें कांहीं नाहीं. आणखी त्यांनीं

अमीराच्या मनांत असें भरवून दिलें कीं, सुलतानांचा वकील ह्मणून जो आला आहे, तो इंग्लिशांनीं पाठविलेला हेर आहे. हें अमीरसाहेबांस खरें वाटलें. आणि खरा प्रकार काय आहे तो सुलतानांस न विचारितां, त्या वकीलाचें ह्मणणें कानामागें टाकिलें. हेंच जर तारायंत्राचें दळणवळण अफगाणिस्थान आणि तुर्कस्थान यांच्यामध्यें असतें, तर असें संशयित कांहीं राहिलें नसतें. सगळा निर्णय चांगला झाला असता. आणि त्यापासून अफगाणिस्थान आणि इंग्लंड ह्या दोघांचा फायदा झाला असता.

अफगाणिस्थान आणि हिंदुस्थान ह्यांचें सख्य आहे, आणि आपलें दोघांचें हित तें एकच आहे असें जोंपर्यंत त्यांस वाटत आहे, तोंपर्यंत रशियानें अफगाणिस्थानावर अथवा हिंदुस्थानावर स्वारी करण्याचें कधीं मनांत देखील आणूं नये. कधींही यश यावयाचें नाहीं.

जर कधीं इंग्लंड आणि रशिया ह्यांचें युद्ध जुंपलें, तर मुसलमानी राष्ट्रें आणि मुसलमान लोक हीं इंग्लंडास मिळतील. रशियाला कधीं मिळावयाचीं नाहींत. ह्याचें मुख्य कारण असें कीं, इंग्लिशांच्या अमलामध्यें धर्मस्वातंत्र्य परिपूर्ण आहे, तें त्यांस फार प्रिय आहे. इराणावर रशियाचें वजन फार आहे, असें जे कोणी समजतात, ते चुकतात. तसा प्रकार मुळींच नाहीं.

आज चाळीस वर्षे ग्रंथकार लिहीत आहेत कीं, अफगाणिस्थानाची लोकसंख्या ५०,००,००० आहे, आणि तींत लढाऊ लोक ३५,००० आहेत. ह्या आंकड्यांत कधीं कमजास्त झालेलें दिसत नाहीं. हे आंकडे आज इतकीं वर्षे

एकसारखे राहावे, हें विलक्षण नव्हे काय? लोकसंख्या कमजास्त झाली नसेल काय? सैन्य कमजास्त झालें नसेल काय? परंतु, ह्या कामीं मी त्या ग्रंथकारांचा दोष समजत नाहीं. कां कीं आंकडे त्यांस बरोबर कळण्यास कांहीं मार्गच नाहीं. परंतु, आपणांस हें नक्की कळलें असें दाखवून ते लोकांस फसवितात. ह्याचें वाईट वाटतें.

अफगाणिस्थानाला दुसऱ्याच्या आधाराशिवाय आपलें संरक्षण करण्याचें सामर्थ्य नाहीं. ह्याच्यावर परचक्र आलें, तर, ह्यास कोणत्या तरी एका मोठ्या राष्ट्राचें साह्य घेणें भाग आहे. ह्मणून त्यानें शेजारच्या दोहोंपैकीं कोणातरी एकास धरून चालावें. नाहींतर, जो माणूस एक पाय ह्या होडींत आणि एक पाय त्या होडींत ठेवून नदीपार जाण्याचा प्रयत्न करितो, तो कोठें तरी नदींत पडून मरतो, तसें व्हावयाचें.

सध्याच्या स्थितीमध्यें अफगाणिस्थानानें इंग्लंडाच्या आश्रयानें राहावें, हें योग्य आणि आवश्यक आहे. कां कीं, इंग्लंडाच्या मनांत इराणावर किंवा तुर्कस्थानावर स्वारी करावयाची नाहीं आहे. ती स्वारी करावयाची असती, तर त्यास रस्ता अफगाणिस्थानांतून लागला असता. आणखी दुसरें असें आहे कीं, इंग्लंडाचें आरमार फार जबरदस्त आहे. आणि, तितकें कारण पडल्याखेरीज, त्याच्या मनांत रशियाशीं जमिनीवर सामना करावयाचा नाहीं आहे. ह्मणून अफगाणिस्थान हें चांगलें बळकट स्वतंत्र राज्य असावें— ह्मणजे तें रशियाच्या आणि आपल्यामध्यें बळकट भितींसारखें उपयोगीं पडेल, असें त्यास वाटतें. आणि तें बरोबर आहे.

ह्या दोन बलाढ्य शेजाऱ्यांस कोणत्या तरी प्रकारें संतुष्ट ठेवावें, आणि कोणालाही दुखवूं नये, हें त्याला अत्यंत 'इष्ट आहे.

कारण पडल्यास सध्यां एका आठवड्याच्या आंत मला हिरात येथें १,००,००० सैन्य जमवितां येईल. रशियाच्या ताब्यांतल्या तुर्कस्थानांतले सगळे लोक माझ्या मुठींत आहेत. ह्मणून, मी गादीवर आहें तोंपर्यंत हिरातावर हल्ला करणें हें फार मोठें धाडस आहे, हें रशियन सरदारांनीं नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे.

इंग्लंडानें इराण आणि तुर्कस्थान ह्यांच्याकडे दुर्लक्ष करून राहूं नये, त्या राष्ट्रांमध्यें रशियनांचें वजन पडूं नये, अशी तजवीज त्यांनीं योजिली पाहिजे. आणखी मी पूर्वीं सांगितलें आहे त्याप्रमाणें इराण, तुर्कस्थान आणि अफगाणिस्थान ह्यांचें सख्य जमविण्याविषयीं इंग्लंडानें प्रयत्न केले पाहिजेत.

इंग्लंड आणि अफगाणिस्थान ह्यांनीं आपलीं सैन्यें नेहमीं जय्यत तयार ठेवून, शत्रूशीं टक्कर देण्यास सिद्ध असावें. त्याप्रमाणें ह्या दोन राष्ट्रांनीं आपल्या प्रजांस विद्या शिकवावी, त्यांस संपत्तिमान करावें, आणि त्यांस संतुष्ट ठेवावें. आजारी पडल्यावर औषधें घेत बसण्यापेक्षां आधीं पौष्टिक घेणें चांगलें. एका कवीनें म्हटलें आहेः—

"शांतता राखावी अशी जर इच्छा असली, तर सैन्याची तयारी ठेवा, आपल्या प्रजांस विद्या शिकवा, त्यांस सधन करा आणि त्यांस संतुष्ट ठेवा. कांकीं, राज्याच्या बळकटीचा मुख्य

पाया तो आहे. प्रजा ह्या भिंती आहेत. आणि राज्याचीं पांखीं त्यांवर टेंकून राहावयाचीं आहेत."

अफगाणिस्थानाची उन्नति होण्यास उत्तम मार्ग म्हटला म्हणजे त्यांतल्या लोकांतले उद्योगधंदे वाढवावे, त्यांचा व्यापार सुधरावा, आणि लोकांस पोटाला मिळविण्याचें सामर्थ्य देऊन त्यांस संतुष्ट ठेवावें हा आहे. दुसरा मार्ग हा आहे कीं, राजा आणि प्रजा ह्यांचें सख्य करावें, त्यांच्या वृत्ति जाणून त्यांच्या दुःखांचें निवारण करावें, त्या सर्वांना एकसारखे हक्क द्यावे, त्यांत जातिधर्माचा कांहीं एक भेद ठेवूं नये. रशियाच्या ताब्यांतल्या तुर्कस्थानांत रशियानें ही व्यवस्था फार चांगली ठेविली आहे, ती मला पसंत वाटते. तेथले तुर्कलोक, रशियनांप्रमाणें कर्नलच्या किंवा जनरलच्या जागेपर्यंत चढतात आणखी त्यांच्यांत बेटी व्यवहारही आतां बराच वाढत चालला आहे.

रशियन लोकांचे मजवर पुष्कळ उपकार झाले आहेत. म्हणून त्यांस निराशा वाटेल असें सांगणें माझ्या जीवावर येतें आहे. परंतु, ते माझे मित्र आहेत, त्या पक्षीं खरें खरें आहे तें सांगणें भाग आहे. अफगाणिस्थान अनुकूल झाल्याशिवाय हिंदुस्थानावर स्वारी करणें हें रशियास अगदीं अशक्य आहे; आणि ह्या स्वारीच्या कामांत अफगाणिस्थान रशियास सहाय्य होणें हें त्याहीपेक्षां अधिक अशक्य आहे. मी रशियनांचा खरा मित्र आहे. आणि शिवाय त्यांचे मजवर फार उपकार झाले आहेत, ह्मणून मी जो उपदेश त्यांना करितों आहें, तो त्यांनीं अवश्य ऐकावा, असें त्यांस माझें सांगणें आहे. त्यांनीं हिंदुस्थानावर स्वारी करण्याच्या भरीस

कदापि पडूं नये. आणि जर त्यांनीं हें साहस केलें, तर त्यांची अवस्था एका गोष्टींतल्या रोडक्या माणसासारखी होईल. ती गोष्ट अशी:- एक माणूस अतिशयित रोडका—हातापायांच्या काड्या—असा होता. त्याच्या बायकोस नेहमीं असें वाटे कीं, आपले यजमान चांगले गुबगुबीत व्हावे. त्या माणसास गांधीलमाशांशीं खेळण्याचा फार नाद असे. आणि त्याची बायको त्यांशीं न खेळण्याविषयीं त्याला वारंवार सांगत असे, तरी तो त्याजकडे लक्ष देत नसे. एके दिवशीं त्या गांधील माशा खिजल्या, आणि त्या माणसाच्या तोंडास मनस्वी डसल्या. त्याच्या योगानें, तो घरीं येतो तों, त्याचें तोंड सुजून लठ्ठ झालें. तें पाहून त्याच्या बायकोला बरें वाटलें, आणि तुह्मी एकदम इतके लठ्ठ कसे झालां, असें त्यास तिनें विचारिलें. त्यानें सांगितलें कीं, मला गांधीलमाशा चावल्या आहेत, त्यामुळें हें सुजलें आहे, आणि मला त्याच्या वेदना मनस्वी होत आहेत. तें ऐकून त्याची बायको देवाकडे वळून हात जोडून ह्मणाली "देवा, ह्यांचें दुःख एवढें जाऊं दे, पण सूज तशीच राहूंदे" परंतु, सगळें त्याच्या उलट झालें. ह्मणजे, कांहीं वेळानें सूज उतरून गेली; परंतु, त्या गांधिलमाशांचें विष रक्तांत भिनलें होतें, त्याच्या वेदना तशाच चालल्या. रशियानें हिंदुस्थानावर स्वारी करण्याचा प्रयत्न केला, तर असा परिणाम होईल. ह्मणजे, त्यांना हिंदुस्थान तर मिळवयाचें नाहींच, परंतु, लढाईचीं दुःखें मात्र पुष्कळ दिवस भोगावीं लागतील.

इंग्लंडाजवळ रशियाच्या इतकी सेना नाहीं, ही गोष्ट खरी आहे. परंतु, तेवढयावर जाऊन उपयोगीं नाहीं. इंग्लिश

सरकाराची प्रजा राजसेवेस इतकी वाहलेली आहे कीं, त्याचे जों जों अधिकाधिक मोड होतात, आणि त्यांचे लोक समरांगणीं पडतात, तों तों त्यास राजनिष्ठेचें स्फुरण अधिकाधिक येतें, आणि ते सगळे राज्याच्या कामीं पडण्यास मोठ्या उत्सुकतेनें तयार होतात. हा प्रकार केवळ इंग्लंड आणि आयर्लंड ह्यांस लागू आहे. ह्याशिवाय त्यांच्या उपराज्यांतून सैन्यांचे लोटांचे लोट आपण होऊन मूळ देशाच्या यशरक्षणार्थ बाहेर पडतात, आणि त्यांच्या हातून शत्रूचा पराभव होतो.

---

# भाग तेरावा.

## "तुमच्या मागें गादीवर कोण बसणार ?"

हा प्रश्न अमीर अबदुल रहिमान ह्यांस वारंवार करीत असत, आणि ह्याच्या संबंधानें लोकांत पुष्कळ चर्चा चाले. त्याचा निर्णय करण्यास अमीरसाहेबांनीं अनेक प्रसंगीं अनेक प्रकारचे प्रयत्न केले. त्यांत त्यांचे प्रगल्भ विचार प्रगट झाले आहेत. त्यांतल्या कितीएकांची छाया येथें द्यावयाचा विचार आहे.

कांहीं लोक समजत कीं, हबिबुल्लाखान हे वडील चिरंजीव आहेत, तेव्हां तेच अबदुल रहिमानांच्या पश्चात् काबूलच्या गादीवर बसावयाचे. कांहीं लोक ह्मणत कीं, दुसरे चिरंजीव नासरुल्लाखान ह्यांवर अमीरसाहेबांची विशेष मर्जी आहे, कशावरून तर यांस त्यांनीं विलायतेस महा-

राणी साहेबांकडे पाठविलें होतें, ते गादीवर बसावयाचे. कितीएक असे ह्मणत होते कीं, हाफिजुला ह्या नांवाचे जे ह्यांचे चिरंजीव कांहीं दिवसांपूर्वीं गत झाले, ते गादीवर बसावयाचे होते, कांकीं, ते अमीरसाहेबांचे अतिशयित आवडते होते. कोणाचे तर्क असे होते कीं, अमीरसाहेबांच्या राण्यांमध्यें ज्या राणीवर त्यांचें विशेष प्रेम आहे, तिच्या पोटीं झालेले चिरंजीव महंमद अमीर हे अमीर होतील. असे हजारांचे हजार तर्क होते. त्यां संबंधानें अमीरसाहेब ह्मणत, "ह्याविषयीं माझे विचार काय आहेत, ते अज्ञान लोकांस कळविण्यास मला कांहीं कारण दिसत नाहीं. परंतु, माझ्यामागें माझ्या गादीवर कोण बसावयाचा, हें मीं आपल्या उक्तीनें सुजाण, समंजस, शाहाण्या लोकांस कळेसें केलें आहे. ह्याविषयीं मी आपला विचार स्पष्ट सांगत नाहीं, ह्यास कांहीं कारणें आहेत. त्यांतलीं थोडीशीं येथें सांगतों.

१. गादीचा वारीसदार स्पष्ट कळला म्हणजे त्याच्या जीवास फार धोके येतात, असा अनुभव पूर्वीं आलेला आहे. म्हणून मी हें राखवेल तितकें गुप्त राखितों.

२. शेरअल्ली ह्यांनीं आपल्या गादीचा वारीसदार आपला वडील पुत्र अबदल्लाजान हा प्रगट केल्याच्या योगानें त्यांवर कोणकोणतीं संकटें आलीं, तीं अद्याप मला चांगलीं आठवत आहेत. म्हणून मी तसें करणार नाहीं. त्यांच्या बाकीच्या मुलांनीं लागलींच बंडें केलीं.

३. गादी देवाची आहे. तो राजांचा राजा आणि प्रभूचा प्रभु आहे. तो जगाचा पिता आहे. राजांच्या नेमणुका तो

करितो, आणि जनांस संभाळण्यास तो त्यांच्या स्वाधीन करितो. म्हणून, माझ्या पुत्रांमध्यें, आपल्या गुणांवरून जो कोणी त्यास योग्य असा वाटेल, त्यास त्यानें माझ्या गादीवर बसायास निवडावें असें म्हणून मी स्वस्थ राहतों.

४. शिवाय, ज्यांस अफगाणिस्थानाचा इतिहास ज्ञात आहे, त्यांस हें ठाऊक आहे कीं, अफगाणिस्थानाचें राज्य हें कांहीं तत्वाच्या धोरणानें चाललें आहे. तें धोरण ह्मणजे हें कीं, गादीवर बसायाचा राजा लोकांनीं निवडलेला—लोकांस पसंत पडलेला असा पाहिजे. हें तत्व एकीकडे ठेवून, जे राजे, लोकांच्या पसंतीस आणि संतोषास न जुमानितां काबूलच्या गादीवर बसले, ते ती नुसती गादीच हरवून राहिले नाहींत, तर ते प्राणांसही मुकले, अशीं उदाहरणें झालीं आहेत. ह्याकरितां, लोकांच्या इच्छेविरुद्ध माझा एकादा मुलगा काबूलच्या गादीवर कोंबणें हें अत्यंत अश्लाध्य होईल. तें सारें लोकांवर सोंपावें हें बरें.

५. राजांनीं आपल्या मुलांस आपल्या गादीचे वारस नेमिलें ह्मणजे, गादी लवकर मिळण्याकरितां, मुलगे बापास ठार मारण्याचा प्रयत्न करितात, अशा गोष्टी पुष्कळ झाल्या आहेत. तरी, माझे मुलगे तसे नाहींत, ह्याचा मला मोठा अभिमान वाटतो. तरी, अफगाण लोकांचा स्वभाव मला पक्का टाऊक आहे. ते भावाभावांत आणि बापलेकांत कलह लाऊन देण्यांत मोठे पटाईत आहेत.

६. आणखी, माझ्या कुटुंबांत फुटाफूट व्हावयास नको आहे. भांडणें आणि मारामाऱ्या नको आहेत. जर माझी माणसें शाहाणीं असलीं, तर त्यांनीं एकमतानें, एक-

विचारानें, आणि एका जुटीनें राहावें, ह्मणजे मग लोकांत खळबळ होण्याची भीति राहाणार नाहीं. पण माझें न ऐकतां जर तीं एकमेकांशीं भाडूं लागलीं, तर त्यांचीं फळें त्यांस मिळतील."

ह्या विचारावरून आणि अमीरसाहेबांनीं आपल्या हयातींत हबिबुल्लाखान ह्यांच्या हातीं जे कारभार सोंपविले होते, त्यांवरून हें उघड होतें कीं, त्यांनीं आपल्यामागें काबुलच्या गादीवर बसावें अशी त्यांची इच्छा होती.

आपल्या वारिसाच्या संबंधानें आपण ही योजना कां केली आहे, हें अमीरसाहेबांनीं सांगितलें आहे. " मी दुराणी वंशांतला आहे. पहिला दुराणीराजा महमदखान होता. त्यालाच अहमदशहा दुराणी किंवा अहमदशहा अबदल्ली ह्मणत असत. तो अफगाणिस्थानच्या गादीवर इ० स० १७४८ ह्या वर्षी बसला. त्याला अफगाणिस्थानच्या अनेक जातींच्या लोकांनीं आपण होऊन निवडून राजा केलें, आणि एकछत्री राज्य स्थापिलें. कां कीं, त्यांस आंतल्याआंत लोकांच्या मारामाऱ्यांचा अतिशयित वीट आला होता. आणि सर्वांस शांति पाहिजे होती, ह्मणून त्यांनीं ही व्यवस्था केली. हा राजा फार लोकप्रिय झाला. कां कीं, तो आपल्या राज्याचें सगळें काम लोकांच्या सल्लामसलतीनें चालवीत असे. ह्यानें हिंदुस्थानही जिंकिलें होतें. ह्याच्या पश्चात् ह्याच्या गादीकरितां ह्याच्या मुलांत मारामाऱ्या आणि हाणाहाण्या होऊन, देशव्यवस्थेचा सत्यानाश झाला. त्याचा इतिहास पुस्तकांतून लिहिलाच आहे. ह्यांच्यांतला शेवटचा राजा शाहासुजा ह्यास इंग्लिश सरकारानें काबूलच्या गादीवर बसविलें. तो लोकांस आवडला नाहीं.

त्यावर लोक उठले. आणि त्यांनीं त्याला ठार मारिलें, आणखी त्याबरोबर कितीएक इंग्लिश लोकही प्राणांस मुकले." ह्या सगळ्या लिहिण्याचा अमीरसाहेबांचा आशय एवढा होता कीं, लोकांस पसंत पडल्याशिवाय कोणत्याही माणसाच्यानें अफगाणिस्थानाचें राज्य चालवावयाचें नाहीं, हें दर्शवावें. आजपर्यंचा अनुभव तसाच आहे.

तैमुरलंगानें, राज्य करीत असतां, आपल्या मुलांस वेगळ्या वेगळ्या प्रांतांवर सुभेदार नेमिलें, आणि त्यांस स्वतंत्र होऊं दिलें, ह्या कारणानें अहमदशाहाच्या वंशाच्या हातचें राज्य गेलें, असें दोस्त महंमदांस कळून आलें, असें अमीर साहेबांनीं ह्मटलें आहे. आणि तें खरें आहे. प्रत्येकाचें सैन्य वेगळें होतें. तेव्हां अर्थात् त्यांस बापाशीं संबंध ठेवण्याची गरज राहिली नव्हती. ते प्रबळ झाले. आणि त्यांचा बाप इ० स० १७९३ मरण पावला, तेव्हां त्यांनीं आपसांत यादवी माजवून सर्वस्व घालविलें. आणि ह्या भांडणांनींच दोस्त महंमद ह्यांस गादी मिळाली. बरें ही तैमुरलंगाची चूक दोस्तमहमदास कळली असतां, आणि तिचे परिणाम ते जाणत असतां, त्यांनीं स्वतः आपल्या मुलांस तसेच प्रांतांचे अधिकारी करून, तीच चूक केली, हा मोठा चमत्कार नव्हे काय? ह्या विषयीं अमीरसाहेबांनीं ह्मटलें आहे कीं, "माझे वडील तुर्कस्थानचे सुभेदार होते, आणि हिरात येथें जें सैन्य दोस्तमहंमदाच्या मरणकाळीं होतें तें त्यांनीं शेरअल्लींच्या स्वाधीन केलें होतें. माझा चुलता अजीम ह्याजकडे कुरम आणि जाजी हे प्रांत असून तेथें त्याच्या स्वाधीन पुष्कळ सैन्य होतें. शेरअल्लींचा सखा भाऊ आमीन ह्याज-

कडे कंदाहार होतें. तेथें सैन्य चांगलें होतें. हझारा आणि बामियन ह्यांजवर सरदार आस्लामखान ह्यांस नेमिलें होतें, तेथचें सैन्य त्याच्या अर्ध्या वचनांत होतें. असे बाकीचे सगळे प्रांत त्यानें आपल्या मुलांस वांटून दिल्यासारखे होते, आणि त्यांत सैन्यें होतीं. तेव्हां, बाप मरण पावतांच ही सगळीं बंधुमंडळी बलिष्ट होऊन, एकमेकांशीं भांडूं लागलीं. त्यामुळें सगळा देश हैराण होऊन राज्याचा नाश झाला."

हा सगळा इतिहास नेहमीं अमीरसाहेबांच्या दृष्टीसमोर उभा असे. आणि ज्या चुक्या पूर्वींच्या अमीरांच्या दुःखास कारणीभूत झाल्या होत्या, त्या आपल्या हातून होऊं नयेत, ह्याविषयीं ते फार जपत असत. त्यांनीं ह्मटलें आहे— "मी आपल्या मुलांस नेहमीं राजधानी काबूल येथें ठेवितो. आणि बाकीच्या सगळ्यांस वडील चिरंजीव ह्याच्या आज्ञेंत वागण्यास लावितों."

हबिबुल्लाखानास त्यांनीं पुष्कळ अधिकार दिले होते. ते एकदम दिलेले नव्हते. प्रथम थोडे अधिकार देऊन, मग जसजसें त्याचें वय आणि अनुभव ही वाढत गेलीं, तसतसे त्यास ते राज्यव्यवस्थादिकांचे अधिकार अधिकाधिक देत गेले. कामावर मुख्य नेमिले होते ते हबिबुल्लांच्या आज्ञेप्रमाणें आपलीं कामें चालवीत होते. वेगळ्या वेगळ्या खात्यांचे मुख्य अधिकारी आपापले रिपोर्ट आणि हिशेब हे हबिबुल्ला ह्याज-कडेसच पाठवीत असत, आणि सगळ्या संशयांची निवृत्ति त्यां-कडूनच करून घेत असत. कारणपरत्वें, ते त्यांच्याच दरबारांत जात. बारीकसारीक काम अमीरसाहेबांकडे आणीत नसत.

प्रांताचे सुभेदार आणि जागोजाग लष्करें ठेविलीं आहेत त्यांचे सेनापति, ह्यांस जे काय महत्वाचे हुकूम द्यावयाचे, ते, प्रथम अमीरसाहेबांची मंजुरी घेऊन, मग द्यावयाचे, असा क्रम हबिबुल्लाखान ह्यांस लावून दिला होता. त्याप्रमाणें काम चाललें तरी, सगळ्या अमलदारांनीं, अमीरसाहेबांच्याप्रमाणें हबिबुल्लाखानाचा हुकूम मानिला पाहिजे, अशी सक्त शिस्त असे. इ० स० १८९७ पर्यंत, खजीन्याचें सगळें काम अमीरसाहेब स्वतः पाहात होते; परंतु, तेंही पुढें त्यांनीं मुलांवर सोंपविलें होतें.

हबिबुल्लाखान हे लष्करी, मुलकी, दिवाणी, फौजदारी, व्यापारी, महसुली, इत्यादि सगळ्या खात्यांचें मुख्य अधिकारी-सर्वांत श्रेष्ट अधिकारी—झालेले होते. त्यांचा ठराव, तो अगदीं शेवटचा ठराव समजत. त्यांच्या ठरावावर अपील काय तें अमीरसाहेबांकडे व्हावयाचें. अशी वहिवाट चालली होती.

गादीच्या वारीसदारीविषयीं लोकांत ज्या चर्चा पूर्वी झाल्या त्या सगळ्या अमीरसाहेबांस कळलेल्या होत्या. त्यांच्या संबंधानें त्यांनीं असें म्हटलें आहे कीं, "एके वेळीं लोक असें ह्मणत होते कीं, शेरअल्लींची मातुश्री राजकुलोत्पन्न असल्याकारणानें त्यांचा हक्क आमचे वडील अमीर अफजुल ह्यांच्यापेक्षां गादीवर विशेष होता. परंतु ही चूक होती. ह्याचें कारण एकतर असें आहे कीं, आमच्या मातुश्री ह्या पूर्वींच्या राजकुलांतल्या होत्या. त्या कुलाचे मूळपुरुष तमास्प होते. आणि शेरअल्लींच्या मातुश्री सालिमाझाई जातींतल्या होत्या. त्यांच्या कुळांतला कोणीही पुरुष सिंहासनारूढ झाला नव्हता." ह्मणजे, लोकांच्या मनांतल्या

इतिहासाच्या चुक्या देखील बे बुद्ध्या बोलून दाखवून शुद्ध करीत असत.

अशा प्रकारच्या गोष्टींत ते नुसता इतिहास सांगून राहात नसत. त्याला शास्त्राधार सांगत. त्यांनीं ह्या संबंधानें लिहिलें आहे कीं, " मुसलमानी धर्मपुस्तक कुराण ह्याच्या दृष्टीनें पाहिलें असतां आया कोणी कशाही असोत, सगळ्या मुलांचे अधिकार एकसारखे आहेत. त्यांत कांहीं भेद नाहींत. संपत्तीच्या वांट्याचा अधिकार सर्वांस अगदीं सारखा आहे. तो इतका कीं, अगदीं हलक्या दासीच्या पोटीं झालेला मुलगा आणि पट्टराणीस झालेला मुलगा ह्यांस हक्क अगदीं सारखे आहेत. तिळभर कमजास्त नाहींत. त्याप्रमाणेंच राजाच्या बायकांत भेद नाहीं. दासी असो किंवा मोठ्या समारंभानें लग्न झालेली पत्नी असो, राजाच्या बायका त्या सगळ्या राण्या, आणि भिक्षेकऱ्याच्या बायका त्या सगळ्या भिकारणी, असें शास्त्र आहे. त्यांत प्रेम कमजास्त असो. परंतु, तेवढयावरून शेरअल्लीप्रमाणें, आपल्या धाकट्या मुलांस गादीचा वारीसदार ठरवून आपला लौकिक गमवावा, हें योग्य नाहीं. आणि त्याचाच परिणाम हा झाला कीं, बाकीच्या मुलांनीं बंडें केलीं."

ह्याशिवाय, अफगाण लोकांच्या शाहाणपणाविषयीं अमीरसाहेबांस मोठा अभिमान असे. ह्या वारिसाच्या संबंधानें त्यांनीं ह्मटलें आहे कीं, " धर्माच्या दृष्टीनें हें क्षणभर एकीकडे असो, परंतु आमचे अफगाण लोक हे मोठे शूर योद्धे आहेत. ते आई कोण आहे तिकडे पाहून कोणास आपला राजा निवडून घेत नाहींत, तर, ते त्याच्या आंगच्या गुणांकडे पाहतात,

आणि योग्यतेकडे पाहतात, आणि कुलोत्पन्नता तर पाहतातच" ह्या प्रकरणीं इ० स० १८९९ त लार्ड कर्झन साहेब त्यांस भेटायास गेले होते, तेव्हां त्यांच्याशींही ह्यांचा बराच वादविवाद झाला ह्मणतात.

अमीरसाहेबांनीं स्पष्ट ह्मणावें कीं, माझ्या पश्चात् माझा वडील मुलगा हबिबुल्लाखान हाच गादीवर बसावयाचा आहे, आणि त्या अधिकारास तो योग्य झाला आहे. त्यांनीं एकदां ह्मटलें कीं, " राण्यांच्या भिडेखातर लहान मुलांस गादीचे वारसदार करणें ह्यानें नेहमी अनर्थ झाले आहेत, देशाची दुर्दशा झाली आहे. ह्मणून, वडील मुलास वारीसदार करणें हेंच शहाणपण आहे. आणि मीं तसेंच केलें आहे. मीं त्यास द्यावयाचा तितका सगळा अनुभव दिला आहे. त्याच्या योगानें तो अमीर होण्यास लायक झाला आहे. त्याला गादी मिळविण्यास लढण्याचें कारण पडावयाचें नाहीं. त्यास विरुद्ध वागतील असें सामर्थ्य त्याच्या भावांस दिलेलें नाहीं. ते नात्यानें त्याचे सखे भाऊ खरे, परंतु, राज्याधिकार संबंधानें ते त्याचे सेवक आहेत. "

नीतीची गोष्ट कोठेंही आढळो, तिचें अनुकरण करण्याविषयीं आणि तिजविषयीं आपल्या प्रजांस बोध करण्याविषयीं अमीरसाहेब नेहमीं दक्ष असत. राजकुलोत्पन्न पुरुषांविषयीं आणि अधिकाराविषयीं त्यांनीं महाराणी व्हिक्टोरिया ह्यांचें फार स्तुतिस्तोत्र केलें आहे. ते ह्मणाले, " पहा, महाराणी व्हिक्टोरिया ह्या सार्वभौमिणी आहेत. आणि ड्यूक आफ कॅनाट हे त्यांचे प्रत्यक्ष पुत्र आहेत. तरी, त्यांस त्यांनीं, हिंदुस्थानचे गव्हरनर जनरल—

ह्मणजे एक मोठे नौकरच—त्यांच्या हाताखालीं सेनापतीचें काम करण्यास पाठविलें आहे. ह्यावरून माझ्या प्रजाजनांनीं बोध घ्यावा."

आपल्या राष्ट्रास लोक उगाच विनाकारण अडाणी समजतात, आणि त्याप्रमाणें बोलतात, ह्याविषयीं अमीरसाहेबांस फार वाईट वाटे. त्याविषयीं त्यांनीं एकदा असे उद्‌गार काढिले आहेत. "प्राचीन काळीं इंग्लंडांत मेंढी चोरल्याबद्दल फांशींची शिक्षा देत असत, असें ह्मणतात. तेवढ्यावरून सध्याच्या इंग्लिश लोकांस क्रूर ह्मणावयाचें कीं काय? आतां ते चांगले सुधारले आहेत. त्यांचे कायदे फार चांगले आणि सौम्य आहेत. तोच प्रकार अफगाण लोकांविषयीं आहे. हा देश मोठ्या झपाट्यानें सुधारत चालला आहे. गेल्या वीस वर्षांत जितकी सुधारणा झाली आहे, तितकी सुधारणा दुसऱ्या देशांत होण्यास पन्नास वर्षें पुरावयाचीं नाहींत. ह्मणून, गेल्या वीस वर्षांत जी काय सुधारणा झाली आहे, ती ज्यांस ठाऊक असेल, त्यांनीं अफगाणिस्थानाविषयीं गप्पा मारण्याचा वृथा डौल घालूं नये. त्यांच्या योगानें लोकांचा समज भलताच होतो, हें एक मोठें अरिष्ट आहे."

वर्तमानपत्रांतल्या गप्पांविषयीं त्यांनीं एकदा ह्मटलें कीं, "जे लोक मरून गेल्यास कितीएक वर्षें होऊन गेलीं आहेत, ते, किंवा जे कधीं कोठें मुळींच नव्हते असे लोक माझ्या गादीचे वारीसदार असल्याविषयीं वर्तमानपत्रांतून चर्चा येतात, त्यास काय ह्मणावें? मला अशी आशा आहे कीं, माझ्या मुलांपैकीं माझ्यामागें गादीवर बसण्यास योग्य कोण आहे हें समजण्याचें शाहाणपण माझ्या लोकांस आहे, आणि त्यास

निवडून गादीवर बसविण्याचें सामर्थ्यही त्यांस आहे. त्यांत परकीयांस हात घालावयाचें कारण पडावयाचें नाहीं."

अफगाणिस्थानची गादी अफगाण लोकांच्या हातांत आहे—ह्मणजे त्या गादीवर ज्यांस ते बसवितील तो अमीर व्हावयाचा आहे—हें जाणून आणि देशांत कांहीं कांहीं घेंडें अशीं मोठीं आहेत कीं, ते जें काय ह्मणतील तें ऐकायास हजारों लोक तयार आहेत, हें पूर्णपणें समजून, मागें पुढें हबिबुल्लाखानांस कोणत्याही प्रकारची अडचण येऊं नये म्हणून, त्या मोठ्या मोठ्या लोकांतील सात गृहस्थांच्या मुली हबिबुल्लाखान ह्यांस बायका करून दिल्या आहेत, आणि हबिबुल्लांखानांच्या मुलांस त्यांच्या मुली द्यावयाच्या त्यांनीं ठरवून ठेविल्या आहेत. म्हणजे, ज्यांचें भय वाटण्यासारखें होतें, त्यांस सोयरे करून टाकिले आहेत. ही युक्ति फार चांगली आहे. ही कांहीं नवी नाहीं. अकबर बादशाहानें ही कितीएकांशीं लढविली होती, हें इतिहासज्ञांस ठाऊक आहेच. ह्या संबंधाविषयीं अमीरसाहेबांनीं असें ह्मटलें आहे कीं, "हे मोठे मोठे लोक जर आमच्या चिरंजीवांचे अगदीं जवळचे आप्त झाले आहेत, तर, आमच्या चिरंजीवांस सर्व प्रकारीं साह्य करणें हें त्यांचें कर्तव्य होईल. त्याच्या योगानें हबिबुल्लाखान ह्यांस देशातल्या लोकांपासून काडीमात्र पीडा होणार नाहीं."

द्वितीय चिरंजीव नासरुल्लाखान ह्यांचींही तीन लग्नें अशाच मोठमोठ्यांच्या तीन मुलींशीं त्यांनीं लावून दिलीं आहेत.

शिवाय, आपल्या मागें आपल्या मुलांस राज्य करण्यास सोपें जावें ह्मणून त्यांनीं एक तजवीज अशी केली होती कीं,

शजारपाजारचे लहान लहान संस्थानिक कबुलास आणून ठेविले होते, आणि ते हबिबुल्लांच्या तैनातीस दिले होते. ते त्यांचे चांगले मित्र झाले आहेत. तेव्हां त्यांच्या अनुभवाचा उपयोग त्यांस पुष्कळ होईल, आणि ते त्यांस अडल्यावेळीं साह्य करतील हें उघड आहे.

दुसरी तजवीज अशी केली कीं, प्रांत रशियानें घेतल्यामुळें जे निराश्रित झाले होते, त्यांस आश्रय देऊन त्यांनीं आपल्या दरबारी ठेविलें. ते हबीबुल्लाखानाशीं मोठ्या प्रेमानें वागतात.

तिसरी युक्ति अशी केली कीं, जे कोणी इंग्रज सरकाराशीं लढत होते, अथवा ज्यांस इंग्लिशांच्या संबंधानें निराशा झाली होती, त्यांस समजावून राजधानींत कामें देऊन ठेविलें. ते अमीरांच्या अर्ध्या वचनांत राहातात.

अफगाणिस्थानांतून ज्यांना पूर्वी हांकून दिलें होतें, त्यांतले कांहीं लोक परत आणिले. आणि त्याप्रमाणेंच ह्या अमीरसाहेबांच्या शत्रूंस जे कोणीं साह्य होते, त्यांसही आपलेसे करून जवळ ठेविले.

ह्या सगळ्यांविषयीं अमीरसाहेबांनीं असें ह्मटलें कीं, “ अशा प्रकारें, काबूलच्या गादीस वारीसदार आणि माझ्या पुत्रांच्या स्वास्थ्याचा भंग करणारा असा एक देखील कोणी राहिला नाहीं. आह्मांला अशी आशा आहे कीं, आमचे चिरंजीव आमचा बोध ध्यानांत ठेवितील, आणि आमच्या कित्यानें चालतील, आणि आसपासच्या प्रांतांतले जे निराश्रित लोक ह्यांजकडे आश्रय मागायास येतील, त्यांस ते सांभाळतील.

असे लोक नेहमीं त्यांचें रक्षण करण्यास आणि त्यांच्या शत्रूशीं लढण्यास त्यांस उपयोगीं पडतील."

एकंदरींत, आपले वडील चिरंजीव हबीबुल्लाखान ह्यांस आपल्या पश्चात् काबूलची गादी प्राप्त होण्यास आणि राज्य सुरळीतपणें चालविण्यास जें काय साहित्य आवश्यक वाटलें, तें अमीर साहेबांनीं सिद्ध करून ठेविलें. ह्यांत राजा ह्या नात्यानें आणि पिता ह्या नात्यानें त्यांचें जें काय कर्तव्य होतें, तें त्यांनीं केलें.

---

## भाग चवदावा.

### अफगाणिस्थानाची भावी स्थिति.

दूरदृष्टि हें थोर माणसांचें मुख्य लक्षण आहे. अमीर साहेबांस स्वराष्ट्राच्या कल्याणाची आस्था फार होती. आपल्या पश्चात् त्याचें निरंतर चांगलें चालावें, अशी त्यांची फार इच्छा होती. ती सिद्धीस जाण्याकरितां त्यांनीं नानाप्रकारच्या तजविजी योजून ठेविल्या. त्यांतच ही एक तजवीज होती कीं, आपलें राष्ट्र खरोखर कसें आहे तें आपल्या वारिसदारांस आणि लोकांस समजून सांगावयाचें, आणि त्या संबंधानें कसें वागावें ह्याविषयीं बोध करावयाचा. हें त्यांनीं कसें केलें, हें ह्या भागांत थोडक्यांत सांगावयाचें आहे.

तरी, अफगाणिस्थानाविषयीं त्यांचे सामान्य विचार काय आहेत, ते आधीं सांगितल्या शिवाय हें प्रकरण बरोबर कळ-

णार नाहीं असें वाटतें. ह्या संबंधानें त्यांनीं ह्मटलें आहे— " उद्यां काय होईल हें कोणाही माणसास कळावयाचें नाहीं. तरी, माणसाला जो अनुभव पूर्वी आलेला असतो, त्यावरून त्याला पुढें घडणाऱ्या कांहीं गोष्टींविषयीं थोडें बहुत अनुमान करितां येतें. ह्या कृत्यास भविष्यवादी लागतो असें नाहीं. मला ह्या जगाचा अनुभव पुष्कळ आला आहे. तो मी माझ्या गादीवर बसणाऱ्यांच्या आणि माझ्या लोकांच्या हितार्थ मी सांगतों " ह्या पुस्तकांत ज्या गोष्टी मागें सांगितल्या आहेत, त्यावरून हें उघड आहे कीं, अमीरसाहेबांस सर्व प्रकारच्या स्थितीचे अनुभव पुष्कळ आलेले होते. आणि त्यांचे ठायीं कालदेशवर्तमानाचें निरीक्षण करून त्यापासून बोध घेण्याचें सामर्थ्य मोठें होतें. तेव्हां, ह्या संबंधानें त्यांचे शब्द फार मोलवान असले पाहिजेत, हें उघड आहे.

अमीरसाहेबांस अफगाणिस्थान हा देश फार चांगला होतकरू—ह्मणजे कालेंकरून मोठ्या योग्यतेस येणारा—असा वाटत असे. त्याविषयीं त्यांनीं ह्मटलें आहे कीं, " परमेश्वर कृपा करील तर अफगाणिस्थान हा देश चांगला प्रबल, तेजस्वी, आणि स्वतंत्र व्हावा, असें साहित्य ह्याच्या ठायीं आहे, असा मला अनुभव आला आहे. " आणि त्याप्रमाणें त्यांनीं गेल्या २० वर्षांच्या आपल्या कारकीर्दींत, मोठ्या प्रयत्नानें त्याचें प्रमाण पटवून दिलें. आणखी परमेश्वराच्या अगाध कृतीवर त्यांचा मोठा विश्वास असे. त्यांनीं ह्मटलें आहे:— "परमेश्वराच्या मनांत एकादी गोष्ट घडवून आणण्याचें आलें, ह्मणजे, त्यास जे काय योगायोग आवश्यक असतात, ते

अगदीं साहजिक ओघानें वाहावें असें तो करितो." खरें आहे. महात्म्यांचा विश्वास असाच असतो.

पुनः एकादा अमीरसाहेबांस असेंही वाटे कीं, केव्हां तरी अफगाणिस्थान हें खचीत मोठ्या उन्नतावस्थेप्रत चढेल एक, किंवा कदाचित् ह्याचे तुकडे तुकडे होऊन ह्याचें नायनाट होईल एक. ह्मणजे, हें अर्धलंड मर्धलंड राहावयाचें नाहीं, असा त्यांच्या अभिप्रायाचा आशय दिसे. त्यांनीं ह्मटलें आहे—"परचक्रापासून आपलें संरक्षण करण्याचें शाहाणपण आणि सामर्थ्य जर राज्यांत नसलें, तर तें राज्य जवळचीं प्रबल राज्यें ध्यावयाचीं, ह्यांत कांहीं संशय नाहीं. रशिया किंवा इंग्लंड ह्यांतल्या एकाच्यानें आफगाणिस्थान घेववणार नाहीं. कांकी, इंग्लंडानें सगळें अफगाणिस्थान जर एकट्या राशियास घेऊं दिलें, तर हिंदुस्थानांतल्या इंग्लिश राज्यास त्यापासून वारंवार फार संकटें येणार आहेत, हें त्यास ठाऊक आहे. त्याप्रमाणेंच, सगळें अफगाणिस्थान इंग्लंडानें घेतलें, तर तिकडे रशियालाही तशाच अडचणी वारंवार येणार आहेत. ह्मणून ते तें होऊं देणार नाहींत." ह्या सगळ्या पुढच्या गोष्टी होत्या, कल्पना होत्या, परंतु, त्यांचा विचार करणें आवश्यक होतें.

आह्मीं पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, अफगाणिस्थान हा देश अमीर साहेबांचा मोठा लाडका होता. मोठा आवडता होता. त्याच्या ठायीं त्यांस उणें असें कांहीं दिसत नसे. जें काय राष्ट्रकल्याणास आवश्यक आहे, तें सगळें त्यांत आहे, त्याचा योग्य उपयोग करणारा मात्र पाहिजे आहे—जमीन उत्तम आहे—माळी मात्र चांगला चतुर पाहिजे आहे—असें

त्यांचें मत फार बळकट असे, आणि तें रास्त होतें. आपल्या मुलांविषयीं पित्यास जसें वाटतें, तसें आपल्या राष्ट्रांविषयीं राजांस वाटावें, ह्यासारखें दुसरें भूषण नाहीं. खनिजांविषयीं अमीरसाहेबांनीं ह्मटलें होतें कीं, सोनें, रुपें, शिसें, तांबें, लोखंड, कोळसा इत्यादिकांच्याही खाणी लागण्यासारख्या आहेत, असें युरोपांतल्या मोठमोठ्या भूदरशास्त्रवेत्त्यांनीं सांगितलें आहे. परंतु, अमीरसाहेब ह्मणत कीं हें भूमिगत धन खणून काढणारा कोणी अफगाण पाहिजे. दुसरा कोणी नको.

व्यापाराच्या संबंधानेंही त्यांस असेंच वाटे. इंग्लंडास जें एवढें श्रेष्ठत्व आज प्राप्त झालें आहे, त्यास मुख्य साधन, त्यांत कोळसे आणि लोखंड हीं त्यांतल्या खाणींत विपुल सांपडतात हें आहे. हें साधन तितक्या प्रमाणानें अफगाणिस्थानांत आहे, आणखी शिवाय, यंत्रें चालण्यास धबधब्यांच्या शक्तीचाही पुष्कळ उपयोग होण्यासारखा आहे, असें अमीर साहेब ह्मणत.

अफगाणिस्थानांतले लोक त्यांस फार चांगले वाटत. ते त्यांचें वर्णन फार करीत पुरुष आणि बायका हीं सगळीं माणसें फार शूर, आणि बुद्धिवान् अशीं आहेत. त्यांना स्वातंत्र्याची अतिशयित आवड आहे. तीं चांगलीं बळकट, धट्टींखट्टीं, धिप्पाड, असून त्यांस मद्यपान जुगार इत्यादिकांतलें कोणतेंही व्यसन नाहीं. तीं विद्या शिकण्यास नेहमीं तयार असतात, आणि परकीय लोकांच्या चांगल्या रीतिभाती घेण्याविषयीं त्यांच्या मनांत काडीमात्रही शंका येत नाहीं. तीं देवपिशीं नाहींत. ह्या दाहावीस वर्षांच्या सहवासानें तीं आपले पेहेराव युरोपांतल्या चांगल्या

लोकांसारखे करूं लागलीं आहेत, आणि युरोपांतल्या माणसांच्या रीतिभाती घेऊं लागलीं आहेत. भ्रमिष्ठाप्रमाणें आपलें जुनें धरून बसलीं नाहींत. असें ते ह्मणत. अशीं माणसें अमीरसाहेबांच्या राज्यांत आहेत, हें त्या देशाचें फार मोठें भाग्य आहे, असें आह्मी समजतों. कां कीं, उत्तम दागिना होण्यास नुसता कुशल सोनार पुरत नाहीं; सोनें चांगलें लागतें. हें जरी खरें आहे, तरी अफगाणिस्थानांतल्या लोकांत जी काय सामाजिक सुधारणा झाली आहे, तिचें श्रेय सगळें नसलें तर निदान सात अष्टमांश श्रेय आह्मी अमीरसाहेबांस देतों, आणि बाकीचें लोकांकडे राहूं देतों. कां कीं, कोणत्याही राष्ट्रांत "राजा कालस्य कारणं" हा नियम कांहीं चुकत नाहीं. येथें पुनः पीटर धि ग्रेट आणि आलफ्रेड धि ग्रेट ह्यांचें स्मरण झाल्यावांचून राहात नाहीं.

सध्याच्या काळच्या मोठमोठ्या उन्नत राज्यांसही कोट्यवधि रुपये कर्ज आहे, आणि तें दिवसें दिवस वाढत चाललें आहे, हें मनांत येऊन, अफगाणिस्थानास एक पै देखील कर्ज नाहीं, ह्याचा मोठा अभिमान अमीरसाहेबांस वाटे. तो अगदीं यथार्थ होता. त्याप्रमाणेंच अफगाणिस्थानास कोणाला खंडणी द्यावी लागत नाहीं, हें एक मोठें सुख होतें. त्याप्रमाणें परकीय राजांचे वकीलही अफगाण दरबारांत नव्हते. त्यामुळें परकीयांच्या कारस्थानाविषयींचें भय कधीं मनांत देखील आणण्यास नको होतें. ह्मणजे अफगाणिस्थान पारतंत्र्यापासून अगदीं मुक्त होतें. ही गोष्ट कांहीं लहान नव्हे.

अफगाणिस्थानास फार मोठे शेजारी ह्मटले ह्मणजे दोन; रशिया आणि इंग्लंड—येथें इंग्लंड ह्मणजे हिंदुस्थान समजावयाचें. अफगाणिस्थानास ह्या शेजाऱ्याचें भय वाटत नाहीं; तर उलटा आसरा वाटतो. इंग्लंड रशियाला अफगाणिस्थान घेऊं देणार नाहीं, हीच अफगाणिस्थानाच्या स्वास्थ्याची मुख्य बळकटी आहे. शिवाय, हीं दोन मोठीं राष्ट्रें अफगाणिस्थानावरून एकमेकांशीं लढण्यास कधीं तयार व्हावयाचीं नाहींत, अशी अमीरसाहेबांची खातरी होती. एवढेंच केवळ नव्हे, तर, अफगाणिस्थान सध्या आहे तसे स्वतंत्र असावें हें आपणास चांगलें आहे, असें ह्या दोन्ही राष्ट्रांस वाटत आहे, असें अमीरसाहेब समजत असत. आणि तें खरें दिसतें. हें सगळें अमीरसाहेबांच्या शुद्ध वर्तनाचें आणि स्वकर्तव्यदक्षतेचें फल होतें.

आणखी, मागें पुढें आफगाणिस्थानाचा उदयच होईल, पाऊल कधींच मागें पडावयाचें नाहीं, ह्यास दुसरा एक मोठा आधार त्यांस असा वाटे कीं, त्या देशांतले सगळे लोक एका धर्माचे—ह्मणजे मुसलमानी धर्माचे आहेत, आणखी त्यांस नेहमीं असें वाटतें कीं, आपणांवर राज्यकर्ता आपल्या धर्माचा असावा. परधर्मी राजाच्या हाताखालीं नांदण्यास त्यांस कधींही आवडावयाचें नाहीं. आणखी, त्या सर्वांचा समज असा आहे कीं, आपल्या मुसलमानी धर्माखेरीज इतर धर्माचे जे लोक आहेत, ते सगळे नास्तिक आहेत, त्यांशीं लढण्यांत जे कोणी मुसलमान पडतात, ते स्वर्गलोकीं जातात. आणि त्यांस स्वातंत्र्य पराकाष्ठेचें आवडतें. असें त्यांचें वर्णन अमीर साहेबांनीं केलें आहे. ह्या

त्यांच्या वृत्तीचा परिणाम त्यांच्या राष्ट्राच्या भावी स्थितीवर नेहमीं होणार आहे असा त्यांचा भरंवसा होता.

हिंदुस्थानाच्या सरहद्दीच्या जवळ खैबर घाटाच्या आसपास कांहीं रानटी लोकांची वस्ती आहे. ते लोक अद्याप निवळले नाहींत. त्यांच्या प्रांतांतून जाणें ह्मटलें ह्मणजे बरोबर लष्करी लोकच घेऊन जावें लागतें. एकटें जाण्याची सोय नाहीं. शिवाय, तिकडे मोठमोठे कडे आणि पहाड आहेत. त्यांनीं त्या लोकांचा बचाव चांगला होतो. आणि ते उपजत योद्धे आहेत. त्या प्रांताकडे लक्ष देणें हें इंग्लिश सरकारास आवश्यक वाटत नाहीं. कां कीं, त्यांत पुष्कळ पैसा खरचणें आणि पुष्कळ माणसें मरणें ह्याच्या पलीकडे दुसरें कांहीं व्हावयाचें नाहीं, हें त्यांना ठाऊक आहे. बरें, इतकेंही करून तो प्रदेश घेतला, तर त्याचें उत्पन्न त्याच्या खर्चास पुरावयाचें नाहीं.

ही त्याच प्रांताची गोष्ट आहे असें नाहीं. अमीरसाहेबांचें मत असें होतें कीं, सांप्रत काळीं प्रत्यक्ष अफगाणिस्थानाची स्थिति, उत्पन्न आणि खर्च ह्यांच्या मानानें अशीच आहे. कदाचित् लष्करी स्वारीच्या संबंधानें तें कोणा सरकारास कांहीं उपयोगीं पडेल तर कोण जाणे. परंतु निदान आणखी पन्नास साठ वर्षें पर्यंत अफगाणिस्थानाची स्थिति एकसारखी सुधारत जाऊन, तें चांगल्या स्थितीस येऊन पोंचेपर्यंत आणि त्यांत आगगाड्या तारायंत्रानें चालू होऊन व्यापार चांगला चालू होईपर्यंत तो देश घेऊन आपल्या स्वाधीन ठेवणें कोणत्याही परकीय राज्यास लाभदायक व्हावयाचें नाहीं, असें अमीरसाहेबांनीं

स्पष्ट ह्मटलें आहे. आणखी ह्या संबंधानें असें ह्मटलें आहे कीं, राज्य वाढवावयाचें एवढ्याच वेडाच्या नादीं लागून जे कोणी इंग्लिश सरकाराचे कामदार अशा सरहद्दीवरचे प्रांत खालसा करितात, ते सरकारचा फायदा करीत नाहींत, तर सरकाराला विनाकारण खर्चांत घालतात, आणि त्याच्या मागें रिकामी काळजी लावितात. परंतु ही वृत्ति आतां कमी कमी होत चालली आहे. ह्या संबंधानें अमीरसाहेबांनीं ह्मटलें "आलीकडे आफगाणिस्थानावर इंग्लिशांची पुष्कळ मेहेरबानी झाली आहे. ती केवळ गोड बोलण्यांतच दिसते असें नाहीं. तर ते ह्या देशास द्रव्य, शस्त्रास्त्रें, यंत्रें इत्यादिकांचा पुरवठा मनापासून करीत आहेत, आणि त्यांच्या मनांत असें ठसल्या-सारखें दिसतें आहे कीं, आफगाणिस्थानाचें हित आणि इंग्लंडाचें हित हीं कांहीं दोन नाहींत, एकच आहे. इंग्लिश सरकार अफगाणिस्थानास साह्य करीत आहे एवढेंच नव्हे, तर परचक्रापासून रक्षण करण्याची हमी त्यांनीं घेतली आहे, त्यामुळें माझी पुष्कळ काळजी दूर झाली आहे, आणि मला माझ्या देशाच्या सुधारणेकडे लक्ष देण्यास पुष्कळ सवड होत आहे."

एकाद्या गोष्टीचा बोध दृष्टांतांनीं करण्याची हातोटी अमीर साहेबांस फार चांगली साधली होती. त्यांस दृष्टांत भराभर सुचत. राज्यांतली व्यवस्था लावण्याच्या क्रमाविषयीं लिहि-तांना, त्यांनीं आरंभ कसा केला आहे तो पाहा:—"प्रपंचाचें सामान सुमान घेण्याच्या अगोदर घराची तजवीज केली पाहिजे. त्याप्रमाणेंच घर ह्मटलें कीं, आंत सामानसुमान ठेवण्यास, त्याला भिंती पाहिजेत, बिळें भोकें असल्यास तीं

बुजविलीं पाहिजेत, आणि विंचू साप असतील ते मारून टाकिले पाहिजेत, तेव्हां तें राहावयास उपयोगीं पडावयाचें. त्याच न्यायानें सुधारणांस आरंभ करण्याच्या आधीं अफगाणिस्थानाच्या मर्यादा ठरावयास पाहिजेत होत्या, आणि आंतले बखेडे मोडावयास पाहिजेत होते, त्या मर्यादा ठरल्या आहेत आणि बखेडे मोडून टाकिले आहेत. त्यांविषयीं कांहीं वाद राहिला नाहीं ह्या प्रकरणीं माझ्या मागें माझ्या गादीवर बसणाऱ्यांस काडीभरही त्रास व्हावयाचा नाहीं."

अमीरसाहेबांनीं बखेडे कसे मोडिले हें तपशीलवार वाचणें हें बरेंच कंटाळवाणें होणार आहे. ह्मणून त्याच्या भरीस आह्मी पडत नाहीं. परंतु, त्या प्रकरणीं त्यांनीं दोन शब्दांत जें लिहिलें आहे, त्याचें तात्पर्य येथें सांगतों:—लहान लहान बदमाश टोळ्यांचे नाईक रस्तालूट करणारे, चोर, गळेकापू असे शेंकडों लोक देशांत भरले होते. त्यांच्या पायीं सुखवस्तूंस आणि वाटसरांस अतिशयित पीडा होत असे, त्यांचा बंदोबस्त करण्यास जमीनदाऱ्या मोडाव्या लागल्या, आणि सगळ्यांस एका सूत्रानें वागविणें भाग पडलें. सुजाण लोक स्वसंतोषानें माझ्या राजाधिकारास एकदम मान्य झाले, त्यांस प्रांतांतलीं चांगलीं चांगलीं कामें सांगितलीं, कितीएकांस चांगली समजूत देऊन चांगल्या रीतीनें वागायास लाविलें, ऐकेनात त्यांना शिक्षा केल्या, आणि जे अगदीं बेबंद झाले, त्यांस देशाबाहेर हांकून दिलें. तेव्हां देशांत शांतता झाली, आणि एकछत्री राज्य स्थापित करतां आलें. ह्याविषयीं मजवर क्रूरपणाचा आरोप करून जे कोणी मला नांवें ठेवतील, त्यांस माझें विचारणें एवढेंच

आहे कीं, आजपर्यंत पृथ्वीच्या पाठीवर ज्यांनीं अशीं रानटी राष्ट्रें, आपल्या प्रयत्नानें, उन्नतावस्थेस चढविलीं आहेत, त्यांस असाच क्रूरपणाचा मार्ग धरावा लागला आहे कीं नाहीं, हें इतिहासांत पहाल काय ?"

अफगाणिस्थानास उन्नतावस्थेस आणण्यास अत्यंत आवश्यक अशीं जीं साधनें अमीरसाहेबांस वाटत असत, त्यांत एक साधन एवढें मोठें वाटत होतें कीं, त्याची बरोबरी दुसऱ्या कोणत्याही साधनांच्यानें करवत नाहीं. तें साधन ह्मणजे ऐक्य होय. "अफगाणिस्थानास जर कशानें मोठेपण यावयाचें असलें, तर तें एका ऐक्यानें येईल; ऐक्याशिवाय दुसऱ्या कशानेंही यावयाचें नाहीं. ऐक्य ह्मणजे राजा, त्याचे प्रधान, सरदार, आणि लोक ह्यांचा जीव एक असला पाहिजे, ह्या सर्वांचें हित तें आपलें हित असें ह्यांतल्या प्रत्येकास वाटलें पाहिजे. सर्वांचें मत एक असलें पाहिजे. आणि राष्ट्राचें काम सर्वांनीं एकचित्तानें केलें पाहिजे" हेंच खरें आहे. आणखी एकीचें महत्त्व मनांत ठसण्यास त्यांनीं ह्या संबंधानें ह्मटलें आहे कीं, "कांहीं तरी इतिहास मी स्वतः वाचिला नाहीं, किंवा ऐकिला नाहीं, असा माझा एक दिवस देखील बाळपणापासून आजपर्यंत गेला नाहीं. ह्या इतक्या अभ्यासापासून मला जें काय मुख्य तात्पर्य कळून आलें आहे, तें हें आहे कीं, आजपर्यंत जीं राज्यें बुडालीं,—त्यांतही जीं मुसलमानी राज्यें बुडालीं, तीं सगळीं, त्यांत एकी नाहींशी झाल्यामुळें ह्मणजे फाटाफुट झाल्यामुळें आणि गृहकलहामुळें बुडालीं आहेत. माझी एवढीच इच्छा आहे कीं, माझ्या गादीवर बसणारांनीं आणि माझ्या लोकांनीं, निरंतर एकजीव होऊन राष्ट्राचीं कामें

करावीं." राजपदारूढांस इतिहासाचा उपयोग कसा होतो, तें ह्या लेखावरून चांगलें लक्षांत येतें. आणि अबदुल रहिमानांसारख्या, लहानपणीं अल्प अभ्यास झालेल्या आणि स्वपराक्रमानें सिंहासनारूढ झालेल्या पुरुषांची निष्ठा इतिहासाच्या अभ्यासावर इतकी जसावी, ही गोष्ट मोठमोठ्या राजपदरूढांनीं आणि मोठमोठ्या पदवीधरांनीं लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

भवितव्य कोणाच्या हातचें नाहीं. परंतु अमीरसाहेबांनीं आपल्या राज्याची आणि कुटुंबाची अशी व्यवस्था लावून ठेविली आहे कीं, त्यांच्या पश्चात् कलह असा काडीमात्र होऊं नये. ह्याविषयीं त्यांचे शब्द असे आहेत " माझ्यामागें वडील मुलाची आज्ञा माझ्या कुटुंबांतल्या माणसांनीं आणि प्रजाजनांनीं पाळावी, असें मीं करून ठेविलें आहे. माझ्या पूर्वजांनीं देश आणि सैन्य हीं आपल्या मुलांस वांटून देऊन जी मोठी चूक केली होती, आणि ज्या चुकीच्या योगानें त्यांच्यांत फाटाफुट झाली आणि कलह माजले, ती चूक मीं मोठ्या सावधगिरीनें टाळिली आहे. असें असून, माझ्या बोधास न जुमानितां जर माझे मुलगे एकमेकांशीं भांडू झगडू लागले, तर, त्याच्यापायीं त्यांचें राज्य जाईल, त्यांस विपत्ति प्राप्त होईल, आणि आफगाणिस्थान असें वेगळें राष्ट्र पृथ्वीच्या पाठीवर राहावयाचें नाहीं, ही शिक्षा त्यांस भोगावी लागेल, त्यांत कांहीं अन्याय व्हावयाचा नाहीं. परम दयाळू देवानें ह्मटलेंच आहे कीं, मनुष्यांनीं आपल्या कर्मांनीं आपली स्थिति बदलल्याशिवाय देव त्यांची स्थिति बदलीत नाहीं."

सगळ्यांनीं एकदिलानें राज्य चालविलें, तरी, राजकुलांतले कांहीं लोक हिंदुस्थानांत इंग्लिश सरकारच्या आश्रयानें राहिले आहेत, आणि रशियामध्यें त्या सरकाराच्या आश्रयानें राहिले आहेत, त्यांपासून आफगाणिस्थानच्या पुढच्या अमीरांस त्रास होण्याचा संभव आहे, असें अबदुल रहिमान ह्यांस वाटत होतें. ह्मणून, त्यांनीं, ह्या दोन्ही सरकारांशीं जे तह केले आहेत, त्यात ह्याविषयीं निर्णय करून टाकिला आहे. त्याच्या योगानें तीं दोन्ही सरकारें त्यांस ह्या भानगडींत पडूं देणार नाहींत. कां कीं, अफगाणिस्थानच्या राज्यांतली शांतता मोडून गडबड होणें हें त्यांस त्रासदायक होण्याची भीति आहे.

एवढा बंदोबस्त अमीरसाहेबांनीं करून ठेविला होता, तरी त्यांस असें वाटत होतें कीं, आपल्या मुलांनीं राज्य चालविण्याची योग्यता जर संपादिली नाहीं, तर हें सगळें व्यर्थ जाणार आहे. ह्मणून त्यांनीं त्याविषयीं ह्मटलें आहे:— "माझ्या मुलानें अगदीं पहिली गोष्ट जी करावयास पाहिजे आहे ती ही कीं, आपण करारी आहों, आपण कोणत्याही मोहपाशांत सांपडणारे नाहीं आहों, करूं ह्मटलें तें करूंच करूं असे आहों, दुसऱ्याच्या तोंडाकडे पाहणारे नाहीं आहों, मोठे कष्टाळू आहों, आणि मोठे देशाभिमानी आहों, असें आपल्या प्रजाजनांच्या प्रत्ययास आणून दिलें पाहिजे. आणि त्यानें लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, आपण जर ह्या व्रतांतल्या एकाद्या व्रतांत चुकलों, तर, आपल्या हातचें राज्य जाईल, एवढेंच केवळ नव्हे, तर त्याहूनही मोठें संकट प्राप्त होईल. त्यानें कोणाची विचारमसलत घेऊं नये, आणि आपल्याला वाटेल तेंच करावें असें माझें ह्मणणें नाहीं. आपल्या हितचिं-

तकांच्या सल्लामसलती अवश्य अवश्य घ्याव्या. परंतु ह्या आपण सांगू तसें करणारा आहे, असें कोणास वाटूं नये. ऐकावें सगळ्यांचें, पण करावें आपलें. अमीरशेरअल्ली ह्यांस त्यांच्या सल्लागारांनीं भलभलत्या मसलती देऊन त्यांच्या बंधूंशीं लढायास लाविलें, आणि याकूबखानांस त्यांच्या मसलतदारांनीं इंग्लिश सरकारांस अनेक वचनें द्यावयाच्या भरीं भरिलें, त्यामुळें फार हानि झाली, तसें माझ्या मुलांनीं करूं नये. त्याप्रमाणेंच माझे चुलते अमीर अझीम ह्यांस मीं गादीवर बसविल्यावर ते दुर्व्यसनांत मग्न झाले, आणि शेवटीं त्यांच्या पायीं राज्यास मुकले, हेंही माझ्या मुलांनीं विसरतां कामास नये."

ह्या सगळ्या सूचनांपेक्षां पुष्कळ अधिक महत्वाची एक सूचना अमीरसाहेबांनीं आपल्या मुलांस करून ठेविली आहे. ती ही:—"राज्यसंबंधाचें नित्याचें काम आटोपल्यानंतर, माझ्याप्रमाणें, प्रत्यही सायंकाळीं, माझ्या मुलांनीं आपल्या ज्ञानास भर घालण्याचा उद्योग, कधींही न चुकतां, केला पाहिजे. त्याचा उत्तम मार्ग हा आहे कीं, कांहीं वाचणारे ठेवावे, आणि त्यांजकडून कोणत्याही देशाचा भेद न ठेवितां, इतिहास, भूगोलविद्या, चरित्रें, मोठ्या लोकांचीं भाषणें इत्यादिकांवरचे ग्रंथ आणि वर्तमानपत्रें, हीं वाचवून आपण लक्षपूर्वक ऐकावीं, आणि त्यांत आपल्या देशाविषयीं जें काय विशेष वाटेल, तें वेगळें काढून ठेवावें; आणि त्याचा विचार करावा. ह्यापासून फार लाभ होतात. जन्मभर मी असें करीत आलों आहें, आणि मला ह्यापासून फार लाभ झाले आहेत." ह्या बोधाविषयीं स्वतः अमीरसाहेब असें ह्मणाले

कीं, " मी प्रसंगोपात्त आपल्या मुलांस जरी नानाप्रकारचा पुष्कळ बोध केला आहे, तरी हा बोध त्या सगळ्या बोधाचा पाया आहे. " ह्यांत काय संशय आहे? आह्मांला तर असें वाटतें कीं, हा बोध जो आहे, त्याची किंमत मागच्या सगळ्या बोधापेक्षां फार मोठी आहे. केवळ अमीरसाहेबांच्या चिरंजीवानींच नव्हे, तर, ज्याला ह्मणून ह्या जगांत आपलें हित करून घ्यावयाचें असेल, त्यानें, मग तो राजा असो कीं रंक असो, त्यानें अमीरसाहेबांचे हे शब्द आपल्या हृत्पटलावर निरंतर खोदून ठेवावे असे आहेत.

राजसत्ताक, राजप्रजासत्ताक आणि प्रजासत्ताक असे जे राज्यरचनेचे तीन प्रकार आहेत, त्यांची माहिती अमीरसाहेबांस चांगली होती, आणि आपल्या आफगाणिस्थानास ह्यांतला कोणता प्रकार हितावह होईल, ह्याविषयीं ते नेहमीं विचार करीत असत. त्यांनीं त्याविषयीं असें ह्मटलें आहे—"सध्या जी व्यवस्था केली आहे, ती अद्याप पक्क दशेस आली नाहीं. राज्यकारभारांत प्रजाजनमंडळ जें घेतलें आहे, त्यास अद्याप कायदे करण्याचें किंवा राजाच्या कृतीस, योग्यायोग्य विचार पाहून, संमती देण्याचें सामर्थ्य यावें तितकें आलें नाहीं आहे. परंतु, तें कांहीं काळानें येईल अशी आशा आहे. आणि तें आलें ह्मणजे आफगाण लोकांस आफगाणिस्थानचा राज्यकारभार चांगल्या रीतीनें चालवितां येऊन स्वदेशाचें रक्षण उत्तम प्रकारें करितां येईल. माझ्या मुलांस माझें निक्षून सांगणें असें आहे कीं, तुह्मी ह्या लोकनियुक्त राज्यकारभारी मंडळीच्या ओंजळीनें पाणी पीत जाऊं नका. तुह्मी राज्यांतलें सैन्य आपल्या हुकुमांत ठेवा, आणि त्याची व्यवस्था स्वतः

तुह्मी पहा. त्यांत दुसऱ्या कोणाचा हात शिरकूं देऊं नका. आणि ही राज्यकारभारांतली सभा किंवा मंडळी जे कांहीं ठराव किंवा कायदे करील, ते मंजूर किंवा नामंजूर करण्याचा अधिकार तुह्मी आपले हातीं ठेवा." ह्मणजे, सध्या जशी व्यवस्था इंग्लंडांत आहे, तशी व्यवस्था आफगाणिस्थानांत सर्व प्रकारीं व्हावी, अशी अमीरसाहेबांची इच्छा होती.

लोकांत सुधारणा चालू कराव्या. पण त्या अशा युक्तीनें हळू हळू अशा कराव्या कीं, त्यांविषयीं लोकांस वाईट वाटूं नये, आणि त्यावरून त्यांच्या मनांत राजाविषयीं वैषम्य येऊं नये. राजप्रजासत्तात्मक राज्यव्यवस्था, सौम्य कायदे, आणि लोकशिक्षण हीं युरोपांतल्या पद्धतीवर चालवावीं. तीं लोकांच्या संवयीस पडतील तशी चालवावीं. घाई करूं नये. ह्मणजे, या राज्यव्यवस्थेच्या सौम्य कायद्यांच्या आणि शिक्षणाच्या योगानें जें स्वातंत्र्य त्यांस प्राप्त होईल, त्याचा असद्व्यय त्यांच्या हातून व्हावयाचा नाहीं. असें ते ह्मणतात.

परकीय राजकारस्थानांच्या किंवा आपल्या दरबारच्या लोकांच्या मसलती अमीरांनीं फार सावधगिरीनें ऐकाव्या. त्यांवर आंधळा विश्वास ठेवूं नये. ह्या संबंधानें सादी कवीनें जें ह्मटलें आहे कीं, "आपणाजवळून जे परके लोक जात आहेत, ते सगळे चोर आणि खिसेकापू आहेत, असें जो मनुष्य समजेल, त्याच्या खिशांतल्या पैशाला कधीं ढका लागावयाचा नाहीं," तें लक्षांत ठेवावें. कांकीं, दरबारचीं माणसें देखील द्रव्यवश होण्याचा संभव आहे. असें त्यांचे मत होतें.

अफगाणिस्थानांतल्या बेबंद लोकांपासून आणि परचक्रापासून राज्याचें रक्षण करण्यास लष्करास उत्तम प्रकारच्या

बंदुका दिल्या पाहिजेत. दाहालक्ष हत्यारबंद शिपाई ह्या कामास बस आहेत. ते नेहमीं तयार असावे अशी तजवीज केलेली आहे. ह्या लोकांचे मुख्य दोन भाग केले आहेत; ३००००० चाकरीस ठेवलेले लोक, आणि ७००००० आपखुषीनें शिपाई झालेले लोक. ह्या आपखुषीच्या शिपायांस विशेष लक्ष देऊन शिकवावें लागतें. ह्या सगळ्या सैन्यास तीन वर्षेंपर्यंत पुरावी अशी दारूगोळ्याची आणि अन्नाची सामुग्री तयार ठेवावयाची असते. त्याप्रमाणेंच खजीन्यांत रोख पैसाही ह्या सैन्यास पगार देण्यास आणि दारू गोळ्यांचे कारखाने चालविण्यास पुरे असा पाहिजे. सैन्यास नेहमीं संतुष्ट ठेविलें पाहिजे. असंतुष्ट सैन्य असण्यापेक्षां सैन्य मुळींच नसलें पुरवलें. सैन्य तृप्त ठेवायास दोन गोष्टी मुख्य पाहिजेत. एक गोष्ट ही कीं, चाकरीस राहाण्यास कोणावर सक्ती नसावी, आणि शिपायांस पगार वेळच्या वेळीं मिळावे. अमीर शेरअली ह्यांनीं ह्या दोन गोष्टींकडे लक्ष पुरविलें नाहीं. त्याच्या पायीं त्यांचा सर्वस्वीं नाश झाला. शिपायाचें लक्ष आपल्या कुटुंबाचा निर्वाह कसा चालला असेल ह्या काळजींत असलें, ह्मणजे त्याच्या हातून लढणें होत नाहीं. सादी कवीनें ह्मटलें आहे— ‘शिपायाला पैसा द्या, ह्मणजे तुम्हां करितां तो आपलें शिर समरांगणीं देण्यास तयार होईल. पण जर त्याला तुम्हीं पैसा दिला नाहीं, तर तो आपलें शिर तुमच्याकरितां खरचीं घालणार नाहीं.’ शूर शिपायाची योग्यता मोठी आहे. जामी कवीनें ह्मटलें आहेः— ‘एक शूर लांडगा लाख मेंढयांना भारी आहे.’ तसेंच फर्दूसीनें ह्मटलें आहेः—‘ उगाच माणसांचा

घोळका काय कामाचा ? एक लाख बाजार बूणगें असण्यापेक्षां हजार शूर शिपाई असावे ते बरे.' असे उद्गार ते वारंवार काढीत.

सेनापति प्रामाणिक आणि राजनिष्ट असावे. ते मोठ्या घराण्यांतले असले तर फारच चांगलें. बढत्या द्यावयाच्या त्या नौकरीच्या मुदती पाहून देऊं नयेत. तर, पराक्रम, बुद्धि, दक्षता, स्वजनप्रियता आणि राजनिष्ठा हीं पाहून द्याव्या. सगळ्या लष्करी अमलदारांस आलीकडची कवाईत आली पाहिजे. तिचा अभ्यास करण्याकरितां त्या विषयावरच्या कितिएक इंग्लिश ग्रंथांचें भाषांतर पारशी भाषेंत केलें आहे, आणि कितीएकांचें चाललें आहे. सरहद्दीवरच्या परकीय लोकांतली माणसें आपल्या लष्करांत कदापि चाकरीस ठेवूं नयेत. अफगाण लोकांनीं नेहमीं लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, अफगाणिस्थानाचें हित तेंच त्यांचे स्वतःचें हित आहे. असें ते ह्मणत.

प्रजा संतुष्ट ठेविली पाहिजे. तेंच राजाचें मुख्य कल्याण आहे. सादी कवीनें ह्मटलें आहे:—"प्रजा हीं पाळेंमुळें आहेत, आणि राजे हे वृक्ष आहेत. पाळामुळांच्या आधारावांचून झाडें मुळीं उभीं रहावयाचींच नाहींत." ह्मणून देशांत शांतता ठेवणें आणि लोकांस सुख होईल असे प्रयत्न नेहमीं करणें हें राजाचें मुख्य कर्तव्य आहे. प्रजा श्रीमंत आणि स्वस्थ तर राजा स्वस्थ. प्रधान हे प्रजाजनांतून निवडून घ्यावयाचे असतात, ते शाहाणे असले ह्मणजे राज्यव्यवस्था चांगली राहाते. ह्मणून आधीं प्रजा सुशिक्षित करण्याविषयीं फार जपायास पाहिजे. स्त्रीशिक्षण चांगलें वाढलें पाहिजे. अफगाणिस्थानांतल्या स्त्रिया सुशिक्षित झाल्या पाहिजेत. असें झाल्याशिवाय अफगाणिस्थानाचें पाऊल उन्नतिमार्गांत पुढें पडावयाचें नाहीं. कां कीं, मुलें जें काय

आरंभीं शिकतात, तें आपल्या आयांपासून शिकतात, आणि त्या बालपणांत जे विचार त्यांच्या मनांत भरतात, ते बहुतेक जन्मभर जशाच्या तसे राहतात, आणि त्यांचें सगळें वर्तन त्याच्याच अनुरोधानें होत असतें. ह्मणूनच पैगंबर महंमदाची अनुज्ञा अशी आहे कीं, स्त्रियांनीं आपल्या पतीच्या परवानगी-शिवाय आणि संमतीशिवाय कांहीं झालें तरी आपल्या घराच्या बाहेर पडतां कामास नये, परंतु, स्वशिक्षणाकरितां जर त्या तशा घरा बाहेर गेल्या तर त्यांस जाऊं द्यावें. असें ते नेहमी बोलत.

पुरुष चांगले शिकलेले, बायका चांगल्या शिकलेल्या, आणि सामन्यत्वें सर्व लोक चांगले शिकलेले, अशी स्थिति असली, ह्मणजे, राज्यकारभार चालविण्यास त्यांतलेच जे चांगले लोक निवडले जातात, त्यांचे आणि प्रजाजनांचें चांगलें जमतें. सुशिक्षित राजा आणि अशिक्षित प्रजा ह्यांचें जमत नाहीं, तसें अशिक्षित राजा आणि सुशिक्षित प्रजा ह्यांचेंही जमत नाहीं. दोन्ही बहुधा एकसारखी असावी, हें इष्ट आहे. पण ह्यांत चुकामूक पडली ह्मणजे कसा चमत्कार होतो, ह्याविषयीं एक गोष्ट आहे. ती अशी. एका राज्यामध्यें राजास जोशांनीं सांगितलें कीं, आज रात्रीं पाऊस पडावयाचा आहे, त्याचें पाणी ज्यांच्या पोटांत जाईल तीं माणसें खुळीं व्हावयाचीं. ह्मणून राजानें आणि प्रधानांनीं त्या रात्रीं आपापले हौद झांकून ठेविले. आणि पावसाचें पाणी आंत जाऊं दिलें नाहीं. परंतु, प्रजाजनांस तसें कांहीं करितां आलें नाहीं. तेव्हां अर्थात, राजा आणि त्याचे प्रधान एवढीं माणसें मात्र कायतीं शहाणीं राहिलीं, आणि बाकीचीं सगळीं माणसें खुळीं झालीं. ह्याचा परिणाम

असा झाला कीं, राजा आणि प्रधान हे प्रजेच्या हिताकारितां ह्मणून जें कांहीं करीत, तें प्रजेला मूर्खपणाचें वाटे, आणि प्रजा इतकी मूर्खपाहून राजास आणि प्रधानांस वाईट वाटे. कांहीं केल्या त्यांचें जमेना. कलह माजायाची वेळ आली. तेव्हां, दोन्ही पक्षांच्या समजुतीचा मेळ पडण्याकारितां, ह्मणजे प्रजेइतके खुळे होण्याकारितां, राजा आणि प्रधान तें पाणी प्याले. तेव्हां त्यांचें राज्य बरोबर चालूं लागलें." बोलून चालून दृष्टांत आहे. ह्याचें तात्पर्य एवढेंच आहे कीं प्रजा आणि राजा ह्यांच्या विद्यागुणांमध्यें फार अंतर नसावें.

अमीरसाहेब सिंहासनारूढ झाले, तेव्हां देशामध्यें बेबंद लोक मस्ती करीत होते, कोणी कोणाचें ऐकत नव्हतें, सगळ्या राज्यांत झोटिंगबाहशाही होती, तेव्हां, कांहीं वेळपर्यंत त्यांस फार कडक कायदे करून ते अंमलांत आणावे लागले, तेव्हां लोक वठणीस आले. असा कडकपणा त्यांस कांहीं आवडला नाहीं. परंतु, त्या कामांत त्यांचा निरुपाय होता. भयंकर रोग जाण्यास जाज्वल्य उपाय करावे लागतात. तरी अमीरसाहेब असें ह्मणत कीं, "आतां शिक्षणाच्या योगानें लोक शांत आणि सौम्य झाले आहेत, त्या मानानें मीं आपले कायदेही सौम्य केले आहेत. आणि माझ्या गादीवर बसणारांनीं हाच क्रम पुढें चालविला पाहिजे. त्यांनीं नेहमीं लक्षांत ठेवावें कीं, देशांत कायदेकौंसलें किंवा पार्लमेंटें जीं असतात, तीं ह्याच कामाकरितां योजिलेलीं असतात. ह्मणजे, कालदेशवर्तमानानुसार त्यांनीं देशाचे कायदे बदलावे, हें त्यांचें मुख्य काम असतें. आणि आह्मांला अशी आशा आहे कीं, सुशिक्षेच्या योगानें आणि राज्य-

कर्त्यांच्या शिकवणीनें अफगाणिस्थानांतले लोक लवकरच इतके सुधारतील कीं, आपल्या देशाच्या राज्याचे कायदे ते आपण स्वतः करतील."

अमीर साहेबाचें ह्मणणें असे आहे कीं, राजापाशीं हेर असलेच पाहिजेत. त्यांवाचून खरीखरी लोकस्थिति त्यास कळावयाची नाहीं. त्याप्रमाणें शत्रूंचीं कारस्थानेंही त्यांशिवाय कळावयाचीं नाहींत. खरे मित्र आणि खरे शत्रु हे ओळखण्यालाही मार्ग तोच आहे.

नुसतें ज्ञान कांहीं कामाचें नाहीं. त्याच्या जोडीस व्यवहार कळला पाहिजे. नाहींतर नुसत्या ज्ञानाच्या योगानें फजीती मात्र होते. ह्याविषयीं एक गोष्ट ते सांगत. एका राजानें आपल्या मुलास एका ज्योतिषीबावाच्या हाताखालीं विद्याभ्यास करण्यास ठेविलें, आणि सांगितलें कीं, तुह्मी जितकें चांगलें ह्याला शिकवाल, तितकें मोठें बक्षीस आह्मी तुह्मांस देऊं. त्याप्रमाणें त्या जोशीबावांनीं त्या राजपुत्रास ज्योतिष शिकविलें. तो चांगला प्रवीण झालासें वाटल्यावर त्यांनीं महाराजांस मुलाची परीक्षा घ्यावयास बोलाविलें. महाराज आले. आणि त्यांनीं आपल्या मुठींत एक रुप्याची आंगठी घेऊन, ज्योतिषीबावांच्या हाताखालच्या दुसऱ्या एका विद्यार्थ्यास विचारिलें, माझ्या मुठींत काय आहे?

**विद्यार्थी**—कांहीं तरी वाटोळें आहे.

**राजा**—त्याचा रंग कसा आहे?

**विद्यार्थी**—शुभ्र.

**राजा**—तें कशाचें केलेलें आहे?

**विद्यार्थी**—रुप्याचें केलेलें आहे, आणि मध्यें पोकळ आहे

इतक्या खुणा पटल्याबरोबर रुप्याची आंगठी आहे, असें त्या विद्यार्थ्यानें सांगितलें. तें ऐकून राजानें त्याला शाबासकी दिली. नंतर राजपुत्र पुढें आले. त्यांस त्यांच्या वडिलांनीं तेच प्रश्न केले. आणि त्यांनीं तेंच गणित करून त्याचीं सगळीं उत्तरें पहिल्या विद्यार्थ्याप्रमाणेंच दिलीं. परंतु रस्त्यावरची खडी दाबावयाच्या रूळास जें वाफेचें यंत्र लावितात त्याचें "फ्लायव्हील" चाक रुप्याचें केलेलें नसतें, आणि तेवढें मोठें चाक आपल्या वडिलांच्या मुठींत मावणार नाहीं, हें व्यावहारिक ज्ञान त्या बापड्याला नसल्यामुळें, त्यानें ती वस्तु रुप्याची आंगठी ह्मणून न सांगतां, वाफेच्या यंत्राचें फ्लाय व्हील तुमचें हातांत आहे असें पटकर सांगितलें ! तें ऐकून राजाला फार वाईट वाटलें. त्यास ज्योतिषी बावांनीं ह्मटलें कीं, मी जें काय ह्याला पढविलें आहे, तें ह्याला चांगलें येत आहे, आणि त्या पुरतीं ह्यानें उत्तरें बरोबर दिलीं. परंतु, ह्याला व्यवहारज्ञान नाहीं—तें माणसाला उपजत असावें लागतें—तें ह्याला नाहीं, त्याला माझा काय उपाय? खरें आहे. आमच्यांतले एक पदवीधर, आपल्या घराच्या माजघरांत घोड्यावर बसावयास शिकत होते! त्याप्रमाणेंच, चाह्मारास जोडा करायास सांगितला ह्मणजे त्याला विसाराबद्दल पावली चवली देण्याचें एकीकडे ठेवून, त्याजपाशी आठ चार आणे तहडप मागत असत. एक राजेसाहेब, हुकमावर सही, श्रीकाराजवळ करीत असत, हुकमाच्या खालीं करीत नसत. कां तर, कारकुनाचें लिहिणें बर

आणि माझें लिहिणें त्याच्या खालीं असावें काय? अशा कोत्यांपुढें उपाय नाहीं! असें ते नेहमीं बोलत.

अमीरसाहेब मोठे धार्मिक होते. धर्मावर त्यांचा विश्वास फार मोठा होता. आपल्या अफगाणिस्थानाचे कल्याणास धर्मश्रद्धा आवश्यक आहे, असें त्यांचें मत होतें. त्यांनीं ह्मटलें आहे:—"राष्ट्राचा अभ्युदय होण्यास धर्म पाहिजे. ज्या राष्ट्रास धर्म नाहीं, तें राष्ट्र लवकर लयास जाईल, नाश पावेल. मुसलमान लोक फार शूर आहेत, ह्याचें कारण असें आहे कीं, ते मोठे धर्मनिष्ट आहेत."

अफगाणिस्थान देश प्रशस्त आहे. हवा उत्तम आहे. संपत्युत्पादक साधनें विपुल आहेत. बाहुबल आणि बुद्धिबल ह्यांत अफगाण लोक कोणत्याही दुसऱ्या विद्याचारसंपन्न लोकांपेक्षां कमी नाहींत. देशाच्या मर्यादा ठरल्या आहेत. बेबंद लोकांचा बंदोबस्त झाला आहे. सैन्य, शस्त्रास्त्रें आणि खजीना ह्यांची व्यवस्था उत्तम प्रकारें लागली आहे. तेव्हां आतां विशेष सुधारणा करण्याचा काल जवळ आला आहे, असें दिसतें. व्यापार, लोकशिक्षण, खनिज पदार्थ काढण्याकरितां खाणी खणणें, परदेशांतल्या भांडवलदारांस आणि व्यापाऱ्यांस प्रोत्साहन देणें, कालवे खणणें, पाटबंधारे बांधणें, वितळलेल्या बर्फाचें पाणीं खजीन्यांत सांठवणें, त्याचा उपयोग शेतकीकडे करणें, परदेशांतल्या पेढ्यांशीं व्यवहार ठेवणें, ब्यांकनोटा काढणें, इत्यादिकांस आरंभ केला पाहिजे. असे विचार वारंवार त्यांच्या तोंडांतून निघत.

व्यापारस्वातंत्र्याविषयीं त्यांचे विचार अगदीं अलीकडच्य अर्थशास्त्र्यांच्या सारखे होते. ते ह्मणतात, व्यापारस्वातंत्र्य

फार चांगलें आहे. तें पाहिजे आहे. पण तें सध्या नको आहे. रोख पैसा परदेशांस देऊन तेथला माल देशांत आणणें हें नको आहे. देशाला ज्या वस्तूंची गरज आहे, त्या वस्तु देशांतल्या देशांत उत्पन्न करितां आल्या पाहिजेत. एवढेंच केवळ नव्हे. तर, त्या वस्तु आपल्या लोकांस पुरून उरल्या पाहिजेत, आणि उरलेल्या वस्तु परदेशांस विकल्या पाहिजेत. त्याच्या योगानें देशांतले लोक श्रीमंत होतील.

बाहेरचा पैसा अफगाणिस्थानांत आणण्यास कातडीं, आणि धान्य आणि कांहीं खनिज पदार्थ हीं पुष्कळ बाहेर पाठवितां येण्यासारखीं आहेत. तशीं फळेंही पुष्कळ पाठवितां येतात. परंतु, त्यास आगगाड्या आणि आगबोटी पाहिजेत. त्यांची सोय नाहीं. तेथें सध्या उपाय नाहीं. असें ते ह्मणत.

अफगाणिस्थानास येण्याचे आणि अफगाणिस्थानांतले रस्ते चांगले करावे, आणि त्यांवर बंदोबस्त चांगला राखवा, म्हणजे प्रवासी लोकांस आणि व्यापाऱ्यांस फार सोय होईल. परंतु, आगगाड्या करण्याचें सध्या मनांत देखील आणूं नये. कां कीं, तशी वेळ अद्याप आली नाहीं. आपलें सैन्य छान तयार झालें, आपल्या सैन्यास आपल्या देशाचें संरक्षण उत्तम प्रकारें करण्याचें सामर्थ्य आलें, ह्मणजे मग खुशाल आगगाड्या आणि तारायंत्रें करावीं. त्यांच्या योगानें आणखी एक मोठा लाभ होईल. तो असा कीं, अफगाणिस्थानाची हवा स्वित्सर्लंडाच्या हवेसारखी उत्तम असल्याच्या योगानें, बाहेर देशांतले श्रीमंत लोक हवा पालटण्याकरितां आणि करमणुकीकरितां अफगाणिस्थानांत येतील, ते भाड्यांचीं घरें घेतील, घोडे खरेदी करतील, शिवाय दुसरे चमत्कारिक पदार्थ विकत घेतील,

त्याच्या योगानें पुष्कळ पैसा अफगाणिस्थानांत राहील. परदेशच्या लोकांनीं अफगाणिस्थानांत चैनी करितां यावें, असें त्यांच्या नेहमीं बोलण्यांत येत असे.

अफगाणिस्थानांत अगगाड्या करावयाच्या, त्या प्रथमारंभीं अगदी अंतर्भागीं—ह्मणजे सरहद्दीपासून फार दूर—आंतल्या आंत शहरांच्या मध्यें कराव्या. आणि वर सांगितल्याप्रमाणें स्थिति प्राप्त झाली ह्मणजे मग त्या सरहद्दीपर्यंत पोंचविण्यास हरकत नाहीं. त्यांतही, विशेष अनुकूल अशा राष्ट्रांशीं आधीं संबंध जोडावा. आणखी, परकीयांस कांहीं सवलती देणें अत्यंत आवश्यक वाटेल, तर, ज्या राष्ट्राचा संबंध सरहद्दींशीं नाहीं, त्या राष्ट्रांतल्या लोकांस—ह्मणजे फ्रेंच लोकांस किंवा जर्मन लोकांस—द्याव्या, इतरास देऊं नयेत. त्याप्रमाणेंच इंजिनियर वगैरे कामदार जर परराष्ट्रांतले ठेवणें झालें, तर ते त्यांतलेच ठेवावे. असें अमीरसाहेबांनीं सुचविलें आहे.

पैगंबर महंमद ह्यांचें उदाहरण नेहमीं डोळ्यांपुढें ठेवण्याविषयीं अमीरसाहेब आपल्या मुलांस आणि लोकांस बोध करीत असत. त्यांच्या चरित्रावरून त्यांनीं असें दाखविलें आहे कीं, सत्यशीलता हेंच साधुत्वाचें, भविष्यवादीपणाचें किंवा देवत्वाचें मुख्य तत्व आहे. महंमदसाहेब हे पैगंबर असे लोकांत प्रसिद्ध होण्याच्या अगोदर त्यांच्या सत्यशीलतेवरून आणि प्रामाणिकपणावरून त्यांस सत्यव्रत महंमद असें नांव पडलें होतें. आणि त्यांचे तोंडांतून असत्य कधीं यावयाचें नाहीं, अशाविषयीं लोकांची जेव्हां पक्की खातरी झाली, तेव्हां, आपण देवाकडून आलों आहों, हें त्यांचें ह्मणणें सर्व लोकांस अक्षरशः

खरें वाटलें. पैगंबरांनीं माणसांस सांगितलें आहे कीं, "सत्य हें तुमच्या आत्म्याचें बळ आहे, असत्य हें त्याचें विष आहे."

अफगाणिस्थानाचा संबंध इतर विद्याचारसंपन्न राष्ट्रांशीं राहण्यास एक गोष्ट त्यांस अत्यंत अवश्यक वाटे, आणि ती कशी साध्य व्हावी, ही त्यांस पंचाईत पडली होती. ती गोष्ट ह्मणजे बंदर होय. अफगाणिस्थानाचें सान्निध्य समुद्राशीं मुळींच कोठें आलेलें नाहीं, आणि समुद्रास मोठ्या मुखानें मिळते अशी एकादी नदीही त्यांत नाहीं. तेव्हां अफगाणिस्थानाच्या अमलांत आगबोटी येऊन लागण्यास अथवा अफगाणिस्थानाच्या राज्यांतून आगबोटी बाहेर जाण्यास साधन मुळींच नाहीं. तरी, त्यांचें ह्मणणें असें असे कीं, अफगाणिस्थानाचा नैर्ऋत्येकडील कोंपरा हा इराणी अखाताच्या फांट्याला आणि हिंदीमहासागराला अगदीं जवळ आहे. हें नच साधेल, तर आक्सस नदीवरून लहान लहान आगबोटी चालविण्याचा विचार केव्हां तरी करावा. असे त्यांचे विचार चालत असत.

अमीरसाहेबांची फार इच्छा होती कीं, अफगाणिस्थान आणि इंग्लंड ह्यांचें सख्य पुष्कळ असावें. आणि तें साधण्याकरितां ते स्वतः पुष्कळ प्रयत्न करीत असून आपल्या पश्चात् तसेच प्रयत्न चालू ठेवावे, असा आग्रह ते आपल्या मुलांस आणि गादीवर बसणाऱ्यांस करीत. आणखी, आपल्या सरकाराच्या वतीचा एक वकील लंडनच्या दरबारीं असावा, अशी जी ते खटपट करीत होते, ती ह्याकरितांच होती. ह्या संबंधानें त्यांनीं आपल्या गादीच्या वारसांस असा बोध केला कीं, हें सख्य जितकें वाढववेल तितकें वाढविण्याचा प्रयत्न तर कराच, परंतु, तें जर न साधलें, तर निदान आहे तेवढें

तरी जपून राखा. त्याची उपेक्षा करूं नका. नाहींतर तें ही हातचें जाईल. ह्या विषयीं त्यांनीं एक गोष्ट सांगितली, ती अशी. एका गरिब माणसाला स्वप्नांत असें दिसलें कीं, देव आपणास कांहीं द्रव्य देतो आहे. तेव्हां त्यानें ह्मटलें कीं मला हिरेमाणकें पाहिजेत. तेव्हां देव त्याला रुपये देऊं लागला, तरी पुनः ते न घेतां तो हिरेमाणकें मागूं लागला. नंतर त्याला देव मोहोरा देऊं लागला, तेव्हांही तो, आपला हेका धरून हिरेमाणकेंच द्या ह्मणाला. इतक्यांत जागा होऊन पाहूं लागला तों पैसे नाहींत व हिरेमाणकेंहीं नाहींत. तेव्हां पुनः तो डोळे मिटून पैसे तरी द्या ह्मणूं लागला. परंतु, त्याला कांहीं एक मिळालें नाहीं. तसें होऊं नये.

एकंदरीनें पाहिलें असतां, अमीरसाहेबांची अशी खातरी झाल्यासारखी दिसत होती कीं, अफगाणिस्थानाचें कल्याण साधण्यास इंग्लंडाशीं सख्य ठेवणें हें अत्यंत आवश्यक आहे. आणि तेंच खरें आहे.



# भाग पंधरावा.



## मृत्यु.

मृत्यु न ह्मणे हा कूर, मृत्यु न ह्मणे हा झुंजार
मृत्यु न ह्मणे हा संग्रामशूर, समरांगणीं. १.
गेले बहुत पुरुषार्थाचे, गेले बहुत विक्रमाचे
गेले बहुत आटोप्याचे, कार्यकर्ते. २
श्रोतीं कोप न करावा, हा मृत्युलोक सर्वांस ठावा
उपजला प्राणी जाईल बरवा, मृत्युपंथें. ३.
ऐसें जाणोनियां जीवें, यांचं सार्थक करावें
जनीं मरोनि उरावें, कीर्तिरूपें. ४.

रामदास.

हा सद्‌बोध अनादिकालापासून साधु करीत आले आहेत. आणि तो कोट्यावधि माणसांच्या कानीं पडला आहे. परंतु, त्याप्रमाणें वागणारे असे थोडे—फारच थोडे—होऊन गेले आहेत. त्यांतच अमीर अबदुल रहिमान ह्यांची गणना केली पाहिजे. त्यांचें जीवनचरित्र मागच्या भागांत वर्णिलें आहे. आतां ह्या भागांत त्यांच्या मृत्यूची हकीकत सांगावयाची आहे.

अबदुल रहिमान हे प्रकृतीनें निरोगी होते, परंतु, मोठें धट्टेकट्टे नव्हते. लहानपणीं त्यांचे फारसे लाड झाले नाहींत, आणि भरज्वानींत तर त्यांस वनवास भोगावा लागला. त्यामुळें ते थोडे अशक्तच झाले होते. आणखी ते "मनस्वी कार्यार्थी" होते. काम हातीं घेतलें ह्मणजे मग जीवाकडे पाहावयाचें नाहीं, असे ते होते. आणि त्यांस अफगाणिस्थान

सुधारण्याविषयीं अतिशयित उतावळी झाली होती. त्यामुळें त्याच्या संबंधाचे उद्योग करतांना ते आपल्या जीवाकडे पाहात नसत. त्या उतावळीच्या भरीं भरून, ते वीस वर्षें पर्यंत एकसारखे श्रम करीत होते. त्यांच्या जीवास विश्रांति अशी पळभरही मिळाली नाहीं. त्यामुळें अलीकडे त्यांस संधिवायूनें घेरलें होतें. तो त्यांस कधीं कधीं जाग्यावरून हालूं देत नसे. आणि आलीकडेआलीकडे त्या संधिवायूच्या साह्यास दुसरेही बारीक-सारीक रोग आले होते. त्यांच्या योगानें त्यांची प्रकृति इ० स० १९०१ च्या सप्तंबरच्या अठ्ठाविसाव्या तारखेस अर्धांगवायूची विकृति होऊन इतकी बिघडली कीं, ह्या दुखण्यांतून आपण वांचत नाहीं, असें त्यांस खचीत वाटलें. तरी, ते तिळमात्रही घाबरले नाहींत. त्यांनीं लागलेंच आपल्या उभयतां चिरंजीवांस, सरदारांस, मानकऱ्यांस आणि मुलकी व लष्करी मोठमोठ्या मुख्य कामदारांस जवळ बोलावून आणिलें. त्यांचे सलाम घेतल्यावर आणि त्यांस बसायास सांगितल्यावर, अगदीं हळू परंतु स्पष्ट शब्दांनीं अमीर साहेब त्यांजकडे वळून ह्मणाले, " राजा वृद्ध होतो, व्यंग होतो, किंवा मरायास टेंकतो, तेव्हां तो आपल्यामागें आपल्या गादीवर कोणाला तरी नेमीत असतो, हें तुह्मां सर्वांस ठाऊक आहेच. त्याप्रमाणें, माझ्यामागें माझ्या गादीवर कोणीं बसावें, हें मला आतां निश्चित करावयाचें आहे. तुह्मी आपसांत विचार करा, आणि माझ्या गादीवर बसण्यास योग्य तुह्मांस कोण वाटतो तो मला सांगा. " हें ऐकून सर्वांचे कंठ दाटून आले, आणि त्यांच्या नेत्रांतून अश्रु वाहूं लागले. त्यांच्या मुखावाटे शब्द निघेना. तरी मोठें धैर्य करून त्यांनीं सर्वांनीं

एकदम उत्तर दिलें कीं, " शाहाजादे हबिबुल्लाखान ह्यांनीं आज आठ वर्षें राज्यकारभार उत्तम प्रकारें चालविला आहे, तेच आमचे प्रभु व्हावे, अशी आमची इच्छा आहे. " नंतर अमीरसाहेबांच्या सांगीवरून, रत्नखचित मुटीची तरवार अडकविली आहे असा कंबरपट्टा त्यांनीं हबिबुल्लाखानांस दिला, आणि त्याबरोबर एक मोठें पुस्तक दिलें. त्यांत बहुधा अमीरसाहेबांचें मृत्युपत्र आणि राज्य चालविण्यविषयींचे नियम हीं असावीं, असा अजमास आहे. नंतर, अमीरसाहेबांनीं आपल्या दुसऱ्या चिरंजीवांकरवीं हबिबुल्लाखानांच्या मस्तकीं मुकुट घालविला. अशा प्रकारें करून, अमीर अबदुल रहिमान ह्यांनीं आपल्या समक्ष हबिबुल्लाखानांस अफगाणिस्थानचे अमीर केलें.

अमीर अबदुल रहिमान त्या दुखण्यानें अधिकाधिक थकत जाऊन, शेवटीं आक्टोबरच्या पहिल्या तारखेस मरण पावले. तरी, तें वर्तमान तिसऱ्या तारखेपर्यंत हबिबुल्लाखानांनीं बाहेर कळूं दिलें नाहीं. तिसऱ्या तारखेस अमीर हबिबुल्लाखान ह्यांनीं मोठा दरबार भरविला. त्यास सगळे सरदार, मानकरी, दरकदार, मुलकी आणि लष्करी मुख्य अमलदार बोलाविले होते. शिवाय, हजारों दुसरे लोक त्यास आले होते. सगळी मंडळी आपापल्या दरजाप्रमाणें जाग्यांवर बसल्यावर, काबूलचे मुख्य काजी साहेब उठून उभे राहिले, आणि गंभीरपणानें त्यांनीं भाषण करून असें ह्मटलें कीं, अफगाणिस्थान हा मुसलमानी देश आहे, ह्याकरितां, नवीन अमीरांची स्थापना सिंहासनावर झाल्यावांचून माजी अमीरांचा प्रेतविधि व्हावयाचा नाहीं. नंतर, ते काजीसाहेब, मामुल वहिवाटीप्रमाणें

अमीर हबिबुल्लाखानांजवळ गेले, आणि त्यांनीं त्यांस नवें पागोटें बांधिलें, आणि आतां आपले सर्वांचे हे प्रभु आहेत, असें जमलेल्या सगळ्या लोकांस कळविलें. तें कांनीं पडल्यावर अमीरसाहेबांच्या धाकट्या भांवांनीं पुढें सरून, मोठ्या भक्तिभावानें त्यांस सलाम केले, आणि ते आपले प्रभु ह्मणून कबूल केलें. त्यांचें पाहून बाकीच्या सगळ्या लोकांनीं तसेंच केलें. त्यानंतर नवीन अमीर हबिबुल्लाखान ह्यांनीं मंडळीस लक्षून भाषण केलें. त्यांत त्यांनीं ह्मटलें कीं, "मुसलमान राजानें जसें राज्य करावें तसें मी राज्य करीन, आणि माझ्या देशाच्या मर्यादा जशा सध्या आहेत, तशा मी राखीन, त्यांत कमजास्त करणार नाहीं, आणि माझ्या तीर्थरूपांनीं इंग्लिश सरकाराशीं जसा स्नेहभाव ठेविला होता तसा मी ठेवीन. तारायंत्रें व आगगाड्या आमच्या देशांत चालू करणें आणि इंग्लिश सरकारचा एजंट नेमणें, ह्या संबंधानें मी तीर्थरूपांचे सगळे नियम यथास्थित रीतीनें पाळीन." तें भाषण सर्वांस फार मानवलें, आणि तें पुरें होतांच, मोठ्या आनंदानें त्यांनीं टाळ्यांचा गजर केला. नंतर, देशांतल्या मामुल सांप्रदायाप्रमाणें माजी अमीर अबदुल रहिमान ह्यांच्या प्रेताचा अंत्यविधि झाला. त्यास हजारों लोक गेले होते.

ह्यानंतर लवकरच त्यांचें दुसरें एक भाषण दरबारांत झालें. त्यांत ते ह्मणाले, "स्वदेशाच्या हिताविषयीं आह्मी अत्यंत दक्ष राहूं. ह्याच्या आसपास परकीयांस कधीं फडकूं देणार नाहीं. परकीय देशांतलीं औषधें देखील आह्मीं घेणार नाहीं. ह्या देशास सांप्रतच्या स्थितीमध्यें आगगाड्या आणि तारायंत्रें नकोत आहेत. तीं आह्मी चालूं करणार नाहीं. ख्रिस्ती

धर्मोपदेशकांस आह्मी आपल्या देशांत येऊं देणार नाहीं, त्याप्रमाणेंच परकीयांचें शिक्षण किंवा परकीयांचा व्यापार ह्यांचा प्रवेश ह्या देशांत होऊं देणार नाहीं. तरी आह्मी आपल्या देशांत फारशी आणि आरबी शिकविण्याच्या शाळा घालूं, आणि तद्द्वारा ज्ञानाचा प्रसार करूं. ह्मणजे आमच्या तीर्थरूपांनीं जसें राज्य चालविलें, तसें आह्मी पुढें चालवूं." हें ऐकून सगळ्या मंडळीस परम संतोष झाला.

अमीर हबिबुल्लाखान ह्यांनीं राज्यकारभार पाहाण्यास आरंभ केल्यावर एक फार मोठी गोष्ट केली. ती ही कीं, माजी अमीरांच्या वेळीं हेरांचें प्रस्थ फार असे. त्यांच्या सांगण्यावरून कितीएक लोक अगदीं अपराधी नसतां, अन्यायानें, केवळ संशयावरून तुरुंगांत टाकिले होते. त्या सर्वांची चौकशी करून, त्यांनीं निरपराध्यांस एकदम सोडून दिलें आहे. एकाद्या हेराच्या लबाडीमुळें कोणी तुरुंगांत पडलेला आढळल्यास, त्या हेराला चांगला मोठा दंड करावयाचा, आणि ती दंडाची रकम, त्या कैदेंत पडलेल्या माणसास त्याच्या नुकसानीबद्दल द्यावयाची, असा क्रम त्यांनीं चालविला आहे. ह्या अन्यायाच्या रीतीनें हिंदुस्थानांतले जे लोक तुरुंगांत पडले होते, त्यांस सोडून देऊन, त्यांस चाळीस चाळीस रुपये रोख दिले, आणि शिवाय कपडालत्ता देऊन त्यांस स्वेच्छेप्रमाणें, अफगाणिस्थानांत घरदार करून राहण्याविषयीं किंवा हिंदुस्थानांत आपल्या मूळच्या घरीं जाण्याविषयीं मोकळीक दिली आहे. अशीं दुसरीं कितीएक कामें नवीन अमीर साहेबांनीं चालविली आहेत. त्यांवरून त्यांच्या प्रजाजनांस संतोष होत आहे.

पूर्वीच्या भागांत अमीर अब्दुल रहिमान ह्यांच्या चरित्राचें कथन झालें आहे. त्यावरून त्यांचा स्वभाव कसा होता, हें सहज कळण्यासारखें आहे. तरी, सामान्यत्वें त्याचा गोषवारा येथें ह्मणजे शेवटच्या भागीं सांगण्याचा परिपाठ आहे. त्यास अनुसरून त्याविषयीं दोन शब्द येथें लिहितों. लहानपणापासून अखेरपर्यंत ह्यांनीं जीं कृत्यें केलीं, त्यांचा विचार केला ह्मणजे असें वाटतें कीं, हे पुरुष पहिल्यांपासूनच असाधारण वृत्तीचे होते. राष्ट्राच्या पुनरुज्जीवनास दंडधाऱ्यांच्या ठायीं ज्या गुणांची आवश्यकता असते, ते सारे गुण त्यांच्या ठायीं, शिवाजी महाराज, आलफ्रेद धि ग्रेट, पीटर धि ग्रेट, ह्यांच्याप्रमाणें जन्मतःच होते. त्यांत सत्कर्मावर निष्ठा, साहस, आणि दृढनिश्चय हे गुण विशेष प्रबल होते. आणि हेच ह्यांच्या अभ्युदयास फार उपयोगीं पडले. दूरदृष्टि तर ह्यांच्यापुढें जशी हात जोडून उभी होती. अंगावर पडलेलें काम उत्तम प्रकारें बजावणें हाच काय तो पुरुषार्थ असें ह्यांच्या मनानें अगदीं लहानपणापासून घेतलें होतें. तें अगदीं अखेरपर्यंत जशाचें तसें कायम होतें. अलीकडे दोन वर्षे ते अगदीं थकले होते. फारसे कामकाज त्यांच्यानें होत नसे. तरी, इंग्लिश सरकार आणि बोर लोक ह्यांचें जें युद्ध चाललें होतें, त्याचीं वर्तमानें ते अत्यंत लक्षपूर्वक ऐकत असत, आणि त्यांवरून आपल्या लष्कराच्या सुधारणेस कोणत्या सूचना द्याव्या ह्याचा विचार करीत असत, असें सांगतात. त्यावरून आणि त्यांच्या पूर्वीच्या चरित्रावरून आह्मी असें ह्मणतों कीं, अमीर अब्दुल रहिमान हे इतिहासशास्त्राचे खरे खरे पढिक होते. त्यांचें ऐतिहासिक ज्ञान शब्दपांडित्यापुरतें

नव्हतें. तर, त्याचा उपयोग त्यांच्या व्यवहारांत होत असे. ह्मणजे त्यांचें इतिहासपठण ही नुसती वाचाळता नव्हती. तर प्रत्यक्ष क्रिया होती.

सर लिपेल ग्रिफिन यांनीं अमीर अबदुल रहिमानांविषयीं लिहिलें आहे:—" आमचे इंग्रजांचे मुलगे शाळेंत शिकत असतात त्या वयांत हे एका प्रांतावर सुभेदार होते. वयाला वीस वर्षें पुरीं होण्याच्या आधींच ते सैन्याचे अधिपति झाले. त्यांनीं लढाया मारिल्या, आणि मोठ्या शाहामतीनें बंडें मोडिलीं. वडील अगदीं निरुपयोगी भोळवट होते तरी त्यांस सिंहासनावर बसविलें. त्यांच्या मागून आपल्या मद्यपी आणि व्यसनी चुलत्यांस अमीर केलें. बुखारा आणि रशिया ह्यांत वनवास भोगिला. बालपणांत नानाप्रकारच्या सुखदुःखांचा अनुभव त्यांना आला होता. ह्या सगळयांचा परिणाम एकवटून त्यापासून त्यांची वृत्ति बनली होती. तिनें ते प्रारब्धवादी झाले होते. "

समर्कंद, बुखारा इत्यादि स्थलीं त्यांचा वास झाला, तेव्हां तेथें धैर्य पाहिजे होतें, तें त्यांचे ठायीं होतें. गिलझाई, हजारा, इत्यादि लोकांचीं बंडें मोडावयाच्या वेळीं शौर्य पाहिजे होतें, तें त्यांचे ठायीं होतें. रशियांतल्या कामदारांशीं आणि सरकाराशीं वागण्यांत पक्की नानाफडणिशी पाहिजे होती, ती त्यांचे ठायीं होती. एवढें मोठें ऐश्वर्य स्वपराक्रमानें मिळविलें होतें, तरी, पहिल्यापासून पुष्कळ टक्केटोणपे खाल्ल्याच्या योगानें, नानाप्रकारचीं संकटें आणि अपमान सोसण्यास जी सहनशीलता पाहिजे होती, ती त्यांच्या ठायीं आलेली होती. जेथें क्रूरपणा पाहिजे होता, तेथें तो त्यांचे ठायीं तयार होता. देशाच्या कल्याणार्थ, व्यापारामध्यें, अप्रतिबंधत्व पाहिजे होतें,

तेथें तें होतें, आणि संरक्षण पाहिजे होतें, तेथें तें होतें. सारांश, अफगाणिस्थानासारखा बेबंद आणि दांडगा देश वठणीस आणण्यास आणि त्याची सुधारणा करण्यास, जे गुण आवश्यक होते, ते सगळे अमीर अबदुल रहिमानांचे आंगीं होते. ह्यांविषयीं सर लिपेल ग्रिफिन ह्यांनीं आणखी एके ठिकाणीं लिहिलें आहे कीं, "अमीर साहेबांविषयीं जें काय ह्मणतात, त्यांतली अतिशयोक्ति काढून टाकिली, तरी, शेवटीं असें कबूल करावें लागेल कीं, ज्या राष्ट्रामध्यें सगळी अंदाधुंदी आणि बेबंदी होती, त्या राष्ट्रांत, अमीर साहेबांनीं २० वर्षांच्या अवकाशांत जी काय राज्यव्यवस्था लाविली आहे, आणि जी काय सुधारणा केली आहे, ती खरोखर त्यांनाच ह्मणून करतां आली, इतर कोणास आली नसती." अगदीं खरें आहे.

आपले सध्याचे व्हाइसराय लार्ड कर्झन हे इ० स० १८९४ त अफगाणिस्थानामध्यें प्रवासास गेले होते, तेव्हां अमीरसाहेबांस भेटले होते. त्यानंतर त्यांनीं अमीरसाहेबांविषयीं लिहिलें आहे कीं, "आजपर्यंत अफगाण लोकांस इतकें कोणीं जिंकलें नव्हतें, अफगाणिस्थानांतली झोटिंगबादशाही इतकी कधीं कमी झाली नव्हती, आणि अफगाणिस्थानांत प्रवास करणें इतकें सुरक्षित कधीं पूर्वीं झालें नव्हतें. हें सगळें काम ह्या अमीरसाहेबांनीं, बाहेरचें कोणाचें साह्य न घेतां शेवटास नेलें आहे. आज सगळें अफगाणिस्थान त्यांच्या मुठींत आहे. मागच्या कोणत्याही अमीरांस हें साधलें नव्हतें. अमीर अबदुल रहिमान ह्यांनीं राज्यसूत्रें हातीं घेतल्यावर कंदाहार, हिरात, अफगाण, तुर्कस्थान, आणि बदकशान हीं सगळीं आपल्या स्वाधीन ठेवून, इ० स० १८८३ त

त्यांनीं आपला अमल आक्सस नदीच्या पलीकडेही बसविला. हें कार्य सामान्य नव्हे." हें राज्यकारभाराविषयीं झालें. अमीरसाहेबांच्या बुद्धिचातुर्याविषयीं लार्ड कर्झन ह्यांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे कीं, "वादविवादाच्या कोटिक्रमांत पार्लमेंटतांल्या मोठ्या नामांकित सभासदाची बरोबरी करण्याचें सामर्थ्य अमीरसाहेबांस आहे." हें स्तोत्र अमीरसाहेबांच्या जीवनचरित्रास अत्यंत मोलवान् भूषण होय. आणि ह्यांत अमीरसाहेबांच्या स्वभावाच्या वर्णनाचें सार आहे.

अमीर अबदुल रहिमान हे कांहीं विलक्षण बुद्धिवान होते. हे कांहीं गोष्टींचें भविष्य सांगत तें खरें होई. ह्यांच्या बोलण्यांत कधीं कधीं असें ध्वनित होत असे कीं, ज्या वर्षी इंग्लंडच्या महाराणी विक्टोरिया मरावयाच्या, त्याच वर्षी आपण मरावयाचे. तें खरें झालें आहे.

अमीर अबदुल रहिमानांविषयीं जें काय ग्रंथांतरीं आणि वर्तमानपत्रांत आढळलें, तें येथें थोडक्यांत ग्रथित केलें आहे. त्यावरून वाचकांस एवढें स्पष्ट दिसून येईल कीं, ते मोठे धर्मनिष्ट मुसलमान होते, त्यांची भक्ति स्वधर्मावर अमर्याद होती, आणि कुराणांत सांगितल्याप्रमाणें जे कोणी वागतील, त्यांचें कल्याण होईल असा त्यांचा पूर्ण भरंवासा होता. कां कीं, त्यांस स्वतःला तसा अनुभव आला होता. आणखी, त्याकरितां, शेवटीं शेवटीं, ते आपल्या प्रजाजनांचीं मनें धर्माकडे विशेष वळविण्याचा प्रयत्न करीत असत. तें त्यांच्या वयास, पदवीस आणि मोठेपणास फार शोभत असे. मरायाच्या आधीं एक वर्ष त्यांनीं एक लहानसें धर्मवचनांचें पुस्तक आपल्या लोकांकरितां छापून

प्रसिद्ध केलें. त्यांतल्या मुख्य मुख्य वाक्यांची छाया येथें देऊन हें चरित्र पवित्रपणें पूर्ण करावें, हें बरें दिसतें.

विद्वानांच्या तोंडचे शब्द फार उपयोगी असतात. ते ज्यांच्या कांनीं पडतात, आणि त्यांप्रमाणें जे वागतात, ते खरोखर सुखी होत.

स्त्री, मुलें, बहिणी, आणि इतर सोयरींधायरीं हींच जर कायतीं सुखाचीं साधनें मानिलीं, तर, अविनाशी असें सुख मुळींच कोठें नाहीं, असें ह्मणावें लागेल. कां कीं, हीं सगळीं सोयरींधायरीं, आज आपलीं आहेत, आणि उद्यां आपलीं नाहींत, अशीं चंचल आहेत. काडी मोडून दिली कीं, बायको सुटते. बहिणी आणि मुली आपल्या नवऱ्यांच्या घरीं जाऊन, आपलीं आडनांवें बदलून त्यांच्या कडच्या होतात. त्यांप्रमाणेंच इतर सर्व माणसें आपलीं नाहींतशीं होतात. बरें, अशा प्रकारें हीं गेलीं तरी, त्यांवरून मनुष्य पतित होत नाहीं. परंतु, मनुष्य अधर्मानें वर्ततो, तेव्हां तो पतित होतो, आणि त्याला कारण सांगायाला तोंड राहत नाहीं.

कुराणाच्या चौथ्या अध्यायांत सांगितलें आहे कीं, एकादा माणूस मुसलमानी धर्म टाकून जर दुसरा धर्म घेईल, तर देव त्याचा त्याग करील, आणि न्यायाच्या दिवशीं त्याची मोठी हानि होईल.

मनुष्यानें धर्म सोडिला ह्मणजे तत्क्षणींच त्याची बायको, त्याचीं मुलें, त्याचे सोयरेधायरे, आणि त्याचें जें काय असतें तें, ह्यांवर त्याची सत्ता मुळींच नाहींशी होते. त्याचे लोक त्याला धर्मभ्रष्ट समजतात. अथवा तो मुळीं जन्मास

आला नव्हता असें मानितात. हें जर सर्व धर्मांत सांगितलें आहे, तर, एवढें उघड सिद्ध होतें कीं, मनुष्याचा धर्म गेला कीं, त्याचीं बायकोमुलें आणि दुसरें चटसारें गेलें, असें लोक समजतात. ह्याचा अर्थ असा कीं, धर्मांवांचून सुख नाहीं.

धर्म मुख्य सुख आहे, आणि बाकी लौकिकादि ज्या सुखदायक गोष्टी आहेत, त्या त्यापासून प्राप्त होत असतात. ह्मणून मुसलमानी धर्माचें संरक्षण करणें हें प्रत्येक मुसलमानाचें अवश्य कर्तव्य आहे.

धर्मसंबंधानें जे नियम देवानें नोहा, एब्राहाम, मोजेज, आणि येशू ख्रिस्त ह्यांस सांगितले, तेच तुह्मांला सांगितले आहेत. त्यांत मुख्य नियम हा कीं, देवाला धरून राहा, त्याला कांहीं केल्या सोडूं नका. एकमेकांपासून वेगळे होऊं नका. तर, धर्मांत एकजीव व्हा.

सुख होतें ह्मणूनच काय तो धर्म पाळायाचा असें समजूं नका. तर, त्यानें परमेश्वरप्राप्ति होते, ह्मणून धर्म पाळा. कुराणांत सांगितलें आहे:-परमेश्वराची भक्ति करा, आणि जे कोणी परमेश्वरभक्ति करितात, त्यांचीही भक्ति करा. देव भक्तांस वश असतो. आणि खरे भक्त देवास भजतात.

पैगंबरांनीं ह्मटलें आहे, आईबापें, मुलें, आणि इतर माणसें ह्यांच्याकडे देवापेक्षां अधिक ओढा जोंपर्यंत एखाद्या माणसाचा आहे, तोंपर्यंत तो ईश्वरभक्तच नव्हे.

परमेश्वर आणि पैगंबर ह्यांजवर पूर्ण निष्ठा असल्यावांचून कोणीही माणूस धर्मनिष्ट व्हावयाचा नाहीं.

एका ग्रंथांत पैगंबरांनीं ह्मटलें आहे कीं, आईबापें, मुलें आणि इतर लोक ह्यांच्यापेक्षां परमेश्वरावर अधिक

प्रीति करीपर्यंत कोणीही माणूस खरा धर्मनिष्ठ व्हावयाचा नाहीं.

हे महंमदा, तूं आपल्या अनुयायांस असें सांग कीं, जर तुह्मी देवावर प्रीति करीत असाल, तर माझ्याप्रमाणें वागा ह्मणजे देव तुह्मांवर कृपा करील, आणि तुमच्या पापांची क्षमा करील.

परमेश्वर अत्यंत दयाळू आहे. त्या दयाळूपणाची परमावधि हीच आहे कीं, प्रत्येक खऱ्या धर्मनिष्ठानें पदोपदीं पैगंबरांचें अनुसरण करावें, असें त्यानें सांगितलें आहे. खरी भक्ति ह्मटली ह्मणजे परमेश्वराच्या आज्ञा पाळण्यांत आणि पैगंबराचें अनुकरण करण्यांत माणसास फार आवड असली पाहिजे, आणि फार सुख वाटलें पाहिजे. त्यानें स्वार्थ अगदीं सोडिला पाहिजे, आपल्या इच्छा एकीकडे ठेविल्या पाहिजेत, आणि आपली सगळी धनदौलत सोडिली पाहिजे.

सारांश, देवाची खरी भक्ति ह्मटली ह्मणजे जें काय करावयाचें तें देवाला आणि त्याच्या भविष्यवाद्यांला संतुष्ट करण्याकरितां करावयाचें. कुराणांत ह्मटलें आहे, देवाला अंतःकरणाची भक्ति पाहिजे, बाहेरचा खटाटोप नको.

पैगंबरांनीं ह्मटलें आहे कीं, तुमच्या मनांत जसे हेतु असतील, त्यांप्रमाणें तुमच्या सत्कर्मांचें बक्षीस तुह्मांस मिळेल.

मनुष्य परमेश्वरभक्तीसाठीं आणि धर्मासाठीं जर लढला, तर तो गाजी होतो, आणि जर त्यांत तो मेला, तर त्याला मोठा लाभ होतो.

मनुष्याला जर धर्माचे सगळे नियम बरोबर पाळितां येत नसले, तर त्यानें धर्माचें मुख्य तत्त्व तरी सोडूं नये. तें तत्त्व हें कीं, परपीडा कधीं करूं नये. कां कीं, देवानें आणि पैगंबरांनीं ह्याविषयीं फारच निषेध केला आहे. कुराणांत ह्मटलें आहे कीं, दुसऱ्यांच्या अधिकाराचा अभिलाष करावयाचा नाहीं, ह्याविषयीं सावध रहा. आणि जर तूं खरोखर देवाच्या आणि भविष्यवाद्यांच्या आज्ञा पाळीत असलास, आणि खरा धर्मनिष्ट असलास, तर ज्यांस जें काय तुझ्याकडून अवश्य मिळालें पाहिजे, तें त्यांस देण्यांत निरंतर तत्पर रहा. ह्मणजे, आपलें ऋण फेड.

महंमदानें ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, खऱ्या भक्तांचें मुख्य लक्षण हें आहे कीं, ते आपल्या हातांनीं, जिभेनें किंवा कृतीनें कधीं कोणाची हानि करीत नाहींत.

पुनः महंमदानें ह्मटलें आहे कीं, स्वतःच्या हिताप्रमाणें जो दुसऱ्याचें हित इच्छित नाहीं, त्यास कोणी खरा भगवद्भक्त ह्मणत नाहींत.

ह्मणून अशा खऱ्या परमेश्वरभक्तांच्या अधिकारांचें संरक्षण करणें हें तुमचें सर्व खऱ्या परमेश्वरभक्तांचें अवश्य कर्तव्य आहे. आणि हें कर्तव्य ह्मटलें ह्मणजे, परमेश्वर, महमद पैगंबर आणि राजा ह्यांची भक्ति करण्याच्या खालोखालचें आहे.

पहिल्या प्रतीची आणि दुसऱ्या प्रतीची भक्ति माणसाला जर न साधेल, तर त्यानें निदान तिसऱ्या प्रतीची तरी भक्ति करावी. ती ही कीं, प्रीति करावयाची ती देवाककरितां, आणि वैर करावयाचें तें देवाकरितां, असें असावें, आणि जे कोणी खरे भक्त आहेत, त्यांवर प्रेम करणें आणि जे

कोणी खरे भक्त नाहींत, त्यांचा द्वेष करणें, आणखी पापाचा तिरस्कार करणें, हें व्रत पाळावें.

ह्याचें स्पष्टीकरण केलें पाहिजे. समजा कीं, धर्मशास्त्रांत सांगितलेल्या आज्ञा पाळतां येत नाहींत, किंवा त्यांत सांगितलेले दानधर्म करितां येत नाहींत, तर त्यानें निदान एवढें तरी करावें कीं, त्यानें नेहमीं खरा धर्म पाळणाऱ्यांस साह्य करावें. ह्मणजे त्यावर देवाची कृपा होईल. शिवाय त्यानें नास्तिकाचें आणि नास्तिकाच्या मित्राचे विरोधी व्हावें.

कुराणांत ह्मटलें आहे, अहो भक्तांनों, तुमचे बाप आणि भाऊ जर नास्तिक असले, मुसलमानी धर्मावर विश्वास ठेवणारे नसले, तर त्यांशीं स्नेह ठेवूं नका, आणि जो कोणी अशांशीं स्नेह ठेवील, त्यास पाप लागेल.

ह्याविषयीं देवाची आज्ञा फार कडक आहे. ती अशीं कीं, जर एखाद्या माणसाचा बाप, भाऊ किंवा मुलगा मनापासून अधार्मिकाचा मित्र झाला, तर त्याला त्यानें एकदम दूर करावें. त्याशीं संबंध ठेवूं नये.

पैगंबरानीं ग्रंथांत ह्मटलें आहे कीं, ज्याच्या ठायीं हे तीन गुण असतात, तो खरा धर्मनिष्ठ असतो:—

१. तो इतर सगळ्या जगापेक्षां देव आणि त्याचा भविष्यवादी महमद ह्यांची भक्ति अधिक करितो.

२. जे कोणी अनन्यभावें परमेश्वर भक्त झालेले असतात, त्यांचा भक्त तो असतो.

३. माणूस विस्तवास भिऊन जसा दूर राहतो, तसा विधर्म्यांपासून तो दूर राहतो.

जे कोणी विधर्म्यांचा स्नेह करितात, ते विधर्मी होतात, मुसलमान धर्मनिष्ठांशीं स्नेह होणें हे धर्मनिष्ठ होणें आहे.

ग्रंथांत पैगंबरांनीं ह्मटलें आहे कीं, जो कोणी माझ्या आज्ञा पाळतो, तो देवाच्या आज्ञा पाळतो, आणि जो कोणी माझी अवज्ञा करितो, तो देवाची अवज्ञा करितो. जो कोणी आपल्या अमीरांच्या आज्ञा पाळतो, तो माझ्या आज्ञा पाळतो, आणि जो कोणी आपल्या अमीरांची अवज्ञा करितो, तो माझी अवज्ञा करितो.

खरा भक्त जो आहे, तो पुण्यकर्मे करूनही, देवाला भीत असतो, आणि पातकी जो आहे, तो भयंकर कर्मे करूनही देवास भीत नाहीं; हंसत असतो.

एका विद्वान साधूनें ह्मटलें आहे कीं, मनुष्यें आपण होऊन अशीं पापें थोडीं करितात, परंतु, दुसऱ्यांच्या संगतीनें पापें फार करितात.

भक्तीचे जे तीन प्रकार सांगितले आहेत, त्यांतल्या एकाही प्रकारानें हातून भक्ति होत नसतां, आणि महमद पैगंबरांपासून मनें पराङ्मुख असतां, जे लोक आपणांस मुसलमान ह्मणवितात, आणि धर्मनिष्ठ ह्मणून गर्व वाहातात, ते लोक किती तरी दुर्दैवी असले पाहिजेत ! ह्याविषयीं कुराणांत ह्मटलें आहे कीं, अशा लोकांस देव भयंकर शासन करील. इतर वरचे दोन प्रकार नाहींत तर नाहींत, परंतु, भक्तीचा तिसरा अगदीं सुलभ प्रकारही ज्यांस धरितां येत नाहीं—ह्मणजे प्रेम करावयाचें तें सगळें देवाकरितां करावयाचें, आणि वैर करावयाचें तें सगळें देवाकरितां करावयाचें, हें ज्यांस होत नाहीं, त्यांस शासन आहे.

असो. तर अशा प्रकारें, आपल्या राष्ट्राच्या ऐहिक आणि पारलौकिक उन्नतीकरितां कायावाचामनेंकरून अमीर अबदुल रहिमान हे पुष्कळ झटले—किंबहुना त्यांनीं आपलें जीवित आपल्या राष्ट्राच्या हितार्थ खर्चीं घातलें—जें त्यांस करितां आलें तें त्यांनीं आपल्या समजुतीप्रमाणें स्वराष्ट्राच्या कल्याणाकरितां केलें, आणि इतर राजांस स्वराष्ट्रांचें जें कार्य शंभर वर्षांत करितां आलें नसतें, तें कार्य यांनीं वीस वर्षांत करून दाखविलें. त्या महात्म्याचा सहवास ह्या अल्प चरित्राच्या अवलोकनानें, वाचकांस, अल्प स्वल्प तरी—खंडींत पात्र रती इतका तरी—व्हावा, आणि त्याच्या योगानें त्यांस आपल्या राष्ट्राच्या उपयोगीं पडण्याची स्फूर्ति व्हावी, असें परमेश्वरापाशीं अनन्यभावें मागून, हें अल्प चरित्र येथें समाप्त करितों.



# विक्रीस तयार असलेले ग्रंथ.



| | | किंमत रुपये. |
|---|---|---|
| १ | पानपतची मोहीम-( ले. नागेश विनायक बापट )... | ३॥ |
| २ | अर्थशास्त्र ( ले. वि. ल. कवठेकर बी. ए. )... ... | १ |
| ३ | विषवृक्ष ( ले. विष्णु सिताराम देव ) | १ |
| ४ | हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास, भाग १ ला, ... मुसलमानी रियासत. ( ले. गो. स. सरदेसाई बी. ए. ) | २॥ |
| ५ | देवीसत्यभामा अथवा गुजराथेंत पेशवाईची अखेर ( ले. शंकर विष्णु पुराणिक बी. ए. ) ... ... ... | १॥ |
| ६ | वीरमती ( ऐतिहासिक बोधपर कादंबरी ) ... ... | १ |
| ७ | सती राणकदेवी ( ऐतिहासिक बोधपर कादंबरी ) ... | १ |
| ८ | वाईकर भटजी ( व्हिकार ऑफ वेकफील्डच्या ... धर्तीवर धनुर्धारीकृत ) ... ... ... ... | १ |
| ९ | दुर्गेशनंदिनी अथवा किल्लेदाराची मुलगी ... ... ( ऐतिहासिक व बोधपर कादंबरी ) ... ... ... | १॥ |
| १० | सद्वाक्य कथासंग्रह ... ... ... ... ... | ।॥- |
| ११ | वक्तृत्वकला ( ले. लक्ष्मण त्र्यंबक पारनाईक ) ... | १ |
| १२ | माझिनी ( ले. लक्ष्मण गोविंद घाणेकर बी. ए. ) ... | १। |
| १३ | आरोग्यशास्त्र ( ले. डा. कृष्णराव वि. धुरंधर ) ... | १। |
| १४ | प्यादाचा फर्जी अथवा भोंसले घराण्याचा अभ्युदय (ऐतिहासिक कादंबरी )... ... ... ... ... | १ |

१५ परमार्थ-ज्ञानमाला भाग १ ला—( कर्मयोग, भक्ति-
योग, व राजयोग ) ... ... ... ... ... १॥

१६ श्री. महाराणी जमनाबाई गायकवाड यांचें चरित्र. ... -॥-

१७ कृषिकर्मविद्या—अथवा—मुंबई इलाख्यांतील जिराईत व
बागाईत शेतीचें वर्णन ) ... ... ... ...४

१८ ग्यारिबाल्डी ( ले. नरसिंह चिंतामण केळकर ) ... १।

१९ हिंदुस्थानची राजनीति ( राजकीय विषयांवर
वेगवेगळ्या विद्वानांनीं लिहिलेले १२ लेख )... ... १॥

२० हिंदुस्थानचा अर्वाचीन इतिहास भाग २ रा—मराठी रिया-
सत पूर्वार्ध ( ले. गो. सरदेसाई बी. ए. कृत. ) ... २

२१ अमीर अबदुल रहिमान यांचें चरित्र ( ले. विनायक ...
कोंडदेव ओक )... ... ... ... ... ... १

वरील ग्रंथांशिवाय श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांनीं प्रसिद्ध केलेले ग्रंथ आमच्याकडे विकत मिळत असतात.

**दामोदर सांवळाराम आणि मंडळी, बडोदें.**